स्वा. वि. दा. सावरकर लिखित

# हिन्दुत्व

भाषान्तर, प्रस्तावना व टिपणें

ले. वि. वि. पटवर्धन

१८५७ चें स्वातंत्र्यसमर या पुस्तकाचे भाषान्तरकर्ते

प्राप्तिस्थलः—

ग. पां. परचुरे, प्रकाशन मन्दिर

गोरेगांवकरांची चाळ क्र. २, गिरगांव मुंबअी ४.

[ १२ ]

आवृत्ति १ ली

सन १९४७

मूल्य

अडीच रुपये

# प्रस्तावना

वीर सावरकरांचा हिंदुत्व हा ग्रंथ मूळ इंग्रजींत १९२३मध्यें प्रसिद्ध झाला. त्याचें एक मराठी भाषांतर, मराठी वाचकांना उपलब्ध आहेच. प्रस्तुतचें भाषांतरहि त्या ग्रंथाच्या प्रसाराला आणि प्रचाराला अधिक साहाय्यभूतच होईल अशी आशा आहे. अद्वितीय ग्रंथांचे संबंधांत हें नेहमींच घडतें कीं, जशी त्याचीं अनेक भाषांत भाषातरें होतात तशीच एका भाषेंतसुद्धां त्यांचीं अनेक भाषातरें झालेलीं दिसून येतात. श्रीमद्‌भगवद्‌गीतेची किंवा ज्ञानेश्वरीची अनेकानेक कितीतरी मराठी भाषातरें प्रचलित नाहींत कां? निरनिराळया लेखकांनीं टॉलस्टॉयच्या ग्रंथांचीं इंग्रजी भाषेंत केलेलीं भाषांतरें आढळून येतातच कीं नाहीं? म्हणून मूळ ग्रंथाचा युगप्रवर्तक संदेश, मराठी बोलणाऱ्या हिंदु जगतांत अधिक प्रसृत होण्याच्या दृष्टीनेंच प्रस्तुतच्या भाषांतराचा प्रयत्न असल्याचें सहज लक्षात येण्यासारखें आहे.

सावरकरांच्या इतर अनेक ग्रंथांप्रमाणें हिंदुत्व या ग्रंथाचा इतिहासहि तसाच लोकोत्तर आहे. ख्रि. १९०६ ते १९१०च्या मधल्या काळांत, आपल्या इंग्लंडमधील वास्तव्यांत 'हिंदु' कुणाला म्हणावयाचें या प्रश्नाकडे वीर सावरकरांचें लक्ष प्रथमच प्रामुख्यानें वेधलें. आपापल्या जातीला स्वतंत्र राजकीय प्रतिनिधित्व मिळविण्याच्या अहमिहमिकेमध्यें 'हिंदु' या जातिवाचक नामावरच खूप रणें यावेळीं हिंदुस्थानांत माजलीं होतीं. आर्यसमाजी, शीख, ब्रम्हो, जैन, लिंगायत या हिंदुजातींतीलच घटक—जातींना कधीं हिंदु तर कधीं अहिंदु म्हणून समजण्यांत येई. अर्थात् याच्यामागें स्वार्थीपणाचा, दुधखुळेपणाचा तर कधीं केवळ फुटीरपणा निर्माण करण्याचाच डाव असल्याचें स्पष्ट दिसून येत असे, हिंदु या शब्दाची व्याख्या करण्याचा प्रयत्न त्यावेळीं अनेक विद्वानांनीं केला. परंतु त्यांची मूळ भूमिकाच केवळ धर्माच्या चुकीच्या पायावर प्रथमपासूनच

आधारल्यामुळें त्यांच्या व्याख्या अव्याप्तीच्या आणि अतिव्याप्तीच्या दोन्ही दोषांपासून मुक्त नसत. हिंदु शब्दाचा राष्ट्रीय अर्थ व्यापकपणें त्यांच्या कधींच ध्यानांत आला नाहीं.

हा सर्व घोंटाळा नाहींसा करून टाकण्यासाठीं, वीर सावरकरांनीं या प्रश्नाचा विचार ऐतिहासिक भूमिकेवरून करण्याचे ठरवून 'हिंदु' जातीची, धर्माची आणि राष्ट्राची पार वैदिक कालापासून कसकशी उत्क्रांति होत आली यावरच आपलें लक्ष्य प्रामुख्यानें केंद्रित केलें. पण या संशोधनाच्या उद्योगांत मग्न असतानाच सावरकरांना लंडन येथें पकडण्यांत येऊन, पुढें दोन जन्मठेपींच्या शिक्षेनें त्यांना अंदमानांत पाठवून देण्यात आलें. परंतु येथील बंदिजीवनांत ग्रंथनिर्मितीला आवश्यक असलेलें लेखन–साहित्यहि त्यांना दुर्लभ झाल्यामुळें 'हिंदुत्व' या ग्रंथाची प्रकरणवार पण कच्ची जुळणी, त्यांनीं आपल्या कोठडीच्या चुना दिलेल्या भिंतीवर अणकुचीदार खड्याच्या साहाय्यानें कोरून, करून ठेवली. स्वत: अभिजात कवि असल्यानें, हिंदुत्वाची व्याख्याहि त्यानीं ' आसिंधुसिंधुपर्यंता ' या सुदर अनुष्टुभांत येथेंच ग्रथित केली. हें अनुष्टुप जितकें श्रुतिसुखद आणि सुटसुटीत आहे तितकेंच त्यांतील तर्कशास्त्र आणि प्रखर बुद्धिवैभवहि अत्यंत प्रभावी असेंच आहे. त्यांतील सूत्रमय सिद्धान्तामुळें अनेकांना ते एखाद्या स्मृतींतलें किंवा पुराणांतलेंच आहेसें वाटतें !

हिंदुत्वाची व्याख्या अशा रीतीनें अनुष्टुभांत ग्रथित केल्यावर त्या संबंधींची बरीच चर्चा सावरकरांनीं आपल्या त्या वेळच्या अंदमानांत असलेल्या सहभोगी देशभक्त क्रांतिकारकांशीं केली. परंतु बुद्धींत आणि भिंतींत चितारलेला 'हिंदुत्व' या ग्रंथाचा आराखडा हिंदुस्थानांत येऊन कसा पोंचणार होता ? अंदमानच्या यमयातनेंतून सावरकर सुटून येऊन राजरोसपणें ते आपला ग्रंथ हिंदुस्थानांत प्रसिद्ध करतील ही आशाहि त्यावेळीं कुणाच्या स्वप्नांतसुद्धां येण्यासारखी नव्हती. परंतु वेळोवेळीं सुटणाऱ्या राजबंद्यांकडून मुखोद्गत करून घेतलेले ग्रंथांतील विचारप्रणालीचे प्रमुख सिद्धान्त व वरील अनुष्टुप, १९१७ ते १९ च्या मधल्या काळांत हिंदुस्थानांत येऊन

पोंचलें. व येथून हें अनुष्टुप व ग्रंथाचा सारांश ठिकठिकाणच्या हिंदुसंघटनी संस्थांकडे प्रति करून धाडून देण्यांत आला.

पुढें सुदैववशात् वीर सावरकरांची अंदमानच्या काळगुहेंतून सुटका झाली व त्याना रत्नागिरीच्या कारागृहांत आणून ठेवण्यांत आलें. तेथें त्यांना असेंच चोरून मारून परंतु सुलभतेनें, लेखन साहित्य प्राप्त झालें; आणि या ग्रंथाचें सर्व हस्तलिखित त्यांनीं तेथें लिहून काढून बाहेर पाठवून दिलें. या इंग्रजी ग्रंथाची पहिली आवृत्ति नागपूरचे ॲडव्होकेट श्री. विश्वनाथराव केळकर यांनीं प्रसिद्ध केली. परंतु त्यावेळीं सावरकर हे बंदीत असल्यामुळें त्याचें नांव या ग्रंथाला उघडपणें लाभलें नाहीं. 'मराठा' या नांवानें तें प्रसिद्ध झालें. तरीसुद्धां या पुस्तकाचा चागलाच बोलबाला झाला, व हिंदुसंघटनी जनतेनें त्याचें चांगलेंच स्वागत केलें. लाला लजपतराय, पं. मदन मोहन मालवीय, यांनीं या ग्रंथाविषयीं आदर व्यक्तविला. दे. स्व. भाई परमानंदानीं लिहिलें कीं, "या ग्रंथकाराला 'मराठा' न म्हणतां 'महात्मा' म्हटलें तरच अधिक उचित होईल!"

'हिंदुत्व' हा ग्रंथ हिंदु जगताला सावरकरांनीं दिलेला एक महान् वारसा आहे. 'सत्तावनचें स्वातंत्र्य समर' या ग्रंथास ज्याप्रमाणें सशस्त्र क्रांतीच्या तत्वज्ञानाची गीता म्हणून संबोधण्यांत येतें त्याचप्रमाणें याहि ग्रंथास 'हिंदुराष्ट्रवादाची गीता' म्हणून संबोधिलेलेंच योग्य दिसेल. गीताच काय परंतु हुतात्मा स्वामी श्रद्धानंदानीं या ग्रंथाला, वैदिक कालांतील परम पवित्र उषःकालीं द्रष्टया ऋषींना स्फुरलेल्या वैदिक मंत्राच्या श्रेणीला बसवून गौरविलें आहे; इतकें या ग्रंथाचें अपार महत्त्व त्या हिंदुसंघटनाच्या भीष्माचार्यांना वाटत होतें. 'हिंदु' या शब्दाची सर्वांना निरपवादपणें मान्य होईल अशी जी व्याख्या सावरकरांनीं सिद्ध केली ती धर्माधिष्ठित नसून वर सांगितल्याप्रमाणें मुख्यतः राष्ट्र, जाति आणि संस्कृति यांवर आधारलेली आहे. याकरिता त्याना एक नवीन शब्दच प्रचारांत आणावा लागला. आणि तो महान् अर्थवाही शब्द म्हणजे 'हिंदुत्व' हाच होय. कारण चुकीनें असो किंवा बरोबर असो, हिंदुधर्म हा शब्द केवळ वेदाचें प्रामाण्य मानणाऱ्या श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्मालाच आतांपर्यंत वापरण्यांत आला आहे. त्यामुळें

त्या वैदिक धर्माचे अनुयायी तेवढेच हिंदु, व राहिलेले शीख, जैन, लिंगायत इ. अहिंदु ठरू लागले. त्यामुळें इथेंच सर्वांची बुद्धि गुंग होऊन गेली होती.

परंतु वीर सावरकरांनीं आपल्या शोधक ऐतिहासिक प्रतिभेनें या सर्व प्रश्नांतील कच्चा दुवा नेमका हेरला. त्यांना स्पष्ट दिसत होतें कीं, लिंगायत, शीख, जैन, सनातनी, आर्यसमाज हे आपापले धर्म जरी कितीहि निरनिराळे समजत असले तरी सामाजिक संस्कार, इतिहास, भाषा, निर्बंध–विधान, पुण्यक्षेत्रें नि समान रक्त, या अनेक नात्यांनीं त्या सर्वांमध्यें समान असे एक राष्ट्रीय बंधन आधींच निर्माण झालेलें आहे. धर्म निराळे असले तरी शीखांत व सनातन्यांत विवाह होतात; दिवाळी पाडवा हे सण वैदिकाप्रमाणें जैनहि पाळतात; बौद्ध, जैन, वैदिक कोणीहि असो, सर्वांचे पुरातन धर्म वाङ्मय, साऱ्या प्राकृत भाषांची जननी असलेल्या संस्कृत भाषेंतच लिहून ठेवलेलें आहे; आणि आजसुद्धां जैन, वैदिक, लिंगायत, शीख इ. सर्व हिंदूंना एकाच हिंदु निर्बंध–विधानाला ( Hindu Law ) अनुसरून न्याय देण्यांत येतो. साराश ईश्वरप्राप्तीचे मार्ग म्हणजेच धर्म किंवा आध्यात्मिक मतें हीं जरी प्रत्येकाचीं निरनिराळीं असलीं तरी, आम्ही सारेजण समसमान बंधुत्वाचें असें एक विशाल राष्ट्रीय जीवन जगत असतो. आणि यथार्थत्वानें त्यालाच ' हिंदुत्व ' हें नांव सावरकरांनीं दिलें. सावरकरांच्या या अभिजात राष्ट्रीय शोधाचें जेवढें म्हणून श्रेय आहे तें तें सर्व न्याय्यत: केवळ त्यांच्या एकट्याचेंच आहे. सावरकरांच्या पूर्वी अमक्याला तो शब्द माहित होता आणि तमक्याच्या लेखांत तो दृष्टीस पडतो असें सांगून सावरकरांचें श्रेय हिरावून घेण्याचा किंवा तें कमी करण्याचा जो कुत्सित प्रयत्न कांहीं छद्मी व हेकट लोकांकडून केला जातो तो सर्वस्वीं अनुचित असाच आहे. गायत्रीचें पुरश्चरण करावें त्याप्रमाणें एका तपापेक्षा जास्त काल म्हणजे जवळ जवळ चौदा पंधरा वर्षें, सावरकरांनीं अंदमानच्या तपस्या–भूमींत ' हिंदुत्व ' या एका शब्दाचा ध्यास घेऊन त्याची अखंड अशी डोळस उपासना तेथें केली. आणि तेथून सुटल्यापासून आतापर्यंतचे सारे आयुष्य त्यांनीं याच एका ' हिंदुत्वा 'च्या प्रचारार्थ नि प्रसारार्थ वेचलें आहे. 'हिंदुत्व' हें त्यानीं आपलें आयुष्यकार्यच केलेलें आहे. आणि म्हणून कुणालाहि कमी न लेखतां निर्भयपणें आम्हांला असें सांगा-

वेसें वाटतें कीं, " हिंदुत्वाचें जनक एकमेव सावरकर नि सावरकरच आहेत. इतर लोक मोठे असले तरी ते याकरितां निश्चित नव्हेत. हिंदुत्वाच्या श्रेया-वर एकट्या सावरकरांचाच शंभर टक्के अधिकार आहे ! "

प्राचीन सिंधुस्थानांतून बाहेर पडलेल्या आर्यांनीं, द्रवीड, कोलिरियन, अनार्य आणि इतर आदिवासी जाती यांच्याशीं विवाह करून आपलें रक्त त्यांच्यांत व त्यांचें आपल्यांत संक्रांत करून घेऊन समान रक्ताच्या एका नव्याच जातीला म्हणजे हिंदु जातीला जन्म दिला. तेव्हां या जातींतील लोकांच्या निर-निराळ्या धर्मांना समुच्चयदर्शक असें 'हिंदु-धर्म' हें नाव जर दिलें गेलें असतें तर तें योग्य ठरतें. आणि खरें पाहतां याच हिंदुधर्मापोटीं, वैदिक, शीख, जैन हे धर्म येतात. परंतु धर्म ही प्रत्येक व्यक्तीच्या मनाची स्वतंत्र गोष्ट असल्या-मुळें जातीय एकतेचा आणि राष्ट्रीय ऐक्याचा विचार करतांना धर्मांचा विचार आपल्या व्याख्येंत आणून परस्परामध्यें कडवट भावना निर्माण करूं नये असें सावरकराचें स्पष्ट मत ठरलें. आणि पुन्हां, सावरकर आपली व्याख्या धर्मावर अधिष्ठित करीत नाहींत याचें दुसरें महत्त्वाचें कारण असें कीं, हिंदूंचें जे जे निरनिराळे धर्म आहेत ते ते सारे अगदीं याच देशांत जन्मलेले आणि वाढलेले ( Indigenous ) असे संपूर्ण भारतीय असून त्या त्या धर्मांचे संस्थापकहि याच हिंदु जातींतून जन्माला आलेले आहेत. त्यामुळें वादाचा प्रश्नच उरत नाहीं. म्हणून जैन असो वा लिंगायत असो, वैदिक असो वा शीख असो, तो याच हिंदुभूमीवर प्रेम करणारा असतो. कारण त्याच्या धर्मांची आणि धर्माचार्यांची हीच एकमेव पुण्यभूमि असते. आणि ब्राह्मणापासून चांडालापर्यंत आम्हां सर्वांच्यांत एकच हिंदु रक्त खेळत असल्यामुळें हिंदुभूमि ही आपली सर्वांची पितृभूमि ठरते. सर्वांमध्यें समान रक्त वाहण्यास आमच्या जातिसंस्थेनें मुळींच अडथळा केलेला नाहीं, असें सावरकरांचें स्पष्ट मत आहे. उलट ते म्हणतात कीं, जातिभेद असू-नहि आमच्यांत समान रक्ताचा प्रवाह चालू होता. जातिसंस्थेनें अडथळा केलाच असेल तर तो म्लेच्छ, बर्बर, युरोपीय इ. च्या परकीय रक्तालाच आणि आपल्यांत होणाऱ्या त्यांच्या भेसळीला. आणि म्हणूनच आजहि आमचें रक्त त्या पराक्रमी हिंदु पूर्वजाचेच असल्याचें मोठ्या अभिमानानें सांगतां येतें.

आजहि हिंदुत्व हा एकच शब्द आपल्या सबंध राजकीय जीवनाचा पृष्ठवंशच होऊन राहिला आहे. नोखालींतील हिंदूंच्या दुःखामुळें क्रोधाविष्ट होऊन बिहारी हिंदूंच्या डोळयांत सूडाचा अंगार चेतला. शीखांच्या गुरु-गोविंदांचे तर प्रख्यात वचन सावरकरांनीं दिलें आहे; " इक पीर हमारा हिंदु भारा भाई चारा ॥ " ( पृ. ५८ ) (हिंदूंना व आम्हांला समान विपत्ति आहे. ) नुकतेंच पाकिस्तानी मुसलमान पुढाऱ्यांना उत्तर देतांना मा. तारा-सिंग या शीख नेत्यानें नाहीं का स्पष्टच सांगितलें कीं, " हिंदु नि शीख एकत्रच तरूं नाहींतर एकत्र बुडूं ! " आणि म्हणून हिंदुत्व हें आपल्या सबंध जातीचेंच ध्वजचिन्ह होऊन राहिलें आहे !

' आह्मी हिंदु नाहीं अन्य कोणी आहों ' अशा तऱ्हेची एक टूम मध्यें बळावत चालली होती. त्याला कारणेंहि अनेक होतीं. व त्यांतील प्रमुख कारण म्हणजे आपापल्या जातीचें स्वतंत्र राजकीय प्रतिनिधित्व मिळविणें हेंच होतें. स्वतंत्र प्रतिनिधित्व जर मुसलमानाना मिळतें तर तें शीखांनाच काय पण ब्राह्मणआदि सर्वांनींच मिळविण्यास प्रत्यवाय नाहीं असें सावरकर सांग-तात. स्वतंत्र प्रतिनिधित्व हें संपूर्णपणें चांगलें नाहीं हें ते सांगतातच; परंतु या सर्वांपेक्षा त्यांतून निर्माण होणारी जातीय फुटीरपणाची वृत्ति राष्ट्राच्या दृष्टीनें अधिक घातुक आहे असें ते बजावतात. आणि शीखांच्या संबंधात जो इषारा त्यांनीं २५ वर्षांपूर्वी दिलेला आहे तो आजच्या पंजाबच्या हत्या-कांडांत दुर्दैवानें पुरेपूर खरा ठरला आहे. सावरकरांनीं लिहिलें आहे, " वेगळें राहून आपलें कांहीं हित साधतें आहे असें तुम्हाला वाटेल, परंतु त्यामुळें आमच्या प्राचीनतम जातीला आणि संस्कृतीला व विशेषतः तुम्हांला, फारच हानि सोसावी लागणार आहे. कारण तुमचे हितसंबंध हिंदूंशींच अत्यंत निगडित झालेले आहेत. गत इतिहासांत घडल्याप्रमाणें पुढेंहि जर परधर्मीय आक्रमकानें हिंदुसंस्कृतिविरुद्ध आपली तलवार उचलली तर लक्षांत ठेवा कीं, हिंदुजातीप्रमाणें तुमच्यावरहि तिचा प्राणघातक प्रहार झाल्यावाचून राहाणार नाहीं." ( पृ. १३० ) याकरिता " ज्या ज्या म्हणून बंधनानें तुम्ही या मूळ जातिशरीराशीं एकत्र निगडित झालेले आहांत, तें तें बंधन अधिक बळकट करण्याचा प्रयत्न तुम्ही करणें अवश्य आहे. मग हें

बंधन रक्ताचें, भाषेचें, समान सणवार—उत्सवांचें संस्कृतीचें किंवा समान मातृभूमीविषयीं वाटणाऱ्या प्रेमाचें, कसलेंहि असो. " (पृ. १४३)

इतिहासाची पुनरावृत्ति जर होत असेल, आणि इतिहासकालांत राष्ट्रावर कोसळलेल्या आपत्ति जर तशाच स्वरूपांत पुनः राष्ट्रावर कोसळत असतील तर भूतकाळापासून निघणारे इतिहाससिद्ध सिद्धान्त हेच वर्तमान काळाला तारक ठरतात यांत कसलाहि संदेह बाळगण्याचें कारण नाहीं. 'लब्ध प्रकाश इतिहास निसर्ग मानें' ही तर सावरकरांच्या बुद्धिवादी राजकारणाची बैठक आहे. बुद्ध धर्माच्या आत्यंतिक अहिंसेनें राष्ट्र जेव्हां अप्रतिकारक्षम होऊन पडलें तेव्हां अग्नि आणि तरवार हीच ज्यांची संस्कृति होती त्या रानटांनीं हिंदुस्थानवर आक्रमण केलें. राष्ट्र मरतें कीं काय असा संभव निर्माण झाला. परंतु पुनः एकदा हिंदुजातीनें आपला संघटित प्रतिकार ठाणून त्या पाशवी संस्कृतीचा उच्छेद केला. बुद्धाचा विश्वधर्म अंगिकारल्यामुळें याहि घटकेला आपलें हिंदुराष्ट्र परधर्मीय आक्रमकांच्या अत्याचारापुढें कसें दीन दुबळें आणि खंडित झालें आहे हें पाहिलें म्हणजे सावरकरांनीं सांगितलेला इतिहाससिद्ध सिद्धान्तच यावेळीं राष्ट्रानें अंगिकारला तरच कांहीं तरणोपाय आहे. तो सिद्धान्त असा " जोपर्यंत साऱ्या जगताचीं दंतनखाग्रें हिंसेच्या रक्तानें रंगलेलीं आहेत आणि जोंपर्यंत राष्ट्रीय आणि वांशिक भेद माणसाला पशुत्वाच्या कोटीस नेण्याइतके प्रबल आहेत तोंपर्यंत, आपल्या आत्मिक प्रकाशाप्रमाणें कसलेंहि आध्यात्मिक वा राजकीय जीवन हिंदुस्थानला जर उपभोगावयाचे असेल तर राष्ट्रीय आणि जातीय बंधनांतून निर्माण होणाऱ्या शक्तीची अवहेलना करून चालावयाचें नाहीं ! " (पृ. २७) आणि "जो विश्वधर्म इतर राष्ट्रांचें आणि जातींचें क्रौर्य आणि पाशवी उन्माद एवढा सुद्धां कमी करूं शकत नाहीं आणि त्याची आसुरी लालसाहि तशीच वखवखलेली राहूं देतो, त्या विश्वधर्माचा खरोखर काय उपयोग आहे ?" (पृ. २९)

'मुसलमानांच्या गळीं हिंदी राष्ट्रवाद उतरविण्यास कॉंग्रेस सर्वस्वीं असमर्थ नि अयशस्वी ठरली' अशी स्पष्ट कबुली नेहरू, पटेल नि कृपलानी आज देत आहेत. पण अशी कबुली देऊनसुद्धां हिंदुराष्ट्रवादाचे ते मात्र अद्यापहि कट्टवट वैरीच राहिले आहेत. परंतु त्यांच्या याच भोंगळ राष्ट्रवादामुळें

पंजाबच्या हत्याकांडांत, नौखालींत, सीमाप्रांतांत, सिंधमध्यें, लक्षावधि निरपराध हिंदूंचें रक्त अत्याचारी मुसलमानांनीं सांडलें. अजूनसुद्धां आपल्या खऱ्या जातीय आणि राष्ट्रीय ऐक्याच्या भूमिकेवर सावरकरसांगतात त्याप्रमाणें हे पुढारी जर उभे राहतील तरच जातीयतेचा कांटा या जातीय ऐक्याच्या कांट्यानेंच सहजच काढतां येईल. सावरकर म्हणतात; "ज्यांची मूळ प्रवृत्तीच भीषण अशा युद्धघोषांत रूपांतरित होण्याची आहे तीं आपापलीं आग्रहीं मतें जोंपर्यंत दुसऱ्या धर्मांनीं सोडून दिलेलीं नाहींत तोंपर्यंत, सांस्कृतिक आणि जातीय दृष्ट्या एक असलेल्या घटकांनीं, ज्यांतून अपार शक्ति आणि सांघिक ऐक्य याचा लाभ होतो असे समान नांवाचे आणि समान ध्वजाचे बंध ढिलावून चालणार नाहीं." (पृ. ८१)

मुसलमान हें कधींच हिंदुस्थानाशीं समरस न झाल्यामुळें त्यांची दृष्टी सदैव त्यांच्या बाहेरच्या इस्लाम राष्ट्रांकडे असते हें आतां पाकिस्तानच्या प्रस्थापनेनें व पाकिस्तानमध्यें झालेल्या हिंदुशीखांच्या शिरकाणानें निःसंदेह सिद्ध झालें आहे. अशावेळीं अजूनहि हिंदुस्थान वसाहत राज्यांत 'हिंदु मुस्लीम भाई भाई' हें जुनें सूत्रच जर चालू राहील तर या राज्यसंस्थेचाच विनाश घडवून आणण्यास तें कारणीभूत झाल्यावांचून राहणार नाहीं. तुर्कस्थानांतील आर्मेनियनाचें जें उदाहरण सावरकरानीं दिलें आहे तें अवश्य मननीय आहे. तुर्की सैन्यांत क्रांतीनंतर आर्मेनियनांचीहि भरती झाली होती. परंतु तुर्कस्थानचें सर्व्हियाबरोबर युद्ध सुरू होतांच आर्मेनियन लोक सर्व्हियाला जाऊन मिळाले, आणि ज्या राष्ट्रानें त्यांना वाढविलें, शिक्षण दिलें त्या तुर्की राष्ट्राशीं त्यांनीं द्रोह केला. झेकोस्लाव्हाकियाचें अगदीं अलीकडचें उदाहरण काय सांगतें! झेकाविरुद्ध बंड करून सुडेटन जर्मन आपल्या रक्ताच्या प्रशियन जर्मनांनाच जाऊन मिळालें ना! अल्स्टराइट इंग्लिश आणि आयरिश यांचें हाडवैर सदाचें धुमसण्याचें तरी हेंच कारण आहे. म्हणून जागतिक इतिहासाचा कानोसा घेऊन व मानवी स्वभावाचा नीटपणें व धीटपणें अभ्यास करून या पुढचीं पावलें टाकलीं तरच राष्ट्र म्हणून यापुढें आपणांला स्वतंत्र जीवन जगतां येईल.

शेवटीं हिंदुराष्ट्राच्या उद्धाराची खरी आशा व भिस्त कशावर असेल तर

ती या राष्ट्राचे जे खरे राष्ट्रीय घटक हिंदु, त्यांच्यावरच आहे. हिंदूंचें उज्ज्वल भवितव्य घडविणें हें हिंदूंच्याच शक्तिसामर्थ्यावर आणि संख्याबळावर अवलंबून आहे. कारण हिंदु हेंच या भूमीचा खरा पाया, मूळ खडक, आणि शेवटच्या क्षणापर्यंत तिच्या पाठीशीं उभे राहणारे हिंदुराष्ट्राचे एकनिष्ठ सैनिक आहेत. ( पृ. १४५ ) जातीयतेचा राक्षस इंग्रजानीं निर्माण केला हें खरें नसून, मुसलमानांमध्यें तो अनेक शतकांपूर्वीपासून नव्हे प्रथम पासूनच स्वयंभूपणानें जागृत आहे हा सावरकरांचा स्पष्ट सिद्धान्त आहे. व या राक्षसाला गाडावयाचा किंवा माणसाळवायचा एकच एक मार्ग म्हणजे इंग्रजांनीं आपल्या हातानें स्थापन केलेल्या कॉंग्रेसचा अशास्त्रीय हिंदीराष्ट्रवाद हा नसून, शतकोशतकांच्या आपल्या इतिहासाच्या शास्त्रशुद्ध अनुभवांनीं शिकवलेला व रामचंद्रापासून राजारामापर्यंत व शालिवाहनांपासून शिवरायापर्यंतच्या हिंदुवीरांनीं प्रत्यक्षांत आचरून यशस्वी करून दाखविलेला, हिंदुराष्ट्रवाद हाच होय.

१९२३ मध्यें लिहिलेल्या या ग्रंथात, आज दोन तपें होऊन गेलीं तरी तत्त्वाच्या दृष्टीनें एकहि अक्षर बदलण्यासारखी परिस्थिति अद्याप निर्माण झालेली नाहीं. उलट त्यावेळीं सावरकरांनीं जें लिहिलें त्यांतील प्रत्येक अक्षर न् अक्षर जसेंच्या तसें घडून आलें आहे. आणखी दोन शतकें तरी हिंदुराष्ट्राला दीपस्तंभासारखे उपयोगी पडणारें राजकीय नि राष्ट्रीय तत्त्वज्ञान सावरकरांनीं या राष्ट्राला या पुस्तकाचें रूपानें दिलें आहे. आणि त्यापुढें !—त्यापुढचें उत्क्रांत मानवतावादाचें सूत्रहि त्यांनीं याच ग्रंथांत सांगितलें आहे. परंतु त्या पायरीपर्यंत प्रगत होण्यासाठींच राष्ट्रीय, जातीय, आणि सांस्कृतिक ऐक्यावर आधारलेलें हिंदुसंघटन हाच एकमेव मार्ग आजला आचरणीय आहे. सावरकरांचें हिंदुत्व कधींच संकुचित नव्हतें व नाहीं. हिंदुत्वाच्या मर्यादा म्हणजे या भू–गोलाच्याच मर्यादा असें ते अभिमानानें सांगतात.

वैदिककालापासून ते अगदीं आजपर्यंतचा, हिंदुत्वाच्या जन्माचा, जाणीवेचा नि उत्कर्षाचा समग्र इतिहास सावरकरानीं आपल्या विशाल ऐतिहासिक प्रतिभेनें न्याहाळून तो अत्यंत तर्कशुद्धतेनें आणि सुसूत्र पद्ध-

तीनें मांडला आहे. या विषयासंबंधीं किती सूक्ष्म अभ्यास सावरकरांनीं त्या परिस्थितींतहि केला होता हे या ग्रंथांतील व्यक्तींचे नि ऐतिहासिक व सामाजिक घटनाचे अभ्यासपूर्ण उल्लेख जरी नुसते डोळयांखालून घातले तरी कळून येण्यासारखें आहे. हिंदुजाति आणि हिंदुभूमि यांच्याविषयींचें त्यांचें प्रेम ठायींठायीं प्रगट झालेलें, त्यांच्या या पुस्तकामधील भाषा वैभवानें व प्रतिभा विलासानें नटलेल्या कितीतरी छेदकांमधून दिसून येतें. असा हा अद्वितीय ग्रंथ–हिंदुत्वाचा वेद–सावरकरानीं हिंदुबांधवांना दिलेला आहे. वेदासारखेंच, या ग्रंथाच्या पठण–मनन–निदिध्यासाचें वेड हिंदुतरुणांना लागलें पाहिजे. हिंदुजातीचा उद्धार याच नि याच एका तत्त्वज्ञानांत आहे असें आग्रहानें सांगितल्यावांचून राहवत नाहीं.

पुणें.
दि. २१–१०–४७ }

वि. वि. पटवर्धन

# हिंदुत्वाचीं प्रमुखतम लक्षणें

## १

### नांवांत काय आहे !

'होय, आम्ही हिंदु आहोंत; आणि हिंदु म्हणून राहाण्यांतच आम्हांला सदैव धन्यता वाटते ' असें जेव्हां आम्ही छातीठोकपणानें सांगतों, तेव्हां त्या आमच्या तसल्या स्वाभिमानद्योतक आग्रहाकरितां, जिनें ' नांवांत काय आहे ? नांव म्हणजे कांहीं हात नव्हे, पाय नव्हे, तोंड नव्हे कीं माणसाचा दुसरा एखादा अवयव नव्हे' असें म्हणून आपलें 'नांव' तेवढें बदलण्याची आपल्या प्रियकराला कळवून विनवणी केली होती, ती व्हेरोनाची कमनीय कुमारी[१] आम्हाला उदारपणें क्षमा करील अशी आम्ही आशा बाळगतों.

---

१. ' रोमिओ आणि ज्यूलिएट ' या शेक्सपिअरच्या नाटकातील नायिकेच्या वाक्यांचा कौशल्यपूर्ण उपयोग करून घेऊन सावरकरांनीं ग्रंथाचा प्रारंभच इतका नाट्यपूर्ण केला आहे कीं, असल्या गंभीर तत्त्वचर्चेच्या विषयामध्येंहि त्यांच्या अभिजात कल्पनाविलासाची साक्ष आपणाला पटते. रोमिओ आणि ज्यूलिएट यांचें प्रथम दर्शनींच एकमेकांवर प्रेम जडतें. परंतु या दोन प्रियकरांच्या घराण्यांमध्यें इतकें पिढिजात हाडवैर असतें कीं, आपल्या घराण्यांच्या नांवामुळें आपलें लग्न या जन्मीं तरी अशक्य असें दोघांनाहि कळून चुकतें. म्हणून काकुळतीनें, ज्यूलिएट रोमिओला आपलें नांव तेवढें बदलण्याची गळ घालतें.

*Juliet:*—'Tis but thy name that is my enemy
It is nor hand, nor foot, nor arm or any part
Belonging to a man. O, be so some other name!
What is in a name? that which we call a rose,
By any other name would smell as sweet;

आम्हींहि, जर त्या प्रेमळ मठवासी भिक्षुश्रेष्ठाच्या[१] जागीं असतों तर, 'नांवांत काय आहे? ज्याला आपण गुलाब म्हणतों त्यास दुसरें नाव दिलें तरी त्याचा पूर्वींचाच मधुर सुवास त्यास येणार' असें आग्रहानें सांगणाऱ्या रमणीय (!) तर्कशास्त्राच्या गोड भिडेपुढें नमतें घेण्याचाच उपदेश आम्ही तिच्या त्या तरुण प्रियकराला केला असता. कारण नांवापेक्षां, निश्चितच वस्तूचेंच मूल्य अधिक असतें; आणि जेव्हां आपल्याला या दोन्हीपैकीं एकाचीच निवड करावयाची असते तेव्हां, किंवा जेव्हां त्या दोन्हींतील संबंध अगदीं नवीन असाच किंवा सर्वसाधारण असतो तेव्हां, तर नांवापेक्षां वस्तूच अधिक महत्त्वाची ठरत असते. एखादी वस्तू निरनिराळ्या मानवी भाषात निरनिराळ्या अनेक नांवांनीं संबोधिली जाते या एकाच गोष्टीवरून, शब्दांच्या ध्वनीमध्यें आणि त्यातून प्रतीत होणाऱ्या अर्थबोधामध्यें नैसर्गिक आणि अपरिहार्य असा अन्योन्य संबंध असतो, हें म्हणणेंच आपोआप लंगडें पडतें. तरीहि जसजसे ती वस्तु आणि त्या वस्तूचा वाचक शब्द, यांचें अन्योन्य साहचर्य वाढत जातें आणि तें चिरस्थायीं होतें, तसतसा ज्ञानाच्या ( वस्तूचा बोध होण्याच्या ) दोन अवस्थाना जोडणारा जो मार्ग असतो त्यातुन विचाराचा प्रवाह एकींतून दुसरीकडे इतका सहज वाहूं लागतो कीं, ज्ञानाच्या त्या दोन अवस्था ओळखूं न येण्याइतक्या एकरूप होऊन जातात. आणि याच्या जोडीला जेव्हां त्या वस्तूसंबंधानें उत्पन्न होणारे अनेक उपविचार व भावभावना त्या वस्तूच्या वाचक शब्दांशीं गूढ रीतीनें निगडित झालेल्या असतात, तेव्हां तर प्रत्यक्ष वस्तूइतकेंच तिच्या नांवालाहि महत्त्व प्राप्त होतें. 'नांवांत काय आहे?' असें मोठ्या काकुळतीनें विचारणाऱ्या त्या सुकुमार प्रेषितेला[२] तरी, पूजास्थान होऊन राहिलेल्या आपल्या प्रणयेश्वरास 'रोमिओ' न म्हणतां, 'पॅरिस'[३] म्हणून संबोधिलें

---

१. या भिक्खुश्रेष्ठाचें नांव 'फ्रायर लॉरेन्स.' यानेंच रोमिओ आणि ज्यूलिएट यांचा गुप्तपणें विवाह लावून दिलेला असतो.

२. The fair Apostle of the creed.

३. याच पॅरिसला ज्युलिएटला देण्याचें तिच्या इच्छेविरुद्ध तिच्या आईबापांनीं ठरविलेलें असतें.

असतें तर चाललें असतें कां? किंवा आपली प्रियमता ज्यूलिएट हिला, दुसऱ्या कोणत्याहि म्हणजे उदा. रोझेलिन्[१] या नांवानेंहि हाक मारलें तरी तेंहि तितकेंच गोड आणि मंजुमधुर लागेल, असें तिचा तो प्रियकर तरी, "त्या फळांनीं डंवरलेल्या वृक्षांचे माथे रुपेरी करणाऱ्या चंद्राची शपथ वाहून,'[२] सांगण्यास सिद्ध झाला असता का?

## नांवाचा अद्भुत महिमा

एवढेंच काय, पण असे कांहीं शब्द आहेत कीं, ज्यांत कोणत्या तरी अतिशय कूट अशा कल्पनेचा, किंवा ध्येयसृष्टीचा किंवा एखाद्या अवाढव्य आणि अमूर्त अशा सिद्धान्ताचा आविष्कार झालेला असतो; जे जणुं कांहीं आपलें स्वतंत्र अस्तित्वच प्रस्थापित करतात; आणि जे एखाद्या सेंद्रिय जीव जाताप्रमाणें जगतात व उत्तरोत्तर पुष्ट होतात. असे शब्द किंवा अशीं नावें हीं 'हात, पाय, किंवा माणसाचे इतर अवयव' यांपैकीं कांहींच किंवा सर्वहि नाहींत, किंवा तशीं तीं असूंच शकत नाहींत. कारण हेंच कीं, तीं माणसाचा केवळ आत्माच बनून राहिलेलीं असतात. हीं नांवें विचाराचेंच मूर्तिमान प्रतीक बनतात आणि मानवाच्या पिढ्यापेक्षाहि तीं अधिक चिरंजीव होतात! जीजस मृत्यू पावला, परंतु रोमन साम्राज्यापेक्षां आणि सम्राटापेक्षां ख्रिस्तच अमर होऊन राहिला. 'मॅडोना'[३]च्या कोणत्याहि एखाद्या सुंदर रंगचित्राखालीं 'फातिमा' अशी अक्षरें लिहा कीं, स्पॅनिश मनुष्य, इतर सामान्य कलापूर्ण चित्रांप्रमाणेंच त्याहि चित्राकडे कुतूहलानें पाहात राहिल. परंतु त्याठिकाणीं 'मॅडोना' हें पूर्वींचेंच त्या चित्राचें नांव लिहा, कीं पहा काय चमत्कार होतो तो! त्याचे गुडघे पूर्वीचा ताठरपणा टाकून देऊन आपोआप खालीं टेकलेले दिसतील; त्याच्या डोळ्यांतील कलाविष-

१. रोमिओची पूर्वींची प्रियतमा.

२. मूळ Lady, by yonder blessed moon, I swear
That tips with silver all these fruit-tree tops.
या ओळींचें भाषांतर

३. येशू ख्रिस्ताची माता, 'व्हर्जिन मेरी'

यक जिज्ञासा तत्काळ मावळून जाऊन, साक्षात्कारी भक्तिभावानें त्याची दृष्टि अंतर्मुख झालेली दिसेल; आणि मेरीचें पवित्र मातृप्रेम व वात्सल्यच त्या चित्रात मूर्तिमंत प्रकटलेलें पाहून त्याचा सबंध देह पुलकित होऊन उठेल. नांवात काय आहे! ठीक; तर मग अयोध्येला होनोलुल्लू म्हणा; किंवा तिच्या त्या अमरचरित रघुकुलतिलकाला दगडू धोंडू कांहींहि नांव द्या; किंवा अमेरिकनांना त्यांच्या वाशिंग्टनचा चंगिझखान नविण्यास सांगा; किंवा मुसलमानाला तो ज्यू आहे असें म्हणवून घ्यावयास लावा. आणि मग तुमच्या ध्यानांत येईल कीं, 'तिळा उघड'[१] एवढा एकच मंत्र कांहीं त्या प्रकारच्या जातींत आहे असें नाहीं!

## हिंदुत्व हा कांहीं साधा शब्द नव्हे

'हिंदुत्व' हाहि शब्द, त्याच शब्द-प्रकारापैकीं आहे कीं, जे शब्द सर्व मानव जातीला आजपर्यंत असामान्य स्फूर्ति आणि चैतन्य देत आलेले आहेत. आणि त्याच हिंदुत्वाच्या निःसंदिग्ध स्वरूपाची आणि आशयाची चिकित्सा करण्याचा प्रस्तुतचा आमचा उद्देश आहे. या एका नांवाभोंवतीं जे विचार आणि जीं महद्ध्येयें, ज्या चालीरीति आणि ज्या भावभावना गोळा झाल्या आहेत, त्या इतक्या वेगवेगळ्या आणि श्रेष्ठप्रतीच्या, इतक्या प्रभावी आणि इतक्या सुसूक्ष्म, इतक्या क्रांतिकारक आणि तरीहि तितक्याच सुस्पष्ट अशा आहेत कीं, हिंदुत्व या शब्दाची फोड करून तो उकलून सांगणें ही एक मोठी कठिण गोष्ट होऊन बसलेली आहे. आज दिसत आहे तशा प्रकारची त्या शब्दाची अवस्था घडविण्यास अधिक नाहीं तरी, चाळीस शतकांचा दीर्घ काल खर्ची पडलेला आहे प्रेषितांनीं नि कवींनीं, सूत्रकारानीं नि स्मृतिकारांनीं, वीराग्रणींनीं नि इतिहासकारांनीं, ह्या शब्दाची परंपरा आहे तशीच पुढें चालू ठेवण्यासाठीं, आयुष्यें वेंचलीं आहेत; विचार करून माथीं शिणविलीं आहेत; युद्धें लढलीं आहेत; इतकेंच काय पण देहहि

१. 'अलीबाबा आणि चाळीस चोर' या गोष्टींतील चोराचा नायक 'तिळा उघड' हा मंत्र म्हणून, आपला खजिना ठेवलेल्या गुहेचें जादूचें दार उघडीत असे.

ठेवले आहेत! कारण, खरोखर जी आपली जाति कधीं आपसांतच झुंजत तर कधीं परस्पर सहकार्य साधीत तर कधीं एकमेकांत पूर्ण विलीन होऊन एकात्म नि एकजीव झाली होती, तिच्याच आजवरच्या असंख्यात् व्यापार उलाढालींचा हा शब्द म्हणजे परिपाक, किंवा निष्पतीच नव्हे का? हिंदुत्व हा कांहीं साधा शब्द नव्हे, तर ती एक परंपरा आहे! तो एक इतिहास आहे. आणि तोहि, कित्येक वेळीं 'हिंदुत्व' या शब्दाचा या, त्यासारख्याच भासणाऱ्या नांवाशीं घोटाळा करून समजला जाण्यांत येणारा केवळ धार्मिक आणि आध्यात्मिक इतिहासच नव्हे, तर सर्वसंग्रही इतिहास आहे!

## हिंदुत्व आणि हिंदुधर्म यांतील मूलभूत भेद

'हिंदुधर्म' हा शब्द हिंदुत्वांतूनच निघालेला असा हिंदुत्वाचाच अंश आहे; केवळ त्याचाच एक भाग आहे. म्हणून 'हिंदुत्व' ह्या शब्दाची स्पष्ट कल्पना जर आली नाहीं तर, हिंदुधर्म हाहि शब्द तसाच दुर्बोध आणि अनिश्चित राहील. या दोन शब्दांतील परस्पर वेगळेपणा न समजल्यामुळेंच हिंदुसंस्कृतीचा अमूल्य वारसा ज्याना लाभला आहे अशा काही सहोदर जातिजातींमध्यें अनेक अपसमज आणि परस्पर साशंकता निर्माण झाली आहे. या दोन शब्दांच्या अर्थामध्यें मूलतः कोणता भेद आहे, हें आमचे विचार जसजसे आम्ही सांगूं लागूं तसतसें आपोआपच पुढें कळून येणार आहे. येथें इतकेंच सागितलें म्हणजे पुरें कीं, 'हिंदुधर्म' शब्दानें जें कांहीं मोघमपणें दाखविलें जातें तें आणि हिंदुत्व एक नव्हे. कोणत्यातरी आध्यात्मिक किंवा भक्तिमार्गी सांप्रदायाच्या मताला ऊण्या अधिक प्रमाणांत अनुसरून रचलेली उपपत्ति किंवा आचार विचार विषयक नीतिनियमांचें शास्त्र एवढाच अर्थ, साधारणपणें 'धर्म' या शब्दानें दर्शविला जातो. परंतु हिंदुत्वाच्या मूल तत्त्वाची चर्चा करण्यास जेव्हां आम्ही लागूं तेव्हां अमूक एखाद्या धार्मिक वा ईशप्राप्तिविषयक मताचा वा पंथाचाच आम्ही विचार करू असें मात्र मुळींच नाहीं. भाषेच्या रूढीची अडचण नसती तर हिंदुत्वाच्या जवळ जवळ येणारा असा 'हिंदूपणा' हाच शब्द आम्ही 'हिंदुधर्म' या शब्दापेक्षा जास्त चांगला म्हणून वापरला असता. 'हिंदुत्व' या एकाच शब्दा-

मध्यें एकराट् हिंदुजातीच्या अस्तित्वाच्या विचारांचीं आणि पराक्रमांचीं सर्व दालनें समाविष्ट होतात. आणि म्हणून ‘ हिंदुत्व ’ या शब्दाचा निश्चित आशय लक्षात येण्यासाठीं आपणांला पहिल्यानें ‘ हिंदु ’ म्हणजे काय हेंच आधीं समजावून घेतलें पाहिजे; आणि लक्षावधि मानवांच्या अंतःकरणाची पक्कड या नांवानें कशी घेतली, व मानवांतील उत्तमांतील उत्तम पुरुषांनीं नि शूरांतील शूर, धीर, वीरांनीं याच नांवाला आपली भक्तिपूर्वक निष्ठा कशी अर्पिली, याचेंहि रहस्य जाणून घेतलें पाहिजे. परंतु तें करण्यापूर्वी हें स्पष्ट करणें अगत्याचें आहे कीं, जो शब्द मूलतःच एका विशिष्ट पंथाचा निदर्शक आहे व जो ‘ हिंदुत्व ’ या शब्दापेक्षां अधिक संकुचित, व थोडासा असमाधानकारकच आहे, अशा त्या ‘ हिंदुधर्म ’ या शब्दाची व्याख्या करण्याचा किंवा त्याचें स्वरूप वर्णन करण्याचा आम्ही मुळींच प्रयत्न करणार नाहीं. यामध्यें आम्हांला कितपत यश येतें किंवा आम्ही घेतलेली बाजू कितपत योग्य आहे हें अर्थात्च पुढील विवेचनावरून कळून येईल.

# २

## ' सप्तसिंधूं 'त नव्यानें उदय पावलेलें आर्य-राष्ट्र

धाडसी आर्यांच्या पहिल्या टोळीनें सिंधूच्या तीरांवर येऊन केव्हां वसाहत केली व आपला पहिला यज्ञीय अग्नि तेथें केव्हां प्रज्वलित केला, हें जरी सध्यांच्या पौरस्त्य संशोधनाच्या अवस्थेंत सांगणें धाष्टर्याचें आहे, तरी इजिप्शियनांनीं आणि बॅबिलोयन लोकांनीं आपली सुभव्य संस्कृति उभारण्याच्या पूर्वीं कितीतरी आधीं, सिंधूच्या पावन जलप्रवाहाच्या कांठीं सुगंधित यज्ञधूमाचे स्तंभचे स्तंभ मंडलाकार उर्ध्व गति घेत घेत प्रत्यहिं आकाश मार्ग व्यापीत होते, आणि आत्म्याच्या अद्वैतानुभूतींतून स्फुरलेल्या वैदिक मंत्रांच्या उद्‌घोषानें सिंधूचीं दऱ्याखोरीं दुमदुमून जात होतीं. साहसी दिग्विजय करण्यास उद्युक्त करणारें त्याचे युयुत्सु पौरुष, आणि विश्वाच्या गूढ अध्यात्माचा विचार करण्याची त्यांच्या बुद्धीची प्रगल्भता, या वैशिष्टयांमुळेंच एका महान् आणि शाश्वत संस्कृतीचा पाया घालण्याचा मान त्यांच्याचकडे आपोआपच आलेला होता. आपल्या शेजारीं असलेल्या जातिबांधवांपासून—विशेषतः आर्याणांत राहणाऱ्या पारसिकांपासून—आर्य जेव्हां संपूर्ण स्वतंत्र झाले तेव्हां सप्तसिंधूच्या पार शेवटच्या सीमेपर्यंत त्याच्या वसाहती पसरलेल्या होत्या; आणि आपण स्वतंत्र राष्ट्र आहोंत ही जाणीव त्यांना आतांपर्यंत पुरेपूर झालेली होती एवढेंच नव्हे तर त्या राष्ट्राचें नाव आणि त्याची भूमीसुद्धां त्यांनीं एव्हापावेतों निश्चित केलेली होती असें दिसतें. शरीरांत पसरलेल्या ज्ञानतंतूप्रमाणें या भूमींतून अखंड वाहणाऱ्या ज्या पुष्टितुष्टिदायक सप्तसरितांच्या योगानें एक नवीन सघटित राष्ट्र अस्तित्वांत आलें, त्या नद्याविषयींच्या कृतज्ञ भक्तिभावानेंच अगदीं साहजिकच आर्यांनीं स्वतःला ' सप्तसिंधु हें नाव घेतलें, आणि हेंच नांव, जगांतील सर्वांत प्राचीन असलेल्या ग्रंथांत म्हणजेच ऋग्वेदात,-वेदकालीन भारताला दिलेलें आपल्याला दिसून येईल. आर्य हे प्रामुख्यानें कृषि करूनच राहत असल्यानें या सात नद्यांविषयीं त्यांना किती अवर्णनीय प्रेम आणि भक्तिभाव वाटत असला पाहिजे याची आपणांला सहज कल्पना येते; आणि या

आजहि हिंदुत्व हा एकच शब्द आपल्या सबंध राजकीय जीवनाचा पृष्ठवंशच होऊन राहिला आहे. नौखालींतील हिंदूंच्या दुःखामुळें क्रोधाविष्ठ होऊन बिहारी हिंदूंच्या डोळयांत सूडाचा अंगार चेतला. शीखांच्या गुरु-गोविंदांचे तर प्रख्यात वचन सावरकरानीं दिलें आहे; " इक पीर हमारा हिंदु भारा भाई चारा ॥ " ( पृ. ५८ ) (हिंदूंना व आम्हांला समान विपत्ति आहे. ) नुकतेंच पाकिस्तानी मुसलमान पुढाऱ्यांना उत्तर देतांना मा. तारा-सिंग या शीख नेत्यानें नाहीं का स्पष्टच सांगितलें कीं, " हिंदु नि शीख एकत्रच तरूं नाहींतर एकत्र बुडूं ! " आणि म्हणून हिंदुत्व हें आपल्या सबंध जातीचेंच ध्वजचिन्ह होऊन राहिलें आहे !

' आम्ही हिंदु नाहीं अन्य कोणी आहों ' अशा तऱ्हेची एक टूम मध्यें बळावत चालली होती. त्याला कारणेंहि अनेक होतीं. व त्यांतील प्रमुख कारण म्हणजे आपापल्या जातीचें स्वतंत्र राजकीय प्रतिनिधित्व मिळविणें हेंच होतें. स्वतंत्र प्रतिनिधित्व जर मुसलमानाना मिळतें तर तें शीखांनाच काय पण ब्राह्मणआदि सर्वांनींच मिळविण्यास प्रत्यवाय नाहीं असें सावरकर सांग-तात. स्वतंत्र प्रतिनिधित्व हें संपूर्णपणें चागलें नाहीं हें ते सांगतातच; परंतु या सर्वांपेक्षा त्यांतून निर्माण होणारी जातीय फुटीरपणाची वृत्ति राष्ट्राच्या दृष्टीनें अधिक घातुक आहे असें ते बजावतात. आणि शीखांच्या संबंधात जो इषारा त्यांनीं २५ वर्षांपूर्वी दिलेला आहे तो आजच्या पंजाबच्या हत्या-कांडांत दुर्दैवानें पुरेपूर खरा ठरला आहे. सावरकरानीं लिहिलें आहे, " वेगळें राहून आपलें कांहीं हित साधतें आहे असें तुम्हाला वाटेल, परंतु त्यामुळें आमच्या प्राचीनतम जातीला आणि संस्कृतीला व विशेषतः तुम्हाला, फारच हानि सोसावी लागणार आहे. कारण तुमचे हितसंबंध हिंदूंशींच अत्यंत निगडित झालेले आहेत. गत इतिहासात घडल्याप्रमाणें पुढेंहि जर परधर्मीय आक्रमकानें हिंदुसंस्कृतिविरुद्ध आपली तलवार उचलली तर लक्षांत ठेवा कीं, हिंदुजातीप्रमाणें तुमच्यावरहि तिचा प्राणघातक प्रहार झाल्यावाचून राहाणार नाहीं." ( पृ. १३० ) याकरिता " ज्या ज्या म्हणून बंधनानें तुम्ही या मूळ जातिशरीराशीं एकत्र निगडित झालेले आहांत, तें तें बंधन अधिक बळकट करण्याचा प्रयत्न तुम्ही करणें अवश्य आहे. मग तें

बंधन रक्ताचें, भाषेचें, समान सणवार—उत्सवांचें संस्कृतीचें किंवा समान मातृभूमीविषयीं वाटणाऱ्या प्रेमाचें, कसलेंहि असो. " (पृ. १४३)

इतिहासाची पुनरावृत्ति जर होत असेल, आणि इतिहासकालांत राष्ट्रावर कोसळलेल्या आपत्ति जर तशाच स्वरूपांत पुनः राष्ट्रावर कोसळत असतील तर भूतकाळापासून निघणारे इतिहाससिद्ध सिद्धान्त हेच वर्तमान काळाला तारक ठरतात यांत कसलाहि संदेह बाळगण्याचें कारण नाहीं. 'लब्ध प्रकाश इतिहास निसर्ग मानें' ही तर सावरकरांच्या बुद्धिवादी राजकारणाची बैठक आहे. बुद्ध धर्माच्या आत्यंतिक अहिंसेनें राष्ट्र जेव्हां अप्रतिकारक्षम होऊन पडलें तेव्हां अग्नि आणि तरवार हीच ज्यांची संस्कृति होती त्या रानटांनीं हिंदुस्थानवर आक्रमण केलें. राष्ट्र मरतें कीं काय असा संभव निर्माण झाला. परंतु पुनः एकदा हिंदुजातीनें आपला संघटित प्रतिकार ठाणून त्या पाशवी संस्कृतीचा उच्छेद केला. बुद्धाचा विश्वधर्म अंगिकारल्यामुळें याहि घटकेला आपलें हिंदुराष्ट्र परधर्मीय आक्रमकाच्या अत्याचारापुढें कसें दीन दुबळें आणि खंडित झालें आहे हें पाहिलें म्हणजे सावरकरांनीं सांगितलेला इतिहाससिद्ध सिद्धान्तच यावेळीं राष्ट्रानें अंगिकारला तरच कांहीं तरणोपाय आहे. तो सिद्धान्त असा "जोपर्यंत साऱ्या जगताचीं दंतनखाग्रें हिंसेच्या रक्तानें रंगलेलीं आहेत आणि जोंपर्यंत राष्ट्रीय आणि वांशिक भेद माणसाला पशुत्वाच्या कोटीस नेण्याइतके प्रबल आहेत तोंपर्यंत, आपल्या आत्मिक प्रकाशाप्रमाणें कसलेंहि आध्यात्मिक वा राजकीय जीवन हिंदुस्थानला जर उपभोगावयाचे असेल तर राष्ट्रीय आणि जातीय बंधनांतून निर्माण होणाऱ्या शक्तीची अवहेलना करून चालावयाचें नाहीं !" (पृ. २७) आणि "जो विश्वधर्म इतर राष्ट्रांचें आणि जातींचें क्रौर्य आणि पाशवी उन्माद एवढा सुद्धां कमी करूं शकत नाहीं आणि त्याची आसुरी लालसाहि तशीच वखवखलेली राहू देतो, त्या विश्वधर्माचा खरोखर काय उपयोग आहे ?" (पृ. २९)

'मुसलमानांच्या गळीं हिंदी राष्ट्रवाद उतरविण्यास कॉंग्रेस सर्वस्वीं असमर्थ नि अयशस्वी ठरली' अशी स्पष्ट कबुली नेहरू, पटेल नि कृपलानी आज देत आहेत. पण अशी कबुली देऊनसुद्धां हिंदुराष्ट्रवादाचे ते मात्र अद्यापहि कट्टवट वैरीच राहिले आहेत. परंतु त्यांच्या याच भोंगळ राष्ट्रवादामुळें

नियमाला धरून, हिंदु याच नांवानीं आर्यांना ओळखीत असल्या पाहिजेत असें दिसतें. याच्याहि पुढें, ज्या प्राकृत भाषा सिंधूच्या पुढच्या बहुतेक संतानांच्या आणि अनुलोम प्रतिलोम पद्धतीनें त्यांच्याशीं रक्तानें एकरूप झालेल्या अनेक पोट जातींच्या, नित्याच्या व्यवहारातल्या भाषा होऊन बसल्या, त्या हिंदी प्राकृत भाषांचा जन्म जेव्हा वैदिक संस्कृतातून होत होता, तेव्हा हेंच 'सिंधु' परकीय लोकांनीं म्हटलें म्हणून नव्हे तर आपण होऊनच 'हिंदु' हेंच नांव स्वतःला लावून घेत असल्याचें दिसून येतें. अहिंदु भाषांतल्याप्रमाणेंच हिंदु प्राकृत भाषातहिं अनेकदां संस्कृतमधील 'स' चें 'ह' मध्यें रूपांतर होतें. म्हणून हातीं असलेल्या निश्चित पुराव्यावरून हे निःसंशय सिद्ध होतें कीं, आपल्या पितृपूर्वजांनीं आपल्या या राष्ट्राचें आणि जातीचें 'सप्तसिंधु' किंवा 'हप्तहिंदु' हेंच पहिलें आणि जणुं पाळण्यांतलेंच नांव म्हणून निवडलें होतें. आणि त्यावेळच्या जगाला ज्ञात असलेलीं बहुतेक सर्व राष्ट्रेंहि आपणाला ' सिंधु ' अथवा ' हिंदु ' याच नांवानें ओळखीत होतीं या विषयीं संशय राहात नाहीं.

## कदाचित् प्राकृत 'हिंदू'चेंच संस्कृत 'सिंधु' हें नंतरचें रूपांतर असावें

या वेळपर्यंत आपण उपलब्ध लेखी पुराव्यांच्याच ठाम भूमीवरून प्रवास करीत चाललों होतों, परंतु आतां मात्र तर्क-अनुमानाच्या सीमाप्रदेशांत थोडासा संचार आपणाला करावयाचा आहे. आतापर्यंत आर्यांच्या मूळ वसतिस्थानाविषयींच्या अमूक एका कोणत्याच उपपत्तीचा आम्हीं आग्रहानें असा पुरस्कार केलेला नाहीं. परंतु हिंदुस्थानांत, आर्य बाहेरून आले ही बहुतेकांनीं मान्य केलेली उपपत्ती जर आपण ग्राह्य धरली, तर आर्यांनीं त्यांच्या या नव्यानें स्वीकृत केलेल्या निवसन-भूमीला जीं नांवें दिलीं तीं कोठून आलीं, या संबंधीं साहजिकच आपणास जिज्ञासा उत्पन्न होतें. त्यांनीं तीं सारीं नांवें आपल्याच भाषेंतून बनवून रूढ केली होतीं काय? आणि तसें करणें खरोखरींच त्यांना शक्य होतें का? सर्व साधारणपणें असें असतें कीं, जेव्हां आपण नव्यानेंच एखादा प्रदेश पहातों, किंवा पहिल्यानेंच एखाद्या भूमींत पाऊल ठेवतो, तेव्हां त्या भूप्रदेशाला तेथील तद्देशीय रहि-

वासी ज्या नांवानें संबोधित असतात, त्यांतच उच्चारणाच्या आपल्या सोयी-प्रमाणें व आवडीनिवडीप्रमाणें थोडा फार फेरफार करून तेंच नांव आपणहि स्वीकारीत असतों. अर्थात् हेंहि तितकेंच खरें कीं, नव्या भूप्रदेशांना आपण जीं नावें देतों तीं आपल्या पूर्वीच्याच जुन्या नावाचीं सुपुष्ट अशी मधुर स्मृति करून देणारीं अशीं असतात; आणि विशेषतः मानव वस्ती क्वचित्च असलेल्या आणि शेतीचा संस्कार न झालेल्या अशा नवीनच ज्ञात झालेल्या भूखंडात जेव्हां वसाहती केल्या जातात तेव्हा त्या भूखंडास दिलेल्या नावामध्यें ही गोष्ट हटकून पाहावयाला मिळते. परंतु नवीन भूप्रदेशाला दिलेलीं नावें तेथें नव्यानें वसाहत करणाऱ्याच्या मूळच्या देशांतीलच पूर्वीचीं नांवें होतीं हें जेव्हां सिद्ध होईल, तेव्हांच वरील उपपत्ती बरोबर ठरणारी आहे. पण तरीसुद्धां हेंहि मान्यच केलें पाहिजे कीं, नव्या भूप्रदेशांना, त्याच्या पहिल्याच प्रचलित नांवानें संबोधण्याची ही दुसरी पद्धतीच सर्वांनीं स्वीकारलेली दिसते. आता हें आपल्याला निश्चित माहीत आहे कीं, विरळ असली तरी इतस्ततः पसरलेल्या अनेक आदिवासी टोळयाची वस्ती, या सप्तसिंधूच्या प्रदेशांत होती. याच आदिवासीयांच्या कांहीं टोळया या नवीन आलेल्या लोकाशीं अत्यंत मित्रभावानें वागत होत्या असें दिसून येतें. आणि ज्या नवीन प्रदेशांत आर्य हे साहजिकच अगदीं नवखे होते, त्या प्रदेशाचीं नांवें, व नैसर्गिक परिस्थिती व मार्ग यांची माहिती करून देण्यामध्यें याच आदिवासी टोळयातील कित्येकांनीं व्यक्तिशः आर्यांना साहाय्य केलें. विद्याधर, अप्सरस्, यक्ष, राक्षस्, गंधर्व किन्नर ह्या योनि ( जाति )[1] सर्वच आणि सर्वकाळ आर्यांशीं शत्रुभावानेंच वागत होत्या असें नाहीं. कित्येक प्रसंगीं त्याचा, अत्यंत परोपकारी आणि भलेपणानें वागणाऱ्या जाति, असा उल्लेख केलेला आढळतो. यावरून साधारणतः असें वाटतें कीं, जी नावें या भूमींतील आदिवासी लोकानीं

---

१. 'विद्याधराप्सरोयक्षरक्षोगंधर्व किन्नराः।' अमरकोशामध्यें जरी या जाति स्वर्गवर्गात घातल्या असल्या तरी इतिहासावरून असें दिसतें कीं, विद्याधर यक्ष प्रभृति जाति आपणासारखींच माणसें असून आर्यांच्याबरोबर त्यांचा प्रत्यक्ष संबंध आलेला होता.

ह्या मोठमोठ्या नद्यांना पहिल्यानेंच दिलीं होतीं, त्याच नांवाची संस्कृत रूपें बनवून आर्यांनीं तीं प्रचलित केली असावींत. या संबधींचे अनेक पुरावे, परस्पर संमिश्रणानें एकजीव होऊन पुढें संवर्धित झालेल्या आर्यांच्या जातींत आणि निरनिराळ्या भाषांत सापडतात. शककंटका, मलय, मिलिंद अलसंदा ( अलेक्झांड्रिया ) सुलूव ( सेल्युकस ) इ. नांवेंच पहा. तेव्हा हें जर खरें असेल तर, या भूमींतील आदिवासी लोक महानदी सिंधूला 'हिंदु' याच नावानें ओळखीत असावेत. आर्यांनींहि उच्चारणाच्या विशिष्ट लकबीमुळें आणि 'ह' च्या ठिकाणीं संस्कृतांत 'स' च योजतात या नियमाला अनुसरून त्या मूळ 'हिंदू'चें 'सिंधु' असें रूपांतर करून तेंच रूढ केलें असावें हेंहि अगदीं शक्य असें दिसतें. म्हणून या भूमीचें आणि या भूमींत राहणाऱ्या लोकाचें 'हिंदु' हेंच नांव इतक्या पुरातन अशा अनादि कालापासून चालत आलेलें असावें कीं, 'सिंधु' हें वैदिक नाव सुद्धा त्यामानानें नंतरचें आणि त्यांचेंच दुसरें रूपांतर असल्यासारखें दिसतें. जर 'सिंधु' ह्या नावाचें प्राचीनत्व इतिहासाच्या पहाटेच्या अंधुक संधिप्रकाशांत सापडत असेल तर 'हिंदु' या नांवाच्या प्राचीनत्वाचा काल पहिल्यापेक्षां इतका मागें जातो कीं, त्या नांवाचा मूळ उगम केव्हां झाला हें निश्चित करतांना पुराणांनाहि 'नेति नेति' म्हणून हात टेकावे लागले आहेत.

## पंचनदांतून बाहेर पडून वसाहति वाढवणारे 'सिंधु'

आतां, 'सिधुं' किंवा 'हिंदु' सारख्या या धाडसी लोकांचें कार्यक्षेत्र केवळ पंचनद किंवा पंजाब या आकुंचित प्रदेशांतच मर्यादित होऊन पडणें शक्य नव्हतें. पंचनदापुढचे अमर्याद आणि सुपीक प्रदेश कोण्यातरी अचाट उद्योग आणि सामर्थ्य असलेल्या लोकांना व त्यांच्या कर्तृत्वाला जणुं कांहीं 'या' म्हणून बोलावीत होते. हिंदूंच्या टोळ्या मागून टोळ्या, पंजाबच्या या लालनभूमी ( Nursery ) तून बाहेर पडल्या; आणि महत्कार्यांचें कंकण हातीं बांधून व त्याच कार्यांचें प्रतीक असलेला यज्ञीय अग्नि आघाडीवर ठेऊन, थोड्याच अवधींत त्यांनीं तुरळक वस्तीचा, ओसाड पण अफाट असा प्रदेश वस्ती करून व्यापून टाकला. अरण्यें तोडण्यांत आलीं; शेतीची लागवड चालू झाली; नगरें भरभराटलीं; राज्यें उत्कर्ष पावलीं.

सारांश, मानवाच्या हाताचा स्पर्श होताच अजस्र वाढलेल्या पडीक निसर्गाचें रूपहि एकदम बदललें. परंतु हीं प्रचंड कामें जेव्हां यशस्वी रीतीनें पार पाडलीं जात होतीं त्याचवेळीं, व्यक्तिविषयक स्वभावधर्माला जुळेल व बदललेल्या नव्या परिस्थितीला अनुरूप होऊल, अशी एक, तितकी सुगठित नसली तरी साधारण चालचलाऊ अशी मध्यवर्ती राज्यसंस्था हिंदु निर्माण करीत होते. जसजसा काळ लोटत गेला तसेंतसें त्यांच्या नवीन वसाहतींतील अंतर वाढत गेलें, आणि सुधारणेच्या दृष्टीनें उच्च अवस्थेला गेलेल्या अनेक निरनिराळ्या जनसंघाना ते आपल्या संस्कृतींत समाविष्ट करून घेऊ लागले. त्यांच्या निरनिराळ्या वसाहतीहि स्वतःच्याच हिताहिताचा विचार करून आपलें स्वत:चें असें स्वतंत्र राजकीय जीवित उपभोगूं लागल्या. नवीन नवीन हितसंबंध निर्माण झाले, व त्यामुळें जुने लागेबांधे तर मुळींच नष्ट झाले नाहींत इतकेंच काय पण उलट ते इतके अधिकच स्पष्ट आणि दृढ होत गेले कीं, त्यापुढें जुनी व्यवस्था व जुनीं परंपरागत नावेंहि मागे पडलीं. काहींनीं आपणास 'कुरु,' तर काहींनीं 'काशी,' 'विदेह,' 'मगध' असें म्हणवून घेण्यास प्रारंभ केला; व त्यामुळें सिंधूंचीं किंवा हिंदूंची जुनीं जातिवाचक नामें प्रथम प्रथम मागें पडत जाऊन पुढें तर संपूर्ण लोपच पावलीं. परंतु त्यामुळें त्यांच्यातील राष्ट्रीय व सांस्कृतिक ऐक्याची भावना निघून गेली होती असें मात्र नाहीं. उलट त्याच भावनेनें हीं निरनिराळीं नावें व निरनिराळीं रूपें धारण केलीं इतकेंच. राजकीय दृष्ट्या त्यांच्यातील अत्यंत नावारूपाला आलेलीं संस्था म्हणजे 'चक्रवर्ति'[१] पदाची.

## खऱ्याखुऱ्या हिंदुराष्ट्राचा जन्म

शेवटीं अयोध्येच्या महाप्रतापी राजा रामचंद्रानें जेव्हां लंकेमध्यें आपलें विजयी पाऊन टाकलें, आणि उत्तर हिमालयापासून दक्षिण समुद्रापर्यंतची

---

१. त्यावेळीं विद्यमान असलेल्या सर्व हिंदु राजांना जिंकून सार्वभौम सत्ता प्रस्थापित करणाऱ्या पराक्रमी राजश्रेष्ठाला 'चक्रवर्ति' पदाची प्राप्ती होत असे.

सर्व भूमि एकछत्री सत्तेखालीं आणली त्याच दिवशीं, स्वराष्ट्र आणि स्वदेश निर्मितीचें जें महान् कार्य 'सिंधूं'नीं अंगीकृत केलें होतें, त्या कार्याची परिपूर्ती झाली; व भौगोलिक मर्यादेच्या दृष्टीनेंहि त्यांनीं अंतिम सीमा हस्तगत केली. ज्या दिवशीं, अश्वमेधाचा विजयी घोडा कुठेंहि प्रतिरोध न होतां अजिंक्य असाच अयोध्येला परत आला, ज्या दिवशीं त्या अप्रमेय अशा प्रभु रामचंद्राच्या,—त्या लोकाभिराम रामभद्राच्या—साम्राज्य सिंहासनावर सम्राटाच्या चक्रवर्तित्वाचें निदर्शक असें भव्य श्वेत छत्र धरलें गेलें, आणि ज्या दिवशीं आर्य म्हणविणाऱ्या नृपश्रेष्ठांनींच नव्हे, तर दक्षिणेकडील हनुमान, सुग्रीव, बिभिषण यांनीहि त्या सिंहासनाला आपली भक्तिपूर्वक राजनिष्ठा सादर केली, तोच दिवस आपल्या खऱ्या खुऱ्या हिंदुराष्ट्राचा,—हिंदुजातीचा—जन्मदिवस ठरला. तोच खरा आपला राष्ट्रिय दिन ! कारण, आर्यांनीं आणि अनार्यांनीं एकमेकांत पूर्णपणें मिसळून एका नवीन अशा संघटित राष्ट्राला त्या दिवशीं जन्म दिला. या दिवशीं पूर्वीच्या सर्व पिढ्यांचे प्रयत्न फळाला येऊन त्यावर राजकीय दृष्ट्या यशाचा कळसच चढला व त्यानंतरच्या सर्व पिढ्या ज्या करितां बुद्धिपुरस्सर किंवा अबुद्धिपुरस्सर झुंजल्या आणि झुंजतां झुंजतां प्रसंगीं पडल्याहि, त्या समान ध्येयाचा, समान ध्वजाचा आणि समान कार्याचा वारसा तेव्हापासून हिंदुजातीकडे परंपरेनें चालत आला.

## 'आर्यावर्त' आणि 'भारतवर्ष'

एकात्मतेच्या भावनेला, जर तिच्यांतील सर्व अर्थ उच्चारासरसीं व्यक्तविणारें एखादें व्यापक नांव प्राप्त झालें, तर त्या भावनेलाहि एक प्रकारचा जोर चढतो असा अनुभव आहे. सिंधुपासून समुद्रापर्यंत पसरलेल्या या भूमींत एकात्मतेची जी प्रचंड भावना उसळून राहिली होती, आणि जींतून एक अभिनव राष्ट्र उभें करण्याचा संकल्प प्रकट होत होता, त्या एकात्मतेच्या भावनेचें यथार्थ स्वरुप व्यक्तविण्यास ' आर्यावर्त ' किंवा ' ब्रह्मावर्त ' हे शब्द तितकेसे उपयक्त ठरले नाहींत. प्राचीन लेखकांनीं आर्यावर्ताची जी व्याख्या दिलेली आहे तींत, हिमालयापासून विंध्याद्रीपर्यंतचा प्रदेश म्हणजेच आर्यावर्त असें लिहिलेलें आहे. " आर्यवर्तः पुण्यभूमिर्मध्य-

विन्ध्य हिमालयोः " ॥ आणि ज्या परिस्थितींतून ही व्याख्या जन्मली त्या-काळच्या परिस्थितीला ही व्याख्या जरी सर्वस्वीं अनुरूपच ठरली, तरी आणि म्हणूनच. ज्या महान जातीनें, आर्य आणि अनार्य याची एक संयुक्त जाति निर्माण केली व जिनें आपली संस्कृति नि आपलें साम्राज्य विंध्याद्रीच्या पार निमुळत्या शिखरांच्याहि पलीकडे सुदूरवर पोचविलें, त्या जातीला, सर्वांना समाविष्ट करणारें असें नांव प्राप्त करून देण्यास त्या व्याख्येचा काहींच उपयोग झाला नाही. हिंदुराष्ट्राच्या या विराट कल्पनेला व्यक्तविणारें सुयोग्य नांव शोधून काढण्याची अडचण, जेव्हां भरतानें या हिंदुराष्ट्राचें अधिराज्य साऱ्या जगभर स्थापिलें तेव्हाच थोड्याफार यशस्वी रीतीनें दूर झाली. आतां, हा भरत वैदिक भरत होता कां जैन पुराणातील भरत होता या विषयीं, तर्कवितर्क लढवित बसण्याचा खटाटोप आम्ही करणार नाहीं. येथें इतकेंच सांगितलें म्हणजे पुरें आहे कीं, आर्यावर्तातील आणि दक्षिणापथांतील लोकांनीं या नावाचा केवळ नुसताच स्वीकार केला होता असें नसून, तें नांव आपल्या समान मातृभूमीला आणि समान सांस्कृतिक साम्राज्याला अनुलक्षून वापरण्यांत, त्यांना अभिमान आणि धन्यता वाटे. अशारीतीनें दक्षिणेच्या दिशेनें जसजसा नवीन क्षितिज, दिग्विजयाच्या कक्षेंत येऊं लागला, तसतसें आपणाला दिसून येईल कीं, पराक्रमी कार्यकर्तृत्वाचा गुरुत्वमध्यहि साहजिकच सप्तसिंधूंतून गंगेच्या प्रदेशांत येऊन स्थिरावला; आणि ज्यामध्यें उत्तर हिमाचलापासून दक्षिण समुद्रापर्यंतच्या प्रदेशाचा एकाच वेळीं समावेश होऊ शकत होता, अशा भरतखंड या राजकीय दृष्ट्या सुभव्य नांवापुढें 'सप्तसिंधु' 'आर्यावर्त' किंवा 'दक्षिणापथ' हीं नांवें लोप पावलीं. श्रेष्ठ विचारवंताच्या मनांमध्यें ज्या वेळीं या विराट राष्ट्रकल्पनेचा नुकताच उदय होऊं लागला होता, त्या कालात आपल्या राष्ट्राची जी व्याख्या सिद्ध करण्याचा प्रयत्न झालेला दिसतो, त्यावरूनहि वरील गोष्टच सिद्ध होते. विष्णुपुराणामध्यें आलेल्या एका लहानशाच परंतु अत्यंत सुटसुटीत अशा अनुष्टुपामध्यें जी व्याख्या सांपडते, त्यापेक्षां दुसरी अधिक सुंदर व्याख्या अद्यापि तरी आमच्या पाहाण्यांत नाहीं. विष्णुपुराणांतील ती व्याख्या अशीः-" उत्तरयत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणम्।
वर्षतद्भारतं नाम भारती यत्र संततिः ॥ "

## साऱ्या जगानेंहि ' हिंदु ' आणि 'हिदुस्थान' हींच नांवें पत्करिलीं

परंतु 'भारतवर्ष'हें नवें नांव आपल्या 'सिंधु' या पाळण्यातील मूळ नांवाला कांहीं संपूर्णपणें नष्ट करूं शकलें नाहीं. किंवा जिच्या अंकप्रदेशांत वाढून आपल्या पितृपूर्वजांनीं जिचें जीवनदुग्ध प्राशन केलें होतें त्या सरिच्छ्रेष्ठा सिंधूच्या पुण्यनांवाविषयीं आपल्या मनांत वसत असलेलें प्रेमहि त्यामुळें कमी झालें नाहीं. सिंधूच्या तीरप्रदेशात वसलेला सरसीमाप्रात-सुद्धां अद्याप सिंधु या प्राचीन नावानेंच संबोधिला जातो. आणि उभ्या संस्कृत वाङ्मयामध्यें सर्वत्र 'सिंधुसौवीर' हे आपल्या राष्ट्राचे अत्यंत महत्वाचे आणि अभिन्न असे घटक समजले जात होते असें दिसतें. महाभारतांत सिंधु सौवीर देशच्या राजाचा–जयद्रथाचा–कौरवपाडवांच्या युद्धांत ठळकपणानें उल्लेख केलेला आहे आणि भरताचे आणि त्याचे अत्यंत जवळचे नातें होतें असेंहि कोणी म्हणतात. सिंधु राष्ट्राच्या सीमा जरी वेळोवेळीं बदलत गेल्या तरी, त्याहि वेळेला आणि आजहि ती एक स्वतंत्र जाति आहे हें कुणाळाहि नाकारतां येणार नाहीं. आणि मुलतान पासून तों खालीं समुद्रा-पर्यंत 'सिंधी' नांवाची जी भाषा बोलली जाते, तीवरून तर हें स्पष्टच सूचित केलें जातें कीं, ती भाषा बोलणारे लोक हे 'सिंधू'च असून भौगोलिक आणि राजकीय दृष्टयाहि त्यांना, हिंदूंच्या समान राष्ट्राचेच घटक होण्याचा अधिकार प्राप्त होतो. हिंदुस्थानांतील आपल्या राष्ट्राचें पहिलें पाळण्यांतील नांव, 'भरतखंड' या नव्या नांवानें जरी मागें पडलें, तरी परकीय राष्ट्रांनीं मात्र त्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं; आणि सरसीमेवरच्या प्रांतानीं आपलीं जुनीं प्राचीन नांवेंच परिपाठांत ठेवल्यानें आपल्या अगदीं शेजारच्या पारशी, ज्यू, किंवा ग्रीक या लोकांनींहि आपलें पूर्वीचे सिंधु' किंवा 'हिंदु' हेंच नाव नेहमींच्या उपयोगांत ठेवलें. आता सिंधूच्या तीर प्रदेशातील प्रांतांनाच ते हें नांव लावीत होते असें नाहीं तर पूर्वीच्या सिंधूंनीं निरनि-राळया घटकांना आत्मसात करून व दिग्विजय करून ज्या नव्या राष्ट्राचे संवर्धन केलें त्या सर्व राष्ट्राला ते सिधु ह्याच नांवानें संबोधूं लागले. अव्हेस्टिक पारशी आपणांस हिंदु याच नांवांनें ओळखतात. ' हिंदु '

मधील कठोर वर्ण गाळून ग्रीक लोक 'इंडोज' असें म्हणतात; आणि याच ग्रीकाचें अनुकरण करून सर्व युरोप व नंतर अमेरिकाहि आपल्याला हिंदु किंवा इंडियन्स असेंच संबोधूं लागली. आपल्या येथें बराच काल वास्तव्य करून राहिलेला चिनी प्रवासी ह्युएन्त्संग हाहि आपणाला 'शिंतु' किंवा 'हिंदु' असेंच नेहमीं म्हणतो. पार्थिअन् लोक[१] अफगाणिस्तानला 'श्वेतभारत' म्हणत. असलीं तुरळक चारदोन उदाहरणें सोडल्यास, आपलें जुनें मूळ नाव बहुतेक कोणीहि परकी लोक विसरले नव्हते किंवा 'भारत' हें नवें नांवहि त्यांनीं स्वीकारलें नव्हतें. आपल्या वेदकालीन मूळ पूर्वजांनीं ह्या नावाची पहिल्यानेंच निवड केली, आणि त्यांच्या राहिलेल्या इच्छा पुऱ्याकरण्यासाठींच कीं काय, अगदीं आतापर्यंत सारें जग आपल्या जातीला 'हिंदु' आणि आपल्या या भूमीला 'हिंदुस्थान' असेंच संबोधित आलें आहे.

## कोणतें नांव रूढ होतें ?

परंतु कोणतेंहि नाव हें जें सुप्रतिष्ठित किंवा रूढ होतें तें, आपणांला अमुक एक नाव आवडतें यामुळें होत नसून, सामान्यतः इतर लोकाना आपणाला कोणतें नाव द्यावेसें वाटतें यामुळेंच तें मान्यता पावतें. वस्तुस्थितीच अशी आहे कीं, याचकरिता खरोखर नांव हें अस्तित्वात येत असतें. कारण कोणतेंहि नाव किंवा कसलेंहि रंगरूप जरी नसले, तरी स्वतःची स्वतःला ओळख ही केव्हांहि निरपवादपणें असतेच असते. परंतु हाच 'स्व' जेव्हा दुसऱ्या 'परा'च्या सान्निध्यांत किंवा संघर्षात येतो तेव्हां, आणि जेव्हां त्याला दुसऱ्याशीं व्यवहार–संबंध ठेवण्याची किंवा दुसऱ्यांनीं

१. पार्थिआ देशात राहणारे, म्हणजेच पृथू लोक. कुंतीला पृथा हें नाव होतें. कदाचित् ती पार्थिआची राजकन्याहि असेल. पार्थिआ देश कास्पियन समुद्राच्या आग्नेयीस होता. हा सध्यांचा खोरासान प्रात होय. पहिल्या मिथ्रिडाटीसनें ( खि. पू. १७०–१३८ ) पार्थियन साम्राज्याचा पाया घातला.

त्याच्याशीं तसे ठेवण्याची गरज उत्पन्न होते तेव्हां मात्र, त्या 'स्व'ला कांहीं तरी नाव असणें अवश्य ठरतें. दोघानींच खेळतां येण्याच्या खेळाप्रमाणें ही गोष्ट आहे. जगानें जर असाच आग्रह धरला कीं, शिक्षकाला किंवा विनोदी माणसाला 'अष्टावक्र'[1] किंवा 'मुल्ला दो प्याजा'[2] याच नावांनीं अतःपर ओळखावें, तर या माणसांचीं तींच नावें बहुधा रूढ होण्याची शक्यता जास्त. जगानें आपल्यासाठीं ठरविलेलें नांव जर आपल्या इच्छेच्या अगदींच विरुद्ध नसलें तर, निश्चितच तें दुसऱ्या इतर नांवाना आपोआप मागें टाकतें. उदाहरणें म्हणून 'पागे' 'मुजुमदार' 'पेशवे' हीं नांवें पाहा. परंतु सर्व जगानें जर असें एखादें नांव शोधून काढलें कीं, जें आपणाला आपल्या पूर्व वैभावाची व पूर्व ऋणानुबंधाची स्मृति घडविणारें आहे तर मग असें नांव इतर नांवांना नुसतें मागें टाकतें इतकेंच नव्हे तर त्या सर्वांपेक्षां अधिक चिरंजीव होतें. ही वस्तुस्थिति व जिच्यामुळें बाहेरच्या जगताशीं आपला प्रथमच घनिष्ठ असा संबंध आला व नंतर तितकाच कठोर संघर्षहि घडला ती परिस्थिति, या दोहोंमुळें आपलें हिंदु हें नांव पुन्हा एकदा इतक्या जोरदारपणानें प्रसिद्धीला आलें कीं, त्या योगानें आपलें पूर्वींचें अत्यंत प्रिय असें 'भरत खंड' हें नांवहि मागे पडलें.

---

१. अष्टावक्र हा कहोड ऋषीचा मुलगा. कहोड ऋषी अध्ययन करीत असतां यानें आईच्या गर्भांतूनच 'अजूनच अध्ययनच कां करता ?" असा कुत्सित प्रश्न त्याला केला. त्यामुळें रागावून कहोडानें अष्टावक्रास शाप दिला. त्यामुळें तो आठ ठिकाणीं वांकडा झाला. पुढें मधुविला नदींत स्नान घालून कहोडानें त्याचें अंग सरळ केलें.

२. अकबराच्या दरबारांतील खुषमस्कऱ्या.

# ३

## बुद्ध धर्माच्या अभ्युदयामुळें नि ऱ्हासामुळेंहि 'हिंदु' या नांवाला अधिक चालना मिळाली

बुद्ध धर्माचा उदय होण्यापूर्वी, हिंदूंचे बाहेरच्या जगताशीं जरी यत्किंचित्‌हि संबंध तुटलेले नव्हते, आणि "एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः । स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वे मानवाः ॥ (मनु) असें आपल्या स्वराष्ट्राभिमानी स्मृतिकारानींहि गर्जून सांगावें इतकें आपल्या जागतिक पराक्रमाचें क्षेत्रहि जरि अतिविस्तृत झालें होतें तरी, प्रस्तुतच्या विवेचनाचा विचार करतां, बुद्ध धर्माच्या अभ्युदयानंतर हिंदुस्थानचें आंतरराष्ट्रीय जीवन कोणत्या प्रकारचें होतें, या संबंधींचा विचार प्रामुख्यानें करणें आपणाला प्राप्त आहे. कारण आतां काळच असा आला होता कीं, या आपल्या भूमींत राजकीय आक्रमण-विस्ताराच्या सर्व मर्यादाच संपल्यामुळें राजकीय दिग्विजयांना एवढासुद्धां वाव उरलेला नव्हता. ह्यावेळीं आपल्या लोकाच्या राष्ट्रीय आकांक्षा स्वतःच्या देशाचे सीमान्त ओलांडून इतक्या विस्तृत प्रमाणावर बाहेरच्या जगताचें क्षेत्र आक्रमूं लागल्या कीं, त्याला मागील इतिहासांतसुद्धां तोड न सांपडावी. त्याचप्रमाणें बाहेरच्या जगताशींहि त्यांचे संबंध इतके व्यापक आणि गुंतागुंतीचे झाले कीं, तसें ते आजपर्यंत पूर्वी कधींच झाले नव्हते. हें तर खरेंच, पण याहिबरोबर परकीय आक्रमक राष्ट्रेंहि, आजपर्यंत पूर्वी न दाखविलेल्या उद्धटपणानें व जबरदस्तीनें आपल्या देशाचीं दारें ठोठावूं लागलीं. या राजकीय घडामोडीबरोबरच बुद्ध भगवानाच्या धर्म-चक्र-प्रवर्तनाच्या महान् अवतार कार्याला प्रारंभ झाला व त्यावेळीं ज्ञात असलेल्या जगताचा हिंदुस्थान हा हृदयच काय, पण आत्माच होऊन बसला! मिसरपासून मेक्सिकोपर्यंतच्या लक्षावधि असंख्य लोकांना सिंधूंची ही भूमि म्हणजे त्यांच्या देवांची आणि संतांची पवित्र पुण्यभूमीच होऊन राहिली! दूरदूरच्या खंडांतून सहस्रावधि भाविक यात्रेकरू या भूमींत गोळा होऊं लागले; व हजारों विद्वान्, धर्मोपदेशक, साधूसंत, त्यावेळीं ज्ञात असलेल्या जग-

ताच्या कानाकोपऱ्यांत, येथून जाऊन संचार करूं लागले. परंतु बाहेरच्या जगतानें आपणाला आपल्या पूर्वीच्याच 'सिंधु' किंवा 'हिंदु' याच नांवानें संबोधिण्याचें चालू ठेवल्यानें, वर सांगितलेल्या या आवक–जावकचा उपयोग आपलें पूर्वीचें तेंच जुनें नांव, आपलें सर्वमान्य राष्ट्रीय नाव म्हणून निश्चित करण्यात अतिशयच झाला. जीं राष्ट्रें आपणाला 'हिंदु' किंवा 'सिंधु' याच नांवानें आपणांशीं व्यवहार करीत होतीं, त्या राष्ट्रांशीं राजकीय किंवा शिष्टाईसंबंधाचा (Diplomatic) प्रतिपत्रव्यवहार करण्याच्या प्रसंगीं आमच्या लोकांना 'हिंदु' हें नाव–प्रथम प्रथम भरतखंड या नावाबरोबर व पुढें पुढें तेंहि पार वगळून–परिपाठांत ठेवणें अवश्य वाटलें असलें पाहिजे.

परंतु साऱ्या जगभर 'हिंदु' हें नाव प्रसृत होण्याला व आपण 'हिंदू'च आहोंत हीं भावना आपल्या ठिकाणीं अधिकाधिक मुरण्याला, बुद्ध धर्माचा अभ्युदय जर कारणीभूत झाला असेल तर आश्चर्याची गोष्ट ही कीं, बुद्धधर्माच्या ऱ्हासामुळेंसुद्धां ही परंपरा अधिकच वाढीला लागल्याचें दिसतें.

## बौद्ध धर्माच्या ऱ्हासाचें कारण नैतिक नसून राजकीयच होतें

बुद्ध धर्माचा ऱ्हास होण्यास जीं अनेक कारणें घडली त्यातील सर्वांत महत्त्वाचें असें जें एक कारण आहे त्याकडे विद्वानांचें जावयाला पाहिजे होतें तितकें बारकाइनें लक्ष गेलें नसावें असें आम्हांला वाटतें. परंतु प्रस्तुतच्या विवेचनाशीं त्या विषयाचा फार दूरचाच संबध असल्यामुळें त्याचा ऊहापोह करण्याची येथें आवश्यकता नाहीं. या ठिकाणीं आम्ही त्या संबंधीं सर्व साधारण विचार मांडून, त्यावर चिकित्सकपणें मतप्रदर्शन करण्याचें काम ( जर त्या विषयांतील अधिकारी व्यक्तींनीं तें केलें नाहीं तर ) दुसऱ्या एखाद्या प्रसंगावरच सोंपवून देणार आहोंत. तत्त्वज्ञान निराळें म्हणूनच काय केवळ आपलें राष्ट्र बुद्धधर्माविरुद्ध चिडून उठलें असेल काय ? निःसंशय नाहीं ! कारण अशा प्रकारचीं निरनिराळीं तत्त्वज्ञानें आणि पंथ येथें आतापर्यंत होते आणि शेजारींशेजारीं राहूनहि ते वाढत होते. तर मग बौद्ध मठातील वाढता भ्रष्टाकार व बौद्धपंथाला सर्व साधारण येत चाललेले मांद्य, यामुळें ही गोष्ट घडून आली असेल काय ? निश्चित नाहीं ! कारण, काहीं

विहारांतून दुसऱ्यांच्या कमाईवर आपला चरू चालविणाऱ्या आणि स्वतः न मिळविलेल्या पैशातून आपल्या अश्लाघ्य चैनी आणि विलास उपभोगणाऱ्या स्वैराचारी, आळशी आणि नीतिभ्रष्ट स्त्रीपुरुषांचें कळपच्या कळप रहात होते हें जरी खरें आहे तरी, इकडे दुसरीकडे अध्यात्माच्या परमोच्च पदाला पोंचलेल्या अर्हतांची आणि भिक्षुश्रेष्ठाची महान् परंपरा ही कांहीं नष्ट झालेली नव्हती! आणि पुन्हा दुसरें असें कीं, वरील प्रकारचें दुराचार केवळ बुद्धाच्या मठातच दिसून येत होते असें नाहीं. परंतु बौद्ध धर्माच्या प्रसाराचें राजकीय परिणाम जर आमच्या राष्ट्राच्या पौरुषाला नि आमच्या जातीच्या अस्तित्वालाच मारक ठरलें नसतें तर वर वर्णिलेले आणि दुसरे अनेक दोष त्या धर्मात असूनहि, त्याला इतक्या भयंकर विरोधाला कधींच तोंड द्यावें लागलें नसतें; किंवा त्यामुळें हिंदुस्थानांतील बौद्धांची सत्ताहि कमी झाली नसती. जेव्हां तो पूर्वीचा शाक्य युवराज आपल्या बौद्धधर्म मंदिराच्या पायाचा पहिला दगड रचीत होता आणि याचवेळीं जेव्हां त्याला त्याचें लहानसें प्राजक नष्ट झाल्याची बातमी कळविण्यांत आली, तेव्हांच्या त्या शाक्यसिंहाच्या[१] आयुष्यांतील प्रसंगापेक्षां, दुसऱ्या कोणत्याहि भयंकर दुःखपर्यवसायी शोकनाटकाचा प्रारंभ, इतका नाट्यपूर्ण नि पुढें कोसळणाऱ्या सर्वनाशाची छाया आधींच सूचित करण्याच्या दृष्टीनें इतका परिणामी, क्वचित्‌च घडला असेलसें वाटतें.

## शूर आणि बलवान माणसांचा राष्ट्राला तुटवडा

बुद्धानें आपल्या जातींतील निवडक निवडक माणसें वेंचून काढून त्यांना भिक्षु संघात प्रविष्ट करून घेतल्यामुळें शाक्यांच्या प्रजासत्ताक राज्यास पहिल्या प्रतीच्या शूर आणि बलवान माणसास मुकावें लागलें; व पुढें त्याचाच परिणाम म्हणून अधिक समर्थ व अधिक लढवय्या शत्रूपुढें,[२]

१. राजपुत्र सिद्धार्थ गौतम.

२. कोसलचा राजा विद्युद्गर्भ यानें शाक्य प्राजकावर आक्रमण करून शाक्यांचा पराभव केला. याच विषयावर लिहिलेलें सावरकराचे ‘ सन्न्यस्त खड्ग ’ हें नाटक अवश्य वाचनीय आहे.

शाक्यसिंहाच्या डोळ्यादेखत तें शाक्यांचें राष्ट्र नष्ट होऊन गेलें. ज्यावेळेला ही बातमी शाक्यसिंहाला कळविण्यांत आली, तेव्हां त्या बुद्धकोटीला गेलेल्या महात्म्याला त्याविषयीं कांहींच सुखदुःख झालें नाहीं असें सांगतात. त्यानंतर शतकामागून शतकें निघून गेली. शाक्यांचा राजा आतां सर्व राजाचा राजाधिराज, सर्व जग जिंकणारा विजेता, 'लोकजित्[1]' होऊन बसला! नि त्या लहानशा शाक्य प्राजकाच्या सीमा वाढत जाऊन हिंदुस्थानच्या सीमेला जाऊन भिडल्या; आणि कविप्रणीत अंतिम दैवी सत्याला आणि परमोच्च न्यायाला अनुसरूनच जणु कांहीं, कपिल वस्तूच्या[2] प्राजकावर जो नियतीचा काळफेरा आला होता तोच फेरा उभ्या भारतवर्षावर वळला; आणि तें अवघे भारतीय राष्ट्र बलशाली आणि लढाऊ असलेल्या-त्यांच्याच जातीच्या शाक्यांप्रमाणें लढाऊ नव्हे मात्र!—लिच्छवी आणि हूण[3] लोकांच्या भक्ष्यस्थानीं पडलें! अर्थात् हीहि बातमी जर शाक्यसिंहाला पहिल्या बातमीप्रमाणेंच कळविण्यांत आली असती तर, त्या बुद्धपदाला पोंचलेल्या महात्म्याच्या मनाला पूर्वीप्रमाणेंच यत्किंचित्हि व्यथा झाली नसती. परंतु ज्यांचा रानटी हिंसकपणा अहिंसेच्या आणि विश्वबंधुत्वाच्या मिळमिळित तत्त्वपठणानें शमणारा नव्हता व ज्याच्या खड्गाची धार मृदु तालवृतांनीं आणि शांतीच्या अनुष्टुपानीं बोथटण्यासारखी नव्हती, त्या आक्रमकांनीं लादलेलें राजकीय दास्याचें तें जहर, त्यावेळच्या हिंदूंना निर्विकार मनानें बुद्धाप्रमाणें घशाखाली उतरविणें शक्य नव्हतें. याचा अर्थ असा नव्हे कीं, या भिक्षुसंघानें केलेल्या विश्वबंधुत्वाच्या महनीय कार्याला किंवा त्याच्या उदात्त धर्माला आम्ही केव्हाहि कमी लेखतों. छे!

१. गौतमबुद्धाला देण्यांत आलेलें नाव.

२. शाक्याची राजधानी.

३. स्कंदगुप्ताच्या राजवटींत (खि. ४५५-४८०) वायव्येकडून मध्य आशियातील हूण लोक येऊन त्यानीं हिंदुस्थानावर स्वारी केली. हूणांचा नायक तोरमान यानें गुप्तांचा पराभव करून खि. ४९९ मध्यें उज्जयनीचें राज्य बळकावलें. पुढें माळव्याच्या यशोधर्म्यानें खि. ५२८ मध्यें हूणांना हुसकून दिलें.

हे ! त्यांच्यावर तसा आरोप करण्याचेंहि आमच्या मनात चुकूनसुद्धां येत नाहीं ! इतिहासाच्या कोणत्याहि अभ्यासकाच्या लक्षांतून न सुटण्याइतकी जी भडक युति या ठिकाणीं दृष्टींत भरते तिचाच केवळ आम्ही येथें निर्देश करणार आहोंत.

## आधुनिक शिक्षितांचें इतिहासविषयक बौद्धिक दास्य

आम्हांला हें माहीत आहे कीं, आमच्या वरील विधानाला प्रत्युत्तर म्हणून, आजपर्यंत जेवढे म्हणून पराक्रमी आणि थोर थोर ज्ञात हिंदु सम्राट आणि नृपश्रेष्ठ झाले, ते ते सर्व बौद्ध कालांतच होऊन गेले ही गोष्ट पुढें करण्यात येईल. होय; परंतु ते सम्राट ज्ञात कुणाला होते ! तर, युरोपियनाना नि ज्यानीं त्याच्या ( युरोपियनाच्या ) विचारांबरोबर त्यांचे विपरीत आणि पूर्वग्रह दूषित दृष्टिकोनहि नकळतपणें जसेच्या तसेच घेतले होते त्या आमच्याचपैकीं कांहींना ! एक काळ असा होता कीं, हिंदुस्थानांतील प्रत्येक शालेय इतिहास पुस्तकाचा प्रारंभ मुसलमानांच्या स्वाऱ्यांपासूनच झालेला असावयाचा. कारण, त्यावेळच्या बहुतेक सर्व इंग्रज लेखकांना आमच्या प्राचीन इतिहासाविषयीं जवळ जवळ अज्ञानच होतें. आतां अगदीं अलीकडे युरोपचें सामान्य ज्ञान, बौद्धधर्माच्या अभ्युदयाच्या कालापर्यंत मागें जाऊन पोंचलें आहे ! आणि म्हणून आपल्या इतिहासांतील पहिला आणि अत्यंत वैभवशाली काल तो हाच असें आपणहि त्यास समजूं लागलों. वस्तुस्थिति अशी आहे कीं, त्या दोन्हीहि गोष्टी सत्य नाहींत. स्वतः बुद्धाविषयीं किंवा बौद्ध धर्माविषयीं किंवा त्याच्या भिक्षुसंघाविषयीं आम्हांला जें प्रेम, जें कौतुक आणि जो आदर वाटतो त्यात आम्ही कुणालाहि हार जाणार नाहीं. त्याचे महान् पराक्रम आमचेच आहेत आणि त्याचे पराजयहि आमचेच आहेत. तो देवप्रिय अशोक[1] महान् होता; आणि बौद्ध भिक्षूंचे दिग्विजयहि त्याहिपेक्षां अधिक महनीय होते. परंतु याच्यापेक्षां मोठे नसले तरी

---

१. सम्राट अशोक किंवा अशोकवर्धन हा महान् राजा ख्रि. पू. २७३–२३७ या कालांत होऊन गेला. चंद्रगुप्ताचा मुलगा बिंदुसार व त्या बिंदुसाराचा हा मुलगा. अशोकानें बौद्धधर्माच्या प्रसारार्थ अतोनात श्रम केले.

निदान यांच्याइतके श्रेष्ठ दिग्विजय आणि अशोकां इतकेच शुद्धाचरणी व राजकारण कौशल्यांत त्याच्यांहिपेक्षां निपुण व मुत्सद्दी, असे राजे या कालाच्याहि पूर्वी होऊन गेलेले होते. आणि तसे ते होते म्हणूनच तर ते तितके महान् ठरले आहेत. म्हणून आमच्या जातींत दिसून येणारा राजकारणांतील तल्लखपणा आणि व्यक्तीमध्यें विकसित पावलेल्या उदार चारित्र्याची उंची, मौर्यांनीं[1] बौद्ध धर्माचा स्वीकार केल्यामुळें प्राप्त झाली होती, किंवा मौर्यांच्या बरोबर तिचा लोप झाला, असें आम्हांला मुळींच वाटत नाहीं. हां! बुद्ध धर्मानेंहि दिग्विजय केले आहेत. मात्र ज्या या प्राकृत जगतात, जेथें मातीच्या पायांवर दीर्घकाळ उभे रहाता येत नाहीं; जेथें तरवारींना सहज धार लावतां येते; आणि तृष्णा म्हणजे तहान हीं जेथें इतकी बलवत्तर आणि खरीखुरी आहे कीं, ती चित्रांत रंगविलेल्या अखंड वाहणाऱ्या जलप्रवाहाच्या नुसत्या दर्शनानें कधींच तृप्त होत नाहीं; त्या या जगतात ते दिग्विजय करण्यांत आलेले नसून या जगापेक्षा फार निराळ्या जगामध्यें ते करण्यांत आलेले आहेत! आणि नेमके हेच विचार जेव्हां ज्वालामुखीच्या लाव्हारसाच्या लोटाप्रमाणें शक[2] आणि हूण या देशांत घुसले, आणि येथें बहरलेलीं व भरभराटलेली सारी संस्कृति त्यानीं जेव्हां जाळून पोळून उध्वस्त करून टाकली, तेव्हां आमच्यातील देशाभिमानी विचारवंताच्या अंतःकरणाला चाटून गेले असतील.

---

१. नंद घराणें धुळीला मिळवून, चाणक्याच्या साहाय्यानें चंद्रगुप्तानें आपलें मौर्य साम्राज्य स्थापिलें. बिंदुसार, अशोक हे मौर्यच होते. चंद्रगुप्ताच्या आईचे नांव 'मुरा' होतें; त्यावरून मौर्य हें नांव पडलें असावें.

२. बॅक्ट्रियाच्या उत्तरेस ऑक्सस व जक्सार्टिस ह्या नद्यांमधील प्रदेशात सिथियन किंवा शक नांवाचे रानटी लोक होते. प्रथम ते बलुचिस्थानांतून सिंध व पंजाब प्रांतात घुसून आले. (खि. पू. १२०). पुढें उज्जयनी, मथुरा, काठेवाड, तक्षशिला या प्रांतात शकांचीं लहान लहान राज्यें पसरलीं. तीं पांचव्या खि. शकापर्यंत नांदत होती. उत्तरेस कुशान, पूर्वेस गुप्त व दक्षिणेस आंध्र यांनीं विरोध केल्यामुळें पुढें यांची सत्ता संपुष्टांत आली.

## 'अग्नि' आणि 'तरवारी'चें तत्त्वज्ञान

हिंदूंच्या डोळ्यांदेखत, त्यांच्या जातीनें उराशीं बाळगलेली महान् ध्येयें, त्यांचीं सिंहासनें, त्यांचीं कुटुंबें आणि त्यांनीं पूजिलेले देवमुद्धां पायाखालीं तुडविले गेले; आणि त्याची प्रिय नि पवित्र पुण्यभूमीहि उध्वस्त आणि उजाड करून टाकलेली त्याना पाहावी लागली. आणि हें सर्व कोणी केलें? तर जे हिंदूपेक्षां भाषेनें, धर्मानें, तत्त्वज्ञानानें आणि माणुसकीच्या नि देवत्वाच्या सर्व दया-क्षमादि गुणांनीं अत्यंत हीन, परंतु केवळ शक्तीनें श्रेष्ठ होते अशा रानटी आक्रमकांनीं! या रानटाच्या अरेराव पंथाचे सार 'अग्नि आणि तरवार' या दोन शब्दांत ग्रथित केलेलें होतें! या सर्व घटनेवरून निघणारा निष्कर्ष स्पष्टच होता कीं, 'अग्नि आणि तरवार' याच्या या विलक्षण तत्त्वज्ञानाला,–या नव्या भयंकर द्वैतवादाला–समर्पक प्रत्युतर बौद्धांच्या न्यायमीमांसेंत सांपडण्यासारखें नव्हतें. म्हणून रानटाच्या या अपवित्र आणि विध्वंसक अग्नीचाच विध्वंस करण्यासाठीं, आमच्या जातींतील विचारवंत आणि कृतिवंत पुढाऱ्याना आपला पवित्र यज्ञाग्नि चेतविणें भाग पडलें! समर्थ शस्त्रास्त्राच्या प्राप्तीकरितां त्यांना पुन्हा आपल्या वेदकालीन प्रदेशातील खाणी खोदाव्या लागल्या; आणि कोपलेल्या 'महाकाला'ला शांतविण्यासाठीं उपयोजिल्या जाणाऱ्या शस्त्रास परजण्यासाठीं त्यांना भीषण कालीच्या वेदीवर तें धारवावें लागलें! व या दृष्टीनें त्यांचा अपेक्षित तर्कहि काहीं चूक ठरला नाहीं.

## हिंदु खड्गानें दिलेलें चपखल उत्तर

फिरून एकदां प्रकट झालेल्या हिंदु खड्गाचा हा विजय इतका निर्विवाद्य होता कीं, तेथें शंकेला स्थानच राहिलें नाहीं! ज्या विक्रमादित्यानें[१]

१. समुद्र गुप्ताचा मुलगा दुसरा चंद्रगुप्त यानेंच पुढें विक्रमादित्य हें नांव घेतले ( खि. ३७५--४१३ ). माळव्यांतील क्षत्रपाचा पराभव करून उज्जयिनी येथें त्यानें आपली राजधानी स्थापन केली. खि. पू. ५७ पासून हिंदुस्थानांत सुरू झालेल्या कालगणनेस पुढें याचेंच नांव मिळालें. आज चालू असलेला 'विक्रमसंवत्' तो हाच.

परकीय आक्रमकांना हिंदुस्थानच्या भूमींतून पार हुसकून लावले, आणि ज्या ललितादित्यानें त्या शत्रूला मंगोलियाच्या आणि तार्तारच्या गुहा कपाऱ्यांतच पकडून शासन दिलें, तो विक्रमादित्य आणि तो ललितादित्य[१] हे दोघे एकमेकाला पूरक असेच होते. शाब्दिक तत्त्व प्रमेयांनीं जें जमलें नाहीं तें नुसत्या पराक्रम पौरुषानें करून दाखविलें. पुन्हां एकदां राष्ट्र, यशाच्या परमोच्च शिखरांवर विराजमान झालें आणि जीवनाच्या प्रत्येक शाखेंतून त्याची प्रभा फाकूं लागली. सामर्थ्य, स्वातंत्र्य आणि सुयश यांची जाणीव प्रकट झाल्यामुळें काव्य आणि तत्त्वज्ञान, कला आणि शिल्पकला, कृषि आणि वाणिज्य, विचार आणि आचार यांना विलक्षण चालना प्राप्त झाली. नेहमीप्रमाणें हीहि प्रतिक्रिया इतक्या दुसऱ्या टोंकापर्यंत गेली कीं त्यात कांहीं दोषहि शिरलें. "वैदिक धर्माचा पुनरुद्धार करा!" "पुनश्च वेदाकडे वळा!" याच राष्ट्रीय घोषणा दिवसेंदिवस वाढत गेल्या आणि जास्ती जास्ती प्रभावी बनत चालल्या! कारण त्या काळच्या राजकीय परिस्थितींत तसें होणें अगदीं आवश्यकच होतें!

## सत्यधर्मानें जग जिंकण्याचा बौद्धधर्माचा अयशस्वी प्रयोग

विश्वधर्माचा संदेश जगभर प्रसृत करण्याचा पहिला आणि तरीहि सर्वांत मोठा प्रयत्न बुद्धधर्मानें केला. "हे भिक्षूंनों जा, आणि जगाच्या दाही दिशांत संचार करून विश्वधर्माचा संदेश अखिल जगताला द्या" खरोखरीच तो एक परमोदात्त असा विश्वधर्मच होता! त्याच्यामध्यें कोणताहि दुसरा गूढ हेतु नव्हता. त्यांच्या धर्म–प्रचार–पर्यटनामार्गें देश अंकित करण्याची किंवा धन लाभाचीहि अभिलाषा कधींच नव्हती. त्या धर्मानें केलेलें कार्य खरोखरच कितीहि महान् असलें होतें तरी, त्याला

१. हा चंद्रापीडाचे मागून काश्मीरच्या गादीवर आला. 'ललितादित्य' हे नांव त्यानें नंतर धारण केलें. याचें मूळ नांव मुक्तापीड. आठव्या खि. शतकांत यानें राज्य केलें. यानेहि अनेक दिग्विजय केले. तिबेट जिंकून त्यानें तुर्कांवर चाल केली. गोबीचे वाळवंट ओलांडून तो दिग्विजयार्थ गेला असतां तिकडेच मरण पावला.

यच्चयावत् मनुष्य जातीच्या अंत:करणांतून, पाशवी मनोवृत्ती किंवा राजकीय आकांक्षा, किंवा वैयक्तिक अभ्युदयाची लालसा, यांचीं बीजें, त्याप्रमाणांत समूळ उच्छेदून टाकतां आलीं नाहींत कीं, ज्यामुळें पुढें हिंदुस्थानला तरवार टाकून देऊन जपमाळ घेण्यांतहि कोणताच धोका उरला नसता ! तरीहि, " शस्त्रानें विजय संपादन करण्यापेक्षां शांतीनें आणि सत्यधर्मानेंच सर्वजगाला जिंकण्यात धन्यता मानावी " अशीच आपली इच्छा हिंदुस्थाननें घोषित केली ! खरोखर मोठ्या उदात्ततेनें हिंदुस्थाननें हा प्रयत्न केला ! आणि तो इतका कीं, लोभी आणि स्वार्थी जगताच्या दृष्टीनें हिंदुस्थान कुचेष्टेचा विषय होऊन राहिला ! सूक्ष्म जीवजंतूंना तात्कालिक मरणापासून वाचविण्याकरितां हत्तीघोड्यांना जें पाणी पाजावयाचें तें गाळूनच दिलें जावें अशा अर्थाच्या राजाज्ञा हिंदुस्थानानें त्यावेळीं काढल्या नव्हत्या काय ? समुद्रातील माशांना खाऊं घालण्याकरिता समुद्रामध्यें ठिकठिकाणीं धान्य टाकणारीं केंद्रेंहि हिंदुस्थाननें चालू केली नव्हतीं काय !–मात्र याचवेळीं जगातील इतर ठिकाणच्या समुद्रातील माशावर ताव मारण्याचे लोकांनींहि थांबविलें नव्हते, किंवा ज्या माशाकरितां ही सोय केली होती त्या माशांनींहि आपल्यापेक्षा इतर लहान माशांना खाण्याचा परिपाठ सोडला नव्हता ! स्वत:ची हत्या करून घेऊनहि हिंदुस्थाननें हत्येचीच हत्या करण्याचा महनीय प्रयोग स्वत: आचरून पाहिला ! आणि शेवटीं तरवारींपुढें तालवृंताचे पंखे अगदीं लेचेपेचे ठरतात हाच अनुभव त्यास आला ! जोपर्यंत साऱ्या जगताचीं दंतनखाग्रे हिंसेच्या रक्तानें रंगलेलीं आहेत, आणि जोंपर्यंत राष्ट्रीय आणि वांशिक भेद माणसाला पशुत्वाच्या कोटिस नेण्याइतके प्रबल आहेत, तोंपर्यंत आपल्या आत्मिक प्रकाशाप्रमाणें कसलेंहि आध्यात्मिक वा राजकीय जीवन हिंदुस्थानला जर उपभोगावयाचे असेल, तर राष्ट्रीय आणि जातीय बंधनांतून निर्माण झालेल्या शक्तीची अवहेलना करून त्यास चालावयाचें नाहीं. आणि याचकरितां विश्वबंधुत्वाचें पोपटपंची नि निरर्थक मंत्र बडबडत बसण्याची त्यावेळच्या विचारवंतांना आणि कृतिवंतांना मनस्वी किळस आली; आणि मोठ्या उद्वेगाने त्यांनीं विचारलें:–" ये त्वया देव निहिता असुराश्चैव विष्णुना । ते जाता म्लेच्छरूपेण पुनरद्य महीतले ॥ व्यापादयन्ति ते

विप्रान् घ्नन्ति यज्ञादिकाः क्रियाः हरन्ति मुनि कन्याश्च पापाः किं किं न कुर्वंति ॥ म्लेच्छाक्रांते च भूलोके निर्वषट्कारमंगले । यज्ञयागादि विच्छेदाद्देवलोकेऽवसीदति ॥" ( गुणाढ्य[1] ). ज्या निसर्गरमणीय भूमीनें नितान्त श्रद्धायुक्त अंत:करणानें भिक्षुवस्त्रें परिधान केलीं होतीं आणि खड्गाचा त्याग करून हातीं जपमाळ धरून अहिंसेची प्रतीज्ञा घेतली होती, त्याच भूमीची ज्यांनीं राखरांगोळी करून टाकली त्या शक हूणांच्या रानटी टोळयांना जेव्हां सिंधूच्या पार हूसकून लावण्यांत आलें, आणि भक्कम पायावर आधारलेली नवी राष्ट्रसत्ता जेव्हां येथें स्थापन करण्यांत आली त्यावेळीं, या नव्या राष्ट्रसत्तेला संपूर्ण अशा राष्ट्रीय धर्मसंस्थेचा पाठिंबा जर दिला तर त्यामुळें केवढें मोठें प्रचंड शक्तिसामर्थ्य निर्माण होणें शक्य आहे याचा आमच्या त्यावेळच्या राष्ट्रनेत्यांना साहजिकच प्रत्यय आला असेल !

## बौद्धांच्या 'विश्वधर्मा'ला हिंदूंच्या 'राष्ट्रधर्मा'चें प्रत्युत्तर

आणखी असें कीं, शत्रूला आणि आपणांला समान असलेली प्रत्येक गोष्ट त्या शत्रूशीं झुजण्याची आपली प्रतिकार शक्ति कमी करीत असते. जे आपल्याला विशेष आवडतात आणि जे आत्मसात करण्यांत आपल्याला अभिमान वाटतो ते ते बहुतेक सर्व गुण, जर एखाद्या मित्राच्या ठिकाणीं आपणाला आढळले तर तो मित्र जसा आपला सर्वांत प्रिय असा मित्र होऊन राहातो, त्याचप्रमाणें ज्या शत्रूंत आणि आपल्यांत ममत्वाचें आणि समानत्वाचें एकहि बंधन नसतें, त्याच शत्रूचा आपण जास्तींत जास्त कडवटपणे प्रतिकार करू शकतो. विशेषत: ज्या हिंदुस्थानामध्यें विश्वबंधुत्वाच्या आणि अहिंसेच्या भंगड गुंगींत सांपडल्यामुळें अत्याचारी आक्रमणाचा प्रतिकार करण्याचीच शक्ति नष्ट झाली होती, त्याच हिंदुस्थानांत अन्यायाविषयीं कडवट द्वेष पेटवून देण्याचें आणि त्या अन्यायाचा कधींहि न संपणारा चिवट प्रतिकार करण्याच्या शक्तीचें वरदान मिळवून देण्याचें अत्यंत आवश्यक आणि निकडीचें कार्य, दोघांनाहि समान असलेल्या पूजाप्रार्थनेचा

---

१. दुसऱ्या ख्रि. शतकांत पैशाची भाषेंत लिहिलेल्या बृहत्कथा नांवाच्या ग्रंथाचा कर्ता. संस्कृतांतील 'कथा सरित्सागर' हें याचेंच भाषांतर आहे.

आणि दोघांनाहि पूज्य असलेल्या मठसंस्थेचा पार निःपात करून टाकूनच अत्युत्तम प्रकारें साधतां आलें असतें. कारण ज्यानीं हिंदुस्थानला राष्ट्र म्हणून गळा दाबून ठार मारलें होतें, त्या शत्रूंशींच वरील दोन गोष्टीमुळें ( पूजा प्रार्थना आणि मठसंस्था ) आपले सहधर्मीय बंधु म्हणून हिंदुस्थानला हस्तांदोलन करण्याचा मोह या पूर्वी झालेला होता. हिंदुस्थानला मात्र असंरक्षित आणि सर्वस्वीं असावध स्थितींत सोडून जो विश्वधर्म इतर राष्ट्राचें क्रौर्य आणि पाशवी उन्माद एवढासुद्धां कमी करूं शकत नाहीं, आणि त्याची आसुरी लालसाहि तशीच वखवखलेली राहूं देतो, त्या विश्वधर्माचा खरोखर काय उपयोग आहे ! छे; आतां या पुढें संरक्षणाचा एकच मार्ग म्हणजे राष्ट्रीयत्वाच्या जाणीवेंतून उत्पन्न होणारें पौरुषसंपन्न शक्तिसामर्थ्य हाच ! भ्रामक तत्त्वज्ञानाच्या वाक्यात अडकून हिंदुस्थाननें आपलें जीवन रक्तहि सांडलें; परंतु त्याचा परिणाम मात्र विपरीत घडला !

## परकीयांच्या पारतंत्र्याला निमंत्रण देणारा देशबुडवा बौद्धधर्म

बौद्ध धर्माची सत्ता हिंदुस्थानांत बळानें आणि दंडशक्तीचा उपयोग करून स्थापिण्याचे प्रयत्न जसजसे होऊं लागले, तसतशी बुद्धधर्मांतील विश्वबंधुत्वाच्या प्रवृत्तींना विरोध करणारी चळवळहि अधिक आग्रहाची आणि बलशाली होऊन वाढतच गेली. परकीय देशआक्रमकाना आपले सर्व सत्ताधीश स्वामि म्हणून मानून, आपल्या देशाचें स्वातंत्र्य विकण्यास देशांतील राष्ट्राभिमानी प्रवृत्तींनीं स्पष्ट नकार दिला. परंतु कॅथॉलिक् पंथाचा राजा इंग्लंडच्या गादीवर बसविण्याच्या स्पॅनिश कॅथोलिकांच्या उपद्व्यापाला सक्रीय सहानुभूति दाखविणारा एक प्रमुख गट प्रत्यक्ष इंग्लंडमध्येंच ज्याप्रमाणें त्यांना नेहमींच मिळत असे, त्याप्रमाणें बुद्धधर्माला अनुकूल असणाऱ्या परकीय देश आक्रमकांनाहि हिंदुस्थानभर पसरलेल्या बुद्धामधून गुप्तपणें त्यांच्याशीं सहानुभूति दर्शविणारे अनेक बौद्धपंथी लोक मिळत. हें काहींच नव्हे परंतु, बाहेरच्या बौद्धधर्मीय राष्ट्रानीं कांहीं निश्चित असे राष्ट्रीय आणि धार्मिक हेतु मनात धरून, हिंदुस्थानवर अनेकदा स्वारी केल्याचा पुरावा सिद्ध करून देणारे कितीतरी भयसूचक स्पष्ट उल्लेख आपल्या प्राचीन ग्रंथांत अनेक ठिकाणीं सांपडतात. त्या काळच्या सर्व इतिहासाचा साग्र परा-

मर्ष आम्हीं येथें घेणार नाहीं. परंतु या आर्यदेशजावर, या आर्यराष्ट्रावर हूणांचा राजा न्यूनपति आणि त्याचे बौद्धपंथीय साहाय्यक यानीं मिळून जी स्वारी केली होती तिचें जें थोडेंफार लाक्षणिक आणि थोडेंफार यथार्थ वर्णन आपल्या पुराणात आलें आहे, त्याचाच केवळ आम्ही येथें निर्देश करणार आहों. त्या प्राचीन ग्रंथात थोड्याशा पौराणिक थाटांत, 'ह्हा' नदीच्या तीरावर ती प्रचड लढाई कशी लढली गेली; बौद्धांच्या सेनांनीं आपला यौद्धिक-तळ चीन देशातच कसा निर्माण केला; ("चीन देश-मुपागम्य युद्धभूमीमकारयत्।"); निरनिराळ्या बौद्ध राष्ट्राच्या सहाय्यक सेना त्यांना येऊन मिळाल्यामुळें त्याचें सैन्य कसें वाढत गेलें; ("श्याम देशोद्भवा लक्षास्तथा लक्षाश्च जापकाः । दश लक्ष्याश्चीनदेश्या युद्धाय समुपस्थितः ॥") व शेवटी एका निकराच्या लढाईत बौद्धाचा कसा पराभव झाला आणि त्या त्यांच्या पराजयाकरितां त्यांना किती जबर शासन मिळालें, इत्यादीचें वर्णन देण्यात आलेलें आहे. शेवटीं बौद्धांना आपल्या सर्व अंतस्थ राष्ट्रीय ध्येयाकाक्षा प्रकटपणें आणि सागून सवरून सोडाव्या लागल्या; आणि इतःपर कोणताहि राजकीय हेतु मनांत धरून हिंदुस्थानांत आपण चुकूनहि प्रवेश करणार नाहीं अशी स्पष्ट बंधनकाक निश्चिति त्यांना द्यावी लागली. सर्वांचाच सहिष्णुतेनें प्रतिपाळ करणाऱ्या हिंदुस्थानापासून बौद्धांना वैयक्तिक रीतीनें कांहींच भय बाळगण्याचें कारण नव्हतें. परंतु हिंदुस्थानचें स्वातंत्र्य किंवा राजकीय जीवन धोक्यात आणण्याच्या सर्व प्रकारच्या आकांक्षा मात्र सोडून देणें त्यांना अवश्य होतें. "सर्वैश्च बौद्धवृंदैश्च तत्रैव शपथं कृतम्। आर्यदेशं न यास्यामः कदाचिद्राष्ट्रहेतवे। (भविष्य पुराण, प्रतिसर्गपर्व)

## वैदिक धर्माचें प्रतिक्रियात्मक पुनरुज्जीवन

आणि अशा रीतीनें, आपल्या राष्ट्राचें वैशिष्ट्य ज्यांत विशेषपणें उठून दिसेल अशा संस्था राष्ट्रांत पुन्हां चालू झाल्या. बौद्धाच्या राजसत्तेच्या चालत्या काळातहि जी वर्णाश्रम व्यवस्था संपूर्णपणें उच्छेदून काढतां आली नाहीं, तीच पुढें इतक्या उर्जितदशेला आली कीं, राजांना आणि सम्राटांना स्वतःचा मोठेपणा प्रस्थापित करण्याकरितां 'वर्णव्यवस्थानपरः (सोनपत ताम्र

लेख ) " वर्णाश्रमव्यवस्थापनप्रवृत्तचक्रः " (मधवत ताम्रपट) अशी बिरुदें लावण्यात अभिमान वाटूं लागला ! वर्णाश्रमसंस्था पुनः प्रस्थापित होण्याच्या दृष्टीनें ही जी प्रतिक्रिया झाली तिचा जोर पुढें इतका वाढला कीं, वर्णाश्रमव्यवस्था हीच जवळ जवळ आपल्या राष्ट्रीयत्वाची प्रमुख खूण होऊन बसली. आपण आणि परकीय यांच्या मधील स्पष्ट भेद कोणता हे सांगणारी जी व्याख्या पुढें दिली आहे ती वरील दृष्टीनें तपासून पहा. " चातुर्वर्ण्यव्यवस्थानं यस्मिन्देशे न विद्यते । तं म्लेच्छदेशं जानीयात् आर्यावर्तस्ततःपर ॥ " यावरून जे परकीय देश वर्णाश्रम संस्थेसारख्या आपल्या विविध धर्मसंस्थाना कधींच अनुकूल नव्हते तर उलट कित्येकवेळीं त्यांविषयीं शत्रुभावच बाळगीत होते, व ज्या देशांत आपल्या धर्माची संस्कृति आणि संस्कार जिवंत ठेवण्यासाठीं लागणारे आवश्यक संरक्षणहि मिळण्याची आपल्या लोकांना शक्यता नव्हती, त्या देशांच्या किनाऱ्यावर पाऊल ठेवण्यास आपल्या लोकांना धर्माची आज्ञा म्हणून मज्जाव केला जाणें ही, आतां त्यापुढची क्रमप्राप्त अशीच गोष्ट होती. ही प्रतिक्रिया जरी थोडी अविचारीपणाची होती तरी, राजकारणाच्या दृष्टीनें जर आपण तिजकडे पाहूं तर त्यांतील हेतु आपल्या चटकन् ध्यानांत येईल. कारण, आपल्याच देशांत असें कित्येक विचारवंत राष्ट्रप्रेमी लोक आपल्याला आजसुद्धां वारंवार भेटत नाहींत कां कीं जे, ज्या देशांत आपल्या लोकांना अपमानानें आणि त्यांची राष्ट्रीय दृष्टीनें खची होईल अशा तऱ्हेनें वागविलें जाते त्या देशांत माणसें न पाठविण्याच्या नैर्बंधिक ठरावांना आपली समति दर्शवितात ?

## हिंदुराष्ट्राला आपल्या स्वतंत्र अस्तित्वाची जाणीव

अशा रीतीनें, हिंदुस्थानांत बुद्धधर्माच्या ऱ्हासाला कारण होण्यास आणि तो ऱ्हास संपूर्णपणें घडवून आणण्यास राजकीय आणि राष्ट्रीय गोष्टीच प्रामुख्यानें कारणीभूत झाल्या होत्या. बुद्धधर्माला, भौगोलिक दृष्टया आतां गुरुत्वमध्य असा कोठेंच उरला नव्हता. म्हणून बुद्धधर्माला डोक्यावर घेऊन नाचण्याच्या प्रयत्नांत हिंदुस्थानचा राष्ट्रीय गुरुत्वमध्य जो ढळला होता तो निदान होता त्या ठिकाणीं पुन्हां आणून ठेवणें ही अगदीं निकडीची गोष्ट

होऊन बसली. एखाद्या सेन्द्रीय जीवदेहाप्रमाणें राष्ट्राला जेव्हां आपल्या स्वतंत्र अस्तित्वाची तीव्र जाणीव झाली, आणि त्या अस्तित्वावरच घाला घालणाऱ्या विरोधी परकीय शक्तींशीं जेव्हा त्याचा झगडा सुरू झाला तेव्हां, आपण निश्चितपणें कुठें उभे आहोंत हें आपल्याच लोकांच्या दृष्टोत्पत्तीला आणून देण्याकरिता, व केवळ जातीय आणि राष्ट्रीयदृष्ट्याच नव्हे तर भौगोलिक आणि राजकीयदृष्ट्याहि निर्विवादपणें आपण एक स्वतंत्र असें राष्ट्र कसें आहोंत हें जगताला गर्जून सांगण्यासाठीं, राष्ट्रानें अंतस्फूर्तीनें आपलें वेगळें असें स्वतंत्र अस्तित्व दर्शविणारी आणि आपल्या अधिराज्याखालीं असलेला भूभाग निश्चित करणारी, सुस्पष्ट अशी विभाजक रेषा आखली. आपल्या देशाचे दक्षिण सीमान्त नैसर्गिक सुरक्षिततेच्या आणि राजकीय हालचाल-धोरणाच्या दृष्टीनें आधींच मिळविलेले, निश्चितलेले आणि राजरोसपणें मान्यता पावलेले व पावन झालेले होते.

## हिंदुराष्ट्राचें उत्तर आणि दक्षिण सीमान्त

आपल्या दक्षिण द्वीपकल्पाभोंवतीं अमर्याद आणि अथांग पसरलेल्या सागराचा जो विळखा पडलेला आहे, तो सागरी सौंदर्याच्या दृष्टीनें अत्यंत उत्कृष्ट, अतीव रमणीय, आणि नितान्त काव्यमय असाच आहे. या समुद्ररशननें आपल्या पिढ्यान् पिढ्यांच्या कवींचे नि देशभक्तांचे डोळे आपल्या सौंदर्यानें सुखविले आहेत. परंतु आपल्या वायव्य सीमाप्रांतात निरनिराळ्या जातींचे संबंध इतक्या भरसमाट रीतीनें अस्तित्वात आले कीं, त्यामुळें तेथील आपल्या जातीचें विशुद्ध स्वरूप नष्ट होतें कीं काय अशी भीति निर्माण झाली. व त्याचप्रमाणें तेथील सीमाहि वारंवार इतक्या अस्थिर नि हालत्या राहिल्या कीं, राष्ट्राच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनेंहि तें धोक्याचें होऊन बसलें. आणि म्हणून उज्जयनीच्या महाकालाच्या आधिपत्याखालीं उत्तेजन मिळालेल्या स्वत्वस्थापनेच्या ऊर्मीनें, उत्तर दिशेची सीमारेषा दक्षिणेप्रमाणेंच सुस्पष्ट आणि सुसंरक्षित करण्याच्या अत्यंत निकडीच्या गोष्टीकडे आपल्या देशभक्तांचें लक्ष जर वेधलें नसतें, तर ती एक अत्यंत आश्चर्यकारक अशीच गोष्ट घडती. आणि अशी सीमारेषा त्या रमणीय परंतु तितक्याच अथांग, अशा महानदी 'सिंधू' वांचून दुसरी कोणती

असणार होती ! ज्या दिवशीं आपल्या पितृपूर्वजांनीं ही नदी ओलांडली, त्याच दिवशीं पाठीमागील प्रदेशात सोडलेल्या त्याच्या बांधवांशीं त्यांचा संबंध सपला. या ठिकाणीं त्यांनीं नवीन राष्ट्राचा पाया घातला; आणि स्वतंत्र जाति म्हणून त्यांचा पुनर्जन्म झाला नवीन आशानीं व नव्या ध्येयाकांक्षांनीं प्रेरित झालेले हे लोक इतरांना आपल्यांत सामावून घेऊन व स्वतः अभिवृद्धित होऊन एक स्वतंत्र जाति आणि स्वतंत्र राज्यसंस्था म्हणून पुढें नावारूपाला येणार हें अटळ सत्य होऊन बसलें. आणि या नवीन जातीचें आणि राज्यसंस्थेचें दुसरें तिसरें कोणतें नांव नसून अत्यंत योग्य आणि स्फूर्तिप्रद असें सिंधु किंवा हिंदु हेंहि नांव त्याच वेळीं ठरून गेलें !

" सिंधुस्थानमितिज्ञेयं राष्ट्रमार्यस्यचोत्तमम् । "

आपल्या सरसीमा सिंधूच्या ओघाला धरून निश्चित करण्यांत आल्या ही कांहीं एखादी अभूतपूर्व गोष्ट नव्हती. राष्ट्राला नवचैतन्य प्राप्त करून देणाऱ्यांनीं उद्घोषित केलेल्या ' पुनश्च वेदाकडे वळा ' या महान् युद्धघोषणेचाच तो नैसर्गिक परिपाक होता. वैदिक धर्मानुसार रचलेल्या आणि वैदिक धर्माच्याच पायावर उभ्या राहिलेल्या राष्ट्राला वैदिक नांव ठेवणें क्रमप्राप्तच होतें; आणि त्यावेळच्या शक्याशक्यतेचा विचार करून तें वैदिक प्रथेला अनुसरूनच ठेवण्यात आलें; व एकदर इतिहासाच्या निष्कर्षाला धरून ज्या गोष्टी आम्हांला अपेक्षित वाटत होत्या त्या प्रत्यक्षातहि त्याच अनुक्रमानें आणि तशाच घडल्या. कारण स्वदेश प्रेमानें लिहिल्या गेलेल्या एका पुराणांत असा स्पष्ट उल्लेख आहे कीं, विक्रमादित्याचा नातू शालिवाहन यानें परकीय लोकांचा हिंदुस्थान जिंकण्याचा दुसरा प्रयत्न निष्फळ करून त्याना सिंधूच्या पलीकडे हुसकून दिल्यानंतर एक राजाज्ञा काढून असें घोषित केलें की, " यापुढें हिंदुस्थान व दुसरी अहिंदु राष्ट्रें याच्यामधील सिंधू हीच सीमा रेषा समजण्यांत यावी." ' एतस्मिन्नंतरे तत्र शालिवाहन भूपतिः । विक्रमादित्यपौत्रश्च पितृराज्यं प्रपेदिरे ॥ जित्वा शकान् दुराधर्षान् चीनतैत्तिरि देशजान् । बाल्हिकान् कामरूपांश्च रोमजान् खुरजान् शठान् ॥ तेषां कोशान् गृहीत्वाच दडयोग्यानकारयत् ।

स्थापिता तेन मर्यादा म्लेच्छार्याणां पृथक् पृथक् ॥ सिंधुस्थानमितिज्ञेयं राष्ट्रमार्यस्य चोत्तमम् । म्लेच्छस्थानं परं सिंधोः कृतं तेन महात्मना ॥ ( भविष्यपुराण, प्रतिसर्ग पर्व अ. २ )

## 'सिंधु' हीच हिंदुराष्ट्राची स्फूर्ति

ज्याचा आपल्याजवळ निश्चित पुरावाच आहे असें आपल्या देशाचें अत्यंत जुन्यांतलें जुनें आणि प्राचीनातलें प्राचीन असें नाव म्हणजे सप्तसिंधु किंवा सिंधु हेंच होय. भारतवर्ष हें नांवसुद्धां निश्चितपणें नंतर पुढें पुढें प्राप्त झालेलें असलें पाहिजे, आणि त्या नावांतसुद्धां व्यक्तिनिर्देश अधिक आहे हें वेगळेंच. व्यक्तीचें वैयक्तिक यश आणि कीर्ति कितीहि उज्ज्वल असली तरी कालांतरानें तिचें माहात्म्य कमी कमीच होत येतें. ज्या नावामध्यें राष्ट्रीय पराक्रमाची आणि व्यक्तिविषयक मधुर भावनांची स्मृति साठविलेली असूनहि कोणत्या तरी अत्यंत कल्याणास्पद आणि चिरंतन टिकणाऱ्या निसर्गकृतीशीं त्याचा संबंध जोडलेला असतो, त्या नावापेक्षा जें नाव केवळ व्यक्तीच्या पराक्रमामुळें आणि व्यक्तिविषयक माहात्म्यामुळेंच पुढें आलेलें असतें तें, सदैव रसरसणारा स्वाभिमान, स्वत्वाची जाणीव, आणि कृतज्ञता यांचें अधिक परिणामकारक असें सदाचें स्फूर्तिस्थान कधींच होत नाहीं. सम्राट भरत मृत्यू पावला आणि त्याच्या इतकेच थोर असे दुसरें सम्राटहि तसेंच मरण पावले ! परंतु सिंधु मात्र अखंड आणि चिरंतन टिकली आहे. आमचा स्वाभिमान प्रज्वलित करीत, आमची कृतज्ञता बुद्धि सदैव टवटवीत ठेवून आम्हांला स्फूर्ति देत, एखाद्या रक्षकाप्रमाणें आमच्या राष्ट्राच्या भवितव्यावर पहारा देत आजहि, सिंधु तशीच पूर्वीप्रमाणें वाहात आहे ! प्राचीनतम भूतकाळाचा अतिदूर भविष्यकाळाशीं संबंध जोडून देणारा आमच्या राष्ट्राचा हा अत्यंत आवश्यक आणि जीवभूत असा पृष्ठवंश–पाठीचा कणाच–आहे ! अशा प्रकारच्या नदीशीं आमच्या राष्ट्राचा संबंध आणल्यामुळें व तिच्या नावांशीच तें एकरूप झाल्यामुळें एकप्रकारें निसर्गच आम्ही आमच्या बाजूला आणला व आमच्या राष्ट्राचें अस्तित्व अशा भरभक्कम पायावर उभारलें कीं, मानवी काळगणतीचा विचार लक्षात घेता कल्पांतापर्यंतहि तें चिरंजीव होऊन

राहावें ! हेच विचार त्यावेळच्या सर्व विचारवंतांच्या आणि कृतिवंतांच्या मनात चमकून उठले असले पाहिजेत. आणि त्यामुळेंच त्याना आपल्या राष्ट्राचें प्राचीन वैदिक नांव सिंधुस्थान—" राष्ट्रमार्यस्य चोत्तमम् । "— हेंच पुनः सुप्रतिष्ठित करावेसें वाटलें असणें अगदीं शक्य आहे.

## उत्तर दक्षिण सीमान्त दाखविणारा एकच शब्द 'सिंधु'

सिंधुस्थान हें नाव, जरी तें वैदिक असलें तरीहि त्याला आणखी एक दुसरें विशेष महत्त्व आहे. आता हें महत्त्व जरी योगायोगानेंच प्राप्त झालें असलें तरी त्याचा विचारहि न करण्याइतकें तें निश्चित उपेक्षणीय नाहीं. संस्कृतमधील 'सिंधु' शब्दाचा अर्थ केवळ सिंधुनदी एवढाच नाहीं, तर समुद्र-दक्षिण द्वीप कल्पाला विळखा घालणारी 'समुद्ररशना'— असाहि होतो. त्यामुळें सिंधु हा एवढा एकच शब्द उच्चारताच, आपल्या भूमीच्या जवळजवळ सर्व सीमान्तांना त्यात एकसमयावच्छेदेंकरून अर्थ बोध होतो. हिमालयाच्या पूर्व आणि पश्चिम पठारांवरून दोन निरनिराळ्या प्रवाहानीं वाहात जाऊन आपल्या देशाच्या पूर्व आणि पश्चिम सीमा निश्चित करणाऱ्या सिंधूचीच ब्रम्हपुत्रा नदी ही एक शाखा असल्याचा पुरातनकाला पासून चालत आलेला समज जरी आपण जमेला धरला नाहीं, तरी हें निर्विवादरीत्या सत्य आहे कीं, आपल्या उत्तर आणि पश्चिम सीमान्ताना प्रदक्षिणा घालूनच ती पुढें वाहात जात असल्यामुळें, 'सिंधुस्थान' या नांवाच्या उच्चारासरशीं आपल्या डोळ्यापुढें सिंधु नदीच्या आणि सिंधूच्या—समुद्राच्या—सीमानीं वेष्टिलेल्या आपल्या सलग अशा मातृभूमीचीच मूर्ति आपल्या डोळ्यापुढें उभी राहाते.

## 'सिंधुस्थान' नि 'म्लेच्छस्थान'

परंतु 'सिंधु' हें नांव केवळ भौगोलिकदृष्ट्या अत्यंत सुयोग्य असल्या मुळें, तेंच आपल्या देशप्रेमी लोकानीं पत्करलें असें समजण्याचें मात्र काहींच कारण नाहीं. कारण ह्या शब्दातून प्रतीत होणारा अर्थ हा केवळ भौगोलिक नसून निश्चितपणें राष्ट्रीयच असल्याचें मानण्यात आलेलें आपणाला दिसून येतें. सिंधुस्थान हा काहीं एक केवळ भूमीचा तुकडा नव्हे तर निश्चितपणें

तें एक राष्ट्र होतें. आतां राष्ट्र म्हणजे 'राज्ञः राष्ट्रम्' या अर्थानें सदा सर्वकाळ तें एकाच शासनाखालीं होतें असें जरी नसलें, तरी मनोमय ऐक्याच्या भावनेमुळें तें एकसंघ असेंच राष्ट्र निश्चित होतें. त्याचप्रमाणें यावरून हेंहि अगदीं स्पष्टपणें सिद्ध होतें कीं, सिंधुस्थानामध्यें जी संस्कृति भरभराटली आणि जे लोक त्या राष्ट्राचे नागरिक झाले त्या दोघांना सिंधु हेंच नांव वैदिक कालाच्या प्रथेस अनुसरून प्राप्त झालें. परकीयांच्या 'म्लेच्छस्थाना' पासून सर्वस्वीं निराळें आणि स्वतंत्र असें जे 'आर्यांचें सर्वोत्तम राष्ट्र (राष्ट्रमार्यस्य चोत्तमम्) तें, 'सिंधुस्थान' म्हणूनच ओळखलें जाई. कांहींहि असलें तरी हें येथें स्पष्टच सांगितलें पाहिजे कीं, वरील व्याख्येची उभारणी कोणत्याहि प्रकारच्या धार्मिक वृथाभिमानावर किंवा धर्ममताच्या काथ्याकुटीवर आधारलेली नाहीं. वरील अनुष्टुपां मधून जो आर्यशब्द जाणून बुजून योजलेला दिसतो तो एवढ्याकरितांच कीं, त्यायोगें सिंधूच्या इकडच्या तीरांवर भरभराटलेल्या आपल्या राष्ट्राचे आणि जातीचे जे अभिन्न घटक होते त्या सर्वांचा त्यात अंतर्भाव व्हावा. मग त्यांत वैदिक वा अवैदिक, ब्राह्मण वा चांडाल हा प्रश्न नव्हता. केवळ समान संस्कृति, समान रक्तसंबंध, समान देश आणि समान राज्यसंस्था यांचा वारसा ज्यांना लाभला होता ते ते सारेच आर्य म्हणून समजले गेले होते. ह्याच्या उलट, सिंधुस्थानाच्या बरोबर विरुद्ध, म्लेच्छ-स्थान या शब्दाचा अर्थहि धर्मसंबंधात जरी कटाक्षानें नसला तरी राष्ट्रीयत्वाच्या आणि जातीय एकतेच्या दृष्टीनें भिन्न नि परक्या लोकांचा देश हाच होता.

## 'सिंधुस्थान' या नांवाची शतकोनुशतकांची परंपरा

ही राजाज्ञा, सिंधुस्थानांतील इतर बऱ्याचशा राजाज्ञांप्रमाणें, एका लोकप्रिय आणि समर्थ अशा चळवळीचेंच दृश्यफळ होती. कारण, अटक हेंच हिंदु-स्थानच्या भूमीचें अंतिम टोंक, म्हणजे त्या शब्दाप्रमाणेंहि अटकच, ही कल्पनासुद्धां जर ती आपल्या राष्ट्रीय मेंदूतून प्रस्फूर्त झाली नसती किंवा त्यास मान्य झालेली नसती तर ती अस्तित्वांत येणें किंवा इतक्या शतकों नुशतकें सर्वतोमुखीं रूढ होणें हेंच अशक्य होतें. आमच्या देशातील लक्षा-

वधि लोकांनीं रावांप्रमाणें रंकांनींहि वरील समजूत अत्यंत भक्तीनें आणि चिकाटीनें जतन करून जिवंत ठेवली होते; व त्यामुळेंच प्राचीन सिधु हेंच आपले सीमान्त कल्पून त्यास मान्यता देणारे व सिंधुस्थान हेंच आपल्या भूमीचें नि राष्ट्राचें अधिकृत नांव म्हणून निश्चित करणारें, असें एखादें राजाज्ञापत्र त्यावेळीं केव्हातरी निघालें असल्याचा वरील रूढ समजूत हा एक चांगलाच सबळ असा पुरावा आहे. आणि या राजानुशासनाला आणि जनतेच्या इच्छेला धर्माचा परम पवित्र असा शुभाशीर्वाद मिळाल्या मुळेंच आपल्या देशाला पुन: वैदिक नाव प्राप्त करून देण्याचा व तेंच चिरंजीवी व चिरविजयी करण्याचा प्रयत्न सुशक्य झाला. सिंधु आणि सिंधुस्थान या नावाचें भवितव्य निश्चित करून याना नांवारूपाला आणण्याकरिता, व त्याप्रमाणें आपल्या सबंध राष्ट्राचा आशय प्रकट करण्याइतकीं तीं प्रबल आणि प्रभावी होऊन आपल्या जातीचा अमोल असा ठेवा म्हणून त्यांचें महत्त्व प्रस्थापित होण्याकरितां, अद्याप कितीतरी शतकें लोटावयाचीं होतीं व कितीतरी महान् घडामोडी घडावयाच्या होत्या. काहीं झालें तरी त्यांनीं ते घडवून आणलें; आणि आज आपल्याला असें दिसून येईल कीं, आर्यावर्त किंवा भारतवर्ष याचा खरा अर्थ आज जरी हजारोंना कळत नसला तरी रस्त्यातल्या कोणाहि माणसास 'हिंदु' आणि 'हिंदुस्थान' ही आपलींच नावें आहेत येवढें मात्र तत्काळ ध्यानात येऊन त्याची खूण त्यास बरोबर पटते.*

---

* वर उद्धृत केलेली भविष्य पुराणातील अनुष्टुपे, त्याच्या मुख्य आशयाचा विचार करता सर्वस्वीं विश्वसनीय अशींच आहेत. कारण (१) ऐतिहासिक शकावली व वैयक्तिक वंशावळी याच्यापेक्षां सहज आणि अधिक काळ स्मरणामध्यें टिकणाऱ्या सर्वसाधारण घडलेल्या घटनाच त्यामध्यें देण्यात आलेल्या आहेत (२) त्याचा क्षणभर विचार बाजूला ठेवूनहि आपल्या इतिहासाच्या झोंकावरूनहि आपणाला असेंच दिसेल कीं, तशा प्रकारच्या घटना नि परिस्थिति त्यावेळीं अस्तित्वात होती. (३) आमच्या प्रस्तुतच्या विवेचनाला अमुक एका राजाज्ञापत्राचा काल कोणता

(टीप पुढें चालू)

भगवान् बुद्धांविषयींची नितान्त आदरयुक्त भक्तिभावना

परंतु या नांवाच्या इतिहासामध्यें या नंतर आणखी कोणकोणतीं स्थित्यंतरें घडलीं हें कथन करण्याच्या आधीं, आम्हाला आमची स्वत:चीच पहिल्यानें क्षमा मागणें अत्यंत आवश्यक वाटतें. आतापर्यंतच्या विवेचनाचा हा सर्व

---

(मागील टीप पुढें चालू)

व तें काढणाऱ्या राजाचें नाव काय, याचीहि आवश्यकता नाहीं. (४) या पुराणाचा लेखक जें कांहीं लिहितो तें अर्धवटपणानें किंवा त्यांत अगदींच अपरिचित अशा रीतीनें लिहीत नाहीं. कारण विक्रमादित्याच्या घराण्याची वंशावळ, जी त्यानें एक ठिकाणीं दिली आहे तशीच आणि त्याच पद्धतीनें तो ती इतरत्रहि देतो. ज्या माणसाला एखाद्या राजघराण्याची पूर्ण वंशावळ माहीत आहे त्याला त्या राजघराण्यातील प्रख्यात राजांच्या निदान प्रसिद्ध गोष्टी तरी माहित असण्याची शक्यता दिसते.

सारांश, ज्या राष्ट्रीय नि परपरागत गोष्टी आठवणींतून जपून ठेवल्या होत्या आणि पुराणांत, महाकाव्यांत नि वाङ्मयात संग्रहित झालेल्या होत्या त्याच आपल्या इतिहासाचीं प्रमुख साधनें होऊन राहिल्या आहेत; व त्या तशा असणें, अवश्यही आहे. त्यांतील अनेक बारीक सारीक गोष्टींच्या सत्यतेविषयीं संशयाला जागा असेल; त्यानीं दिलेले काल व शक कदाचित् पुन्हा निश्चित करून घ्यावे लागतील किंवा अग्राह्यहि होतील. परंतु इथें तिथें कांहीं असंबद्ध वर्णनें आहेत किंवा कांहीं अद्भुत अतिशयोक्ति आहेत एवढ्याच कारणानें त्या कांहीं एकदम त्याज्य ठरणार नाहींत. कारण तशा तऱ्हेचे प्रकार मनुष्य जातीच्या प्रत्येक प्राचीन वाङ्मयात इटकून दृष्टीस पडतातच. आणि विशेषत: जेव्हां, वर्णन केलेल्या गोष्टींत कांहीं अशक्यता किंवा अनैसर्गिक भाग नसेल तर, आणि जेव्हां इतर पुराव्या वरून निर्विवादपणें ज्या गोष्टोंची सत्यता सिद्ध झाली आहे अशा कोणत्याहि गोष्टींना सोडून नसलेल्या त्या कथा असतील तर, त्या मुळींच त्याज्य मानता येत नाहींत. कोणत्या तरी परकीय ग्रंथकाराच्या पुराव्यानें सिद्ध-

(टीप पुढें चालू)

प्रबंध भाग लिहितांना वास्तविक आम्ही आमच्याच भावना दुखविलेल्या आहेत. म्हणून हें अगदी प्रथमच सांगून टाकतों की, बुद्धधर्माचें हिंदुस्था

( मागील टीप पुढें चालू )

झाली नाहीं तोंपर्यंत पुराणांतील कोणतीहि गोष्ट खरीच मानावयाची नाहीं ही वृत्ति, अत्यंत चूक आहे. यापेक्षा अधिक शास्त्रशुद्ध आणि शहाणप णाची पद्धत म्हणजे ही कीं, जेथें सर्वसाधारण परंपरागत गोष्टीच सांगित लेल्या असतील तेथें आपल्या ग्रंथावर अवश्य विश्वास ठेवावयाचा; आणि उगीच आपलें काहीं तरी डोकें चालवून त्या चूक आहेत असे एखादा म्हणतो म्हणून नव्हे, तर खरोखरीच त्याच्याविरुद्ध अधिक विश्वसनीय व कमी संशयास्पद असा एखादा निश्चित पुरावाच जर आढळला, तरच मग या अग्राह्य समजावयाच्या. आतां या भविष्यपुराणाचीच गोष्ट आपण घेऊ. याच्यामध्यें काहीं असंबद्ध व अविश्वसनीय गोष्टी आहेत म्हणून, व शिकंदरच्या जन्मासंबंधीं काहीं अद्भुत कथाभाग यांत निवेदन केलेला आहे म्हणून, आपण शिकंदर हा पुरुषच झाला नाहीं असे समजावयाचें काय? तसें म्हटलें तर प्लूटार्कच्या लेखनांत तरी वरील दोष कोठें नाहींत? आतां, पुढचें अनुष्टुप अविश्वसनीय मानणें हें कधींतरी उचित ठरेल का? ' चंद्रगुप्तस्तस्य सुतः पौरस्याधिपतेः सुताम् । सुलवस्य तथोद्वाह्य यावनीं बौद्धतत्परः ॥ ' उलट पक्षीं ह्या पुराणांचें व महाकाव्यांचें आपण फार मोठें ऋण मान्य केलें पाहिजे. कारण ज्या अनेक क्रांत्यांच्या उत्पातांत पृथ्वीच्या इतर भागांत उभीं राष्ट्रेंच्या राष्ट्रें व त्यांच्या संस्कृति गडप झाल्या त्या क्रांतीच्या उलथा पालथींतहि याच काव्यांनीं आणि पुराणांनीं आपला पुरातनकाळचा वंद्य इतिहास जतन करून ठेवला. आपली हीं जुनीं व देशप्रेमानें रसरसलेली पुराणें व इतिहास हे अगदी अयथावत् माहिती लिहून ठेवलेल्या कांहीं पाश्चात्य पुराणापेक्षा निश्चितच अधिक विश्वसनीय आहेत. कारण, अशा काहीं पाश्चात्य पुराणांपैकीं एका पुराणांत अशी विश्वसनीय (!) माहिती दिलेली आहे कीं, रामायणामध्यें विजयानगरच्या स्थापनेचें वर्णन केलेलें आहे! दुसरें एक पुराण दडपून देतें कीं, गौतमबुद्ध म्हणजे व्यक्ति नसून तें एक सूर्य किंवा उषा यांच्यावरचें रूपक आहे!

नातून उच्चाटण होण्याला जी राजकीय परिस्थिती कारणीभूत झाली तिच्या संबधीचें विवेचन करताना जे कांहीं कठोर शब्द आम्हाला उच्चारावे लागले त्यावरून, बौद्ध धर्माविषयीं एकंदरींत आम्हाला काहीं मोठासा आदर नाहीं, असें मात्र कोणी समजूं नये. छे, छे! बौद्धसंघाची दीक्षा घेतलेल्या कोणाहि भाविक भिक्खूइतकाच, जगतातील पहिल्याच आणि तरीहि इतक्या महान् अशा त्या परम पावन संघाचा मीहि एक विनम्र असा पूजक आणि गुणोपासक आहे. आम्ही बौद्ध धर्माचें अनुयायित्व स्वीकारलें नाहीं याचें कारण, तो धर्मसंघ आमच्या योग्य नाहीं हें नसून, जे महान् धर्ममदिर केवळ तत्वाच्याच खंबीर पायांवर आधारल्यामुळें, नुसत्या खडकाच्या पायावर बांधलेल्या राजप्रासादापेक्षा किती तरी अनंत कालपर्यंत टिकून राहिले, त्या धर्ममदिराच्या पायरीवर पाऊल ठेवण्यासहि आम्ही सर्वस्वीं अपात्र आहोंत हेंच होय! हिंदुस्थानांत जन्मलेल्या, हिंदुस्थानांतच वाढलेल्या आणि हिंदुस्थानलाच आपली मातृभूमि म्हणून पूजणाऱ्या एकापेक्षां एक श्रेष्ठ असलेल्या अर्हताच्या आणि भिक्षूच्या महान् धर्मसघांनीं मनुष्याला त्याच्या स्वभावसिद्ध पाशवी प्रवृत्तीपासून परावृत करण्याचा अगदीं पहिला आणि अत्यंत यशस्वी असा प्रयत्न प्रथम संकल्पून, व नंतर तो प्रयोगित करून शतकानुशतकें पुढें चालू ठेवला—ह्या त्या एकाच गोष्टीच्या जाणीवेनें आमच्या मनात इतक्या भावना उचंबळून येतात कीं, त्या शब्दांनीं व्यक्तविणेंच अशक्य होऊन जातें. आणि अशा त्या सघाविषयींच जिथें आमच्या वरील प्रकारच्या भावना आहेत, तर त्या संघाच्या संस्थापकाविषयीं,—त्या परमज्ञानी बुद्ध भगवानांविषयीं—आम्ही कोणत्या भाषेत आमचा आदर व्यक्त करूं? मानवातील अत्यंत हीन कोटींतील हीनतम मानव म्हणून, माझे आत्यंतिक दैन्य आणि माझी आत्यंतिक अल्पता हीच तुझ्या चरणांवर वाहण्याकरिता हे तथागता, मी तुझ्यापाशीं येण्याचें धाष्टर्य दाखवितों. तुझ्या उपदेशाचें सार माझ्या बुद्धीला ग्रहण करता येत नाहीं, आणि तें तसें होणें अगदीं स्वाभाविक आहे याची मला कल्पना आहे कारण, तुझे शब्द देवांच्या मुखांतून स्त्रवलेले आहेत, तर माझे कान आणि माझी बुद्धि, या प्राकृत आणि व्यवहारी जगाचे शब्दोच्चार आणि आरडाओरड ऐकण्यासच सराव-

लेली आहे. कदाचित् इतक्या अवेळींच तूं आपल्या धर्म–चक्र–प्रवर्तनाचें शिंग फुंकलें असशील आणि आपली धर्मध्वजा फडकाविली असशील कीं, ज्यावेळीं ही मानव जात अगदींच बाल्यावस्थेंत होती, आणि दिवस नुकताच कोठें उगवलेला होता. म्हणून ह्या जगाला तुझ्या भरारीबरोबर चालता येत नाहीं; व तुझ्या दैदिप्यमान ध्वजाकडे दृष्टि लावताच ती दिपून अंधुक होऊन जाते. सृष्टीच्या उत्क्रांति तत्त्वानें घालून दिलेलें "चलानामचला भक्ष्या दंष्ट्रीणामप्यदंष्ट्रिणः । अहस्ताश्च सहस्तानां शूराणां चैव भीरवः ॥" (मनु) हें निर्घृण सूत्र जोंपर्यंत छातिठोकपणानें जगावर थैमान घालीत आहे, आणि जोंपर्यंत त्याचा पाडाव, सत्य धर्माच्या उदात्त तत्त्वानीं कीं जीं आकाशांतील तारकाप्रमाणें सौंदर्यानें आणि द्युतीनें–पण केवळ दुरुनच लुकलुकतात अशांनीं–अद्यापहि होणें शक्य झालेलें नाहीं, तोंपर्यंत कोणतेंहि राष्ट्र आपलें राष्ट्रीय निशाण काढून टाकून त्या ठिकाणीं विश्वबंधुत्वाचें निशाण फडविण्यास कधींहि संमति देणार नाहीं. पण तरीसुद्धा आमच्या जातीच्या देवाच्या आणि देवताच्या पूजाविधीनें पावन झालेल्या त्या राष्ट्रीय ध्वजाखाली जर तो शाक्यसिंह उभा नसता तर त्या ध्वजास काहींसे वैगुण्य निश्चितच प्राप्त झालें असतें. परंतु काहींहि असले तरी ज्याप्रमाणें श्रीराम किंवा श्रीकृष्ण किंवा श्रीमहावीर हे जसे अगदीं आमचेच आहेत, त्याचप्रमाणें हे भगवन्, आपणहि आमचेच आहात ! आपले शब्द म्हणजे आमच्याच राष्ट्रीय आत्म्याच्या तळमळींतून निघालेले अमर बोल आहेत; आपल्याला झालेले दिव्य साक्षात्कार, हींहि आमच्याच जातीला पडलेलीं स्वप्नें आहेत. आणि सद्धर्माचें उदात्त तत्त्वज्ञान जर कधीं या मानवी भूमीवर विजयी झालेले दिसून येईल तर, हे भगवन्. ज्या भूमीनें आपल्याला पाळण्यांत डोलविलें, ज्या जातीनें आपलें लालनपालन केलें, तीच भूमि आणि तीच जाति, त्या सद्धर्माच्या परमोच्च विजयाला प्रामुख्यानें कारणीभूत झालेली असल्याचें आपणांला त्यावेळीं दिसून येईल. आपल्याला जन्म देऊन तिनें तें आधींच सिद्ध केलेलें आहे; परंतु तेवढ्या गोष्टीमुळें तें सिद्ध झालें नसलें तर निदान या गोष्टीमुळें तें निश्चितच सिद्ध होईल !

## ४

"'तं वर्षं भारतं नाम भारती यत्र संततिः।"

आतांपर्यंत आपण 'सिंधु' हा शब्द कसा बनत गेला हें मुख्यतः संस्कृत ग्रंथाच्या आधारें पाहिलें. हिंदूंचें राष्ट्र, ही कल्पना जसजशी वाढीला लागली तसतसे त्याला त्यावेळीं रूढ असलेल्या दुसऱ्या कोणत्याहि नांवापेक्षा 'सिंधुस्थान' हेंच नांव जास्त सार्थपणें लागू असल्याचें दिसून आलें. आणि याच ठिकाणीं आपण आपल्या संशोधन-चिकित्सेचा धागा अर्धाच सोडलेला होता. 'आर्यावर्त' या नांवाप्रमाणें ह्याहि नांवांत संकुचितपणाचा आणि एकांगीपणाचा दोष आहे असा आक्षेप कोणी घेऊं लागले तर त्या आक्षेपाचे झाडून खंडण करण्यासाठींच, 'सिंधुस्थान' या शब्दाच्या व्याख्येशीं कोणत्याहि अमुक एका पक्षपाती संस्थेचा किंवा धार्मिक गटाचा संबंध हेतुतचः टाळण्यांत आलेला आहे. उदा. आर्यावर्ताची पुढें दिलेली एक अधिकृत व्याख्या पहा: "चातुर्वर्ण्यव्यवस्थानं यस्मिन्देशे न विद्यते। तं म्लेच्छदेशं जानीयादार्यावर्तस्ततः परम्॥" ही व्याख्या जरी वाजवी असली तरी ती सर्वकाल उपयोगी पडणारी नाहीं. संस्था ही समाजाकरिता असते, परंतु समाज किंवा त्याची ध्येयें हीं कांहीं संस्थेकरिता नसतात. चातुर्वर्ण्यव्यवस्थान हें आपलें उद्दिष्ट साध्य झाल्यावर किंवा तें साध्य होणें अशक्य असें ठरल्यावर कदाचित् लुप्तसुद्धां होऊन जाईल! परंतु त्यामुळें काय आमची ही भूमि लगेच परकीयांची म्हणजे म्लेच्छभूमि होईल? संन्यासी, आर्यसमाजी, शीख, आणि कितीतरी इतर जे स्वतः चातुर्वर्ण्यव्यवस्था मानीत नाहींत ते या व्याख्येप्रमाणें काय परके समजावयाचे? शिव! शिव! ते तर आमच्याच रक्ताचे, एका वंशाचे, एका देशाचे नि एक देव मानणारेच आहेत! 'तं वर्षं भारतं नाम भारती यत्र संततिः' ही व्याख्या त्या व्याख्येहून दसपट अधिक सार्थ आहे; कारण ह्यांत तिजपेक्षां सत्याचा भाग निःसंशय अधिक आहे! आम्ही हिंदु सारेजण एकच आहोंत आणि एकराष्ट्रहि आहोंत, कारण मुख्यतः म्हणजे आपण एका रक्ताचे आहोंत-"भारती संततिः"

## आमच्या राष्ट्राची जिवंत मायबोली—संस्कृतनिष्ठ हिंदी

इतिहासाच्या या कालांत–बुद्धधर्माच्या अभ्युदयाबरोबर व त्हासाबरोबरही,–हिंदुस्थानामध्यें हिंदी प्राकृत भाषांची वाढ आणि फैलाव विलक्षण झपाट्यानें झालेला दिसून येईल. जुन्या वैदिक परंपरेच्या अभेद्य तटबंदींत संस्कृत भाषाच हळुहळू इतकी बद्ध होऊन पडली कीं नवीन कल्पना किंवा नवीन शब्द याचा उपयोग सन्मान्य नि शिष्ट वाङ्मयात होण्यापूर्वी त्याचे संस्कृतांत रूपांतर करण्याची प्रथा प्रचारांत आली. त्यामुळें साहजिकच नित्याच्या व्यवहारासाठीं व सामाजिक संबंधासाठीं प्रचलित प्राकृत भाषाकडेच लोकांना वळावें लागले. वास्तविक याच प्राकृत भाषा लोकांच्या जिवंत आणि रसरसणाऱ्या विचारांना नाविन्य, तेज आणि सुटसुटीतपणा प्राप्त करून देण्याला सर्वस्वीं योग्य, अशाच होत्या. म्हणून सिंधु किंवा सिंधुस्थान हे शब्द जरी कांहीं संस्कृत ग्रथांत सापडतात, तरी त्यावेळच्या शिष्टसम्मत प्रथेला अनुसरून बहुतेक साऱ्या संस्कृत ग्रंथकारानीं 'भारत' हाच शब्द, प्रौढपणाचा निदर्शक म्हणून योजलेला आहे. परंतु यच्चयावत् प्राकृत बोलींनीं मात्र आर्यावर्त किंवा भारत या परंपरागत प्राचीन नि प्रिय नांवाचा स्वीकार न करता आपल्या भूमीचें अधिक लोकप्रिय झालेलें हिंदुस्थान [ सिंधुस्थान ] हेंच चालू नांव रूढ केलें. संस्कृत मधील 'स'चा हिंदु आणि अहिंदु प्राकृत भाषामधून 'ह' असा बदल कसा होतो या संबंधींचें विवेचन पुनः याठिकाणीं करण्याची आवश्यकता नाहीं. आणि याचमुळें हिंदुस्थानांतील बोलल्या जाणाऱ्या रूढ प्राकृत भाषांत निर्माण झालेल्या वाङ्मयामध्यें हिंदु किंवा हिंदुस्थान याविषयीं जागोजाग उल्लेख सांपडतात संस्कृत ही आमच्या जातीचा अत्यंत पवित्र आणि अत्यंत अभिमानास्पद असा चिरंतनचा वारसा आहे. आमच्या जातींचें मूलभूत ऐक्य घडवून आणण्यास प्रामुख्यानें तिचेंच सामर्थ्य कारणीभूत झालें. आमचीं जीवन मूल्यें नि आमच्या ध्येयाकांक्षा याना उदात्त उन्नत करीत या संस्कृत देववाणीनेंच आमच्या राष्ट्रीय जीवनाचे प्रवाह परिपूत नि विशुद्ध केले. आणि असें असूनहि आमच्या राष्ट्राच्या सर्व लोकसमाजाची जिवंत मायबोली होण्याचा अग्रपूजेचा मान संस्कृतच्या त्या सर्वांत ज्येष्ठ असलेल्या कन्येनें, त्या प्राकृत हिंदीनेंच

मिळविला; आणि प्राचीन सिंधूंचा किंवा हिंदूंचा राष्ट्रीय आणि सांस्कृतिक वारसा घेऊन ख्यातनाम झालेल्या हिंदूंचीच ती भाषा झाली. हिंदी ही निर्विवादरीत्या सर्व हिंदुस्थान अथवा सिंधुस्थानचीच भाषा होय. हिंदीला राष्ट्रभाषेच्या सम्राज्ञी पदावर चढविण्याचा प्रयत्न हा कांहीं नवीन अथवा मारून मुटकून केलेला नाहीं. हिंदुस्थानांत ब्रिटिशाचें राज्य प्रथापित होण्या-पूर्वी कितीतरी शतकें ह्याच भाषेचें माध्यम स्वीकारून साऱ्या हिंदुस्थानभर व्यवहार चालत असल्याचे दाखले आपल्या इतिहासांत सापडतात. रामेश्व-राहून निघणारा व हरिद्वारापर्यंत जाणारा एखादा साधु किंवा व्यापारी साऱ्या हिंदुस्थानभर याच भाषेतून आपले मनोगत प्रकट करीत असे. पंडितांच्या आणि पृथ्वीपतींच्या मेळाव्यात त्याला संस्कृतमुळें प्रवेश मिळत असेल, परंतु राजसभेंत नि त्याचप्रमाणें हाटाबाजारांतहि हिंदी हीच, सर्वांना एकत्र आण-णारी खरीखुरी लोकभाषा होती. कुणाहि नानकाला,[१] चैतन्याला[२] किंवा रामदासाला देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जणुं कांहीं आपल्याच प्रांतात फिरल्याप्रमाणें, आपल्या तत्त्वांचा नि शिकवणुकीचा प्रचार मोकळेपणानें याच भाषेमधून करतां आला असता—नव्हे तसा तो त्यांनीं केलाहि! सिंधुस्थान किंवा सिंधु, किंवा हिंदुस्थान अथवा 'हिंदु' ह्या आपल्या पुरातन नांवाचें पुनरुज्जीवन होत असतांना आणि तीं नावें लोक-प्रिय होत असतांनाच ज्या अर्थी त्यांच्या बरोबरीनें आपल्या या संपूर्णपणें राष्ट्रीय असलेल्या भाषेची वाढ आणि प्रगति होत आलेली होती, त्याअर्थी ती सबंध राष्ट्राचीच मत्ता झाल्यामुळें तिला 'हिंदी' हेंच नाव प्राप्त व्हावें हें क्रमप्राप्तच होतें.

---

१. शीखाचा धर्मसंस्थापक. आदिगुरु नानक हा पंजाबांत रावीच्या काठीं खि. १४६९त जन्मला. हिंदुमुसलमानातील वैरभाव कमी व्हावा म्हणून यानें एक नवीन पंथ काढला. त्याला मिळालेल्या अनुयायास शिष्य म्हणजे 'शीख' म्हणतात. खि. १५३८ तो मरण पावला.

२. सोळाव्या शतकांत बंगालमध्यें होऊन गेलेला एक भगवत्‌भक्त संत-वैष्णव पंथाचा संस्थापक. जातिभेदाची बंधनें तो पाळत नसे.

## हिंदुराष्ट्राच्या वैभवाचा काल

'हूणा' ना आणि शकांना आपल्या बाहुपराक्रमानें हुसकून लाविल्यानंतर पुढें कित्येक शतकें सिंधुस्थान हें भयरहित स्वातंत्र्याचें माहेरघरच होऊन राहिलें, आणि पुन्हा एकदा या भूमीवर शांतता आणि समृद्धि यांचें साम्राज्य नांदूं लागलें. स्वराज्याचें आणि स्वातंत्र्याचें स्वास्थ आणि सुख, राजांपासून रंकांना सर्वांना समानतेनें उपभोगतां येऊं लागलें. देशाभिमानी वाङ्मयकारांनीं, सुखसमृद्धिवैभवानें नटलेल्या या एक हजार वर्षांच्या दीर्घ ऐतिहासिक कालखंडाचा महिमा मोठ्या हर्षभरानें वर्णिला आहे. "ग्रामे ग्रामे स्थितो देवः देशे देशे स्थितो मखः। गेहे गेहे स्थितं द्रव्यं धर्मश्चैव जने जने॥" (भविष्यपुराण, प्रतिसर्गपर्व). सिंहलद्वीपापासून ते काश्मीरापर्यंत, साऱ्या हिंदुस्थानात रजपुतांच्या एकाच राजवंशातील राजाची सत्ता चालत होती. पुष्कळ वेळां परस्पर विवाहसंबंधानें हीं राजघराणीं अधिक जवळ येत. परंतु त्याहीपेक्षां समान धर्म आणि संस्कृति यांच्या बंधनांनीं आणि शौर्य पराक्रमाच्या पूर्वागार परंपरेनें त्यांचे संबंध एकमेकाशीं अधिक दृढ होत. सबंध राष्ट्राचें जीवन, सुखसमृद्धीच्या आणि तितकेंच मांगल्याच्याहि दृष्टीनें पूर्ण सुसंवादी नि सुरेल बनले होतें; आणि आपल्या राष्ट्रभाषेचा झालेला विकास म्हणजे त्याच ऐक्यपूर्ण राष्ट्रीय जीवनाची साक्ष पटविणारा प्रत्यक्ष नि दृश्य असा पुरावाच होता.

## मुसलमानांचीं आक्रमणें नि हिंदूंचा पराक्रमी प्रतिकार

परंतु इतिहासांत अनेकदां घडल्याप्रमाणें, शांततेच्या आणि सुखसमृद्धीच्या याच निर्बंध अशा आनंदांत रंगून गेल्यामुळें खोट्या सुरक्षिततेच्या भ्रमात राहण्याची आणि स्वप्नाळू ध्येयसृष्टींत बहकण्याची सवय आपल्या सिंधुस्थानाला जडली. शेवटीं, सिंधुस्थानची सीमा असलेली सिंधु ओलांडून जेव्हां गझनीचा महंमद सिंधूस्थानावर उद्धटपणानें चाल करून आला तेव्हा ती झोंप चाळवली गेली आणि सिंधुस्थान खडबडून जागें झालें. त्या दिवसापासून जीवन-मरणाच्या खऱ्या झुंजीला प्रारंभ झाला. 'पर' अशा दुसऱ्याशीं जेव्हां युद्धाला उभे राहाणें प्राप्त होतें, तेव्हांच 'स्व'त्वाची

जाणीव स्वतःला अधिक तीव्रतेनें होत असते. समान शत्रूचें भय हें एकच, दुसऱ्या कोणत्याहि इतर गोष्टीपेक्षा राष्ट्रीय ऐक्य किंवा अनेकांचें एक विशाल असे संघराष्ट्र निर्माण होण्याची शक्यता अधिक निर्माण करिते. आपलें अविभाज्य असें एकसंघ बलशाली राष्ट्र बनविण्याची दुसरी अधिक चांगली संधि किंवा दुसरी अधिक प्रभावी अशी प्रेरणा सिंधुस्थानाला तो विख्यात मूर्तिभंजक गझनीचा महम्मद[१] सिंधू ओलां डून इकडे आला, त्या भयंकर दिवसापेक्षां आजपर्यंत पूर्वी कधींच झाली नसेल. मुसलमान, याऱ्याहि आधीं कासीमच्या[२] नेतृत्वाखालीं सिंधु उतरले होते; परंतु तो वार त्यावेळीं इतका खोल लागलेला नव्हता; केवळ चाटून गेला होता. कारण त्यामुळें आमच्या राष्ट्राच्या हृदयाला कांहीं दुखा-पत झाली नाहीं; व मारणाऱ्यांचाहि तसा उद्देश नव्हता! खरी अटीतटीची झुंज महंमदापासून सुरू झाली. आणि जर सांगायचेंच झालें तर अब्दाली[३] बरोबरच संपली. वर्षोनुवर्षें, दशकोनुदशकें, आणि शतकोनुशतकें ही झुंज अव्याहतपणें चालू होती. अरबस्तान, हा अरबस्थान म्हणून यापुढें नाम-शेष झाला. इराणची राखरांगोळी झाली. इजिप्त, सिरिया, अफगाणिस्तान, बलुचिस्तान तार्तरी नि थेट ग्रानडापासून (स्पेनपासून) गझनी (अफगा-

---

१. गझनीच्या या सुलतान महम्मदानें खि. १००१ पासून १०३० पर्यंत हिंदुस्थानवर सतरा स्वाऱ्या केल्या. काठेवाडांतील सोरटी सोमनाथवर खि. १०२४ मध्यें यानें स्वारी करून तेथील जड जवाहीर इ. अगणित संपत्ति लुटून नेली.

२. महम्मद कासीमनें खि. ७११ मध्यें हिंदुस्थानावर स्वारी केली. दाहीर राजाचा वध करून त्यानें सिंधप्रांत खालसा करून टाकला. लुटींत धरलेल्या दाहीरच्या मुलींना त्यानें खलीफाला अर्पण केलें. पुढें याच मुलींनीं खलीफाला वश करून घेऊन कासीमचा भयंकर शेवट करविला व आपल्या बापाचा सूड घेतला!

३. अहमदशाह अब्दाली (खि. १७६१) पानिपतचा मराठ्यांचा प्रतिस्पर्धि शत्रू.

गिस्तान ) पर्यंतचीं सारीं राष्ट्रं आणि त्यांच्या संस्कृति, इस्लामच्या ( स्मशान शांतता प्रस्थापित करणाऱ्या शांतता प्रेमी (!) ) खड्गापुढें चक्काचूर होऊन गेल्या. परंतु येथेंहि पहिल्या प्रथमच त्याच्या खड्गाला, संपूर्ण मारून टाकण्याइतके नाहींच पण केवळ आघात करण्याइतकेंच यश मिळालें. प्रत्येक नव्या आघातासरशीं तें बोंथट बनत गेलें. प्रत्येकवेळीं तो आघात जरी खोल घावाला कारणीभूत होत होता तरी पुन्हां मारण्यासाठीं म्हणून जेव्हां तो प्रहार मागें घेतला जाई तेव्हा शत्रूला पूर्वीचा घाव फिरून सांधलेलाच दिसे. मौज अशी कीं जितांची प्रतिकार–क्षमता जेत्यांच्या आक्रमण–क्षमतेपेक्षां अधिक प्रभावी आणि बलशाली ठरली. दोघामधील हा विरोध केवळ भीषणच नव्हे तर प्रचंडपणें अतुलनीय असाच होता. हिंदुस्थानला जो हा लढा द्यावा लागला, तो केवळ एका जातीशीं, वंशाशीं, राष्ट्राशी किंवा एका जनशक्तीशीं नव्हता. जवळ जवळ सर्व आशिया आणि लगेच त्याच्यामागून सारें युरोप त्याच्याशीं यापुढें लढावयास यावयाचें होतें. अरबानीं सिंध व्यापला;–आणि एकटे असे ते यापेक्षां अधिक काहीं करू शकणार नव्हतेच ! पुढें तर थोड्याच अवधींत आपल्याच भूमीमध्यें आपलें स्वतःचें स्वातंत्र्य टिकविणेंच अरबाना अशक्य झालें, आणि राष्ट्र म्हणून त्यानंतर त्यांचें नांवहि फिरून आपल्या ऐकण्यात आलें नाहीं. परंतु इकडे हिंदुस्थानाला मात्र अरब, पर्शियन, पठाण बलुची, तार्तार, तुर्की, मोंगल यांच्यां जागतिक स्वरूपाच्या प्रचंड झंझावातानें व्यास झालेल्या मानवी सहारा वाळवंटाशीं झगडा करावा लागला. धर्म ही एक अत्यंत प्रभावी अशी शक्ति आहे. त्याच प्रमाणें लूट करण्याची लालसा हीहि तशीच आहे. परंतु लुटालुटीच्या लालसेनें जेव्हां धर्माच्या भावना उद्दीपित केल्या जातात आणि हीच लुटालुटीची आसुरी हांव जेव्हां धर्माची हस्तक बनते, तेव्हां या दोहोंच्या संयोगानें जी एक भयंकर अशी शक्ति निर्माण होते तिला तोड म्हणजे या दोहोंच्या आक्रमण मार्गांत जो भयंकर मानवी संहार होतो आणि प्रदेशांची राखरांगोळी उडत असते, त्यांचीच होऊं शकेल. ज्या दिवशीं अकस्मात् महंमदानें सिंधु उतरून हिंदुस्थानावर चाल केली त्या दिवशीं भयंकर संहार घडविण्यासाठींच, स्वर्ग आणि नरक दोघेहि एकाच कार्याकरिता हातमिळवणी करून आले कीं काय असे

वाटलें. दिवसें दिवस, दशकोनुदशकें, शतकोनुशतकें ही भीषणभयंकर झुंज लढत होती; आणि हिंदुस्थाननें केवळ एकाकी, ती झुंज नैतिक आणि सैनिक दृष्टीनें झुंजविलीहि, अकबर जेव्हां गादीवर आला आणि दारा शुकोहचा[1] जेव्हां जन्म झाला तेव्हां खरा पूर्ण नैतिक विजय प्राप्त झाला असें म्हटलें पाहिजे. नैतिक रणभूमीवर गमावलेली आपली नैतिक सत्ता परत मिळवण्याच्या औरंगजेबाच्या पिसाट प्रयत्नांमुळें मात्र खऱ्याखुऱ्या रणभूमीवर त्याची सैनिक श्रेष्ठताहि गमाविली जाण्याची संधि अधिक समीप आणली गेली. शेवटीं सदाशिवरावभाऊनें, अक्षरशः मोंगलांच्या सिंहासनावरील छताचे, घण मारून शतशः तुकडे तुकडे केले. पानिपताचा दिवस उजाडला. हिंदु ती लढाई हरले परंतु तो लढा मात्र त्यानीं संपूर्णपणें जिंकला! पुढे एकाहि अफगाणाची दिल्लीकडे बोट शिरकविण्याची छाती झाली नाहीं. नंतर मराठ्यांनीं अटकेवर फडकविलेला हिंदु विजय-ध्वज पुनः आपल्या शीख बांधवानीं हातीं घेतला आणि सिंधूच्या पलिकडे पार काबुलच्या तीरावर तो नेऊन रोविला.

## हिंदुत्वाचा आत्मसाक्षात्कार

या भीषण आणि सुदीर्घ कालवर चाललेल्या झगड्यामध्यें आपण हिंदु असल्याची तीव्रतर जाणीव झाडून सर्वांना झाली. आणि आजपर्यंत इतिहासात कधींहि न घडलेले घडून येऊन सर्व राष्ट्र एकाच राष्ट्रभावनेनें निबद्ध झालें. आतां हें मात्र विसरतां कामा नये कीं, आम्ही आतापावेतों सर्व हिंदु हालचालींचा एकत्र आणि एकात्म असाच विचार केला. केवळ हिंदु धर्मांत नव्हे तर हिंदुत्वामध्यें समाविष्ट केल्या जाणाऱ्या अमुक एका पंथाचा किंवा धर्माचा विचार आम्हाला अभिप्रेत नव्हता नि तो तसा आम्ही केलाहि नाहीं. सनातनी,[2] सत्नामी,[3] शीख, आर्य,[4] अनार्य, मराठे आणि मद्रासी,

---

१. शहाजहानाचा सर्वांत थोरला मुलगा. भाऊबंदकींत औरंगजेबानें याला ठार मारलें. हिंदु तत्त्वज्ञानाकडे त्याचा विशेष कल होता.

२. श्रुतिस्मृति पुराणोक्त अशा सनातन धर्माचे अभिमानी.

३. मध्य हिंदुस्थानांतील एका पंथाचें नाव. ४. आर्यसमाजी.

ब्राह्मण आणि पंचम[1] या सर्वांनीं हिंदु म्हणूनच पराजय घेतले, आणि हिंदु म्हणूनच विजयहि मिळविले. आपल्या या जातीचीं आणि भूमीचीं इतर सर्व नावें मागें टाकून हिंदु आणि हिंदुस्थान हींच नावें सुप्रतिष्ठित करण्यांत शत्रूंनीं आणि मित्रांनीं बरोबरीनें भाग घेतला! आर्यावर्त आणि दक्षिणापथ किंवा जंबुद्वीप आणि भारतवर्ष यांपैकीं एकाहि नांवामध्यें आपलें राजकीय आणि सांस्कृतिक वैशिष्ट्य, हिंदुस्थान या नांवाइतकें उठावदारपणानें मांडण्याची शक्ति निश्चित नव्हती. सिंधुपासून समुद्रापर्यंतची ही भूमि हीच आपली जन्मभूमी असें आग्रहानें मानणाऱ्या सिंधूच्या या तीराच्या बाजूला राहणाऱ्या लोकांना, आपला हिंदुस्थान, या एकाच नांवानें दाखविला जातो ही स्पष्ट जाणीव होती. आपले शत्रु आपला हिंदु म्हणून द्वेष करीत, त्यामुळें अकस्मात् अटकपासून कटकपर्यंतच्या या भूमींत निवसत असलेल्या जातींचा, पंथाचा, मतांचा मिळून असा एक एकसंघ राष्ट्रपुरुष अस्तित्वांत आला. या ठिकाणीं आम्हांला असें विधान केल्यावाचून राहवत नाहीं कीं, खि. १३०० पासून खि. १८०० पर्यंत काश्मीरपासून सिलोनपर्यंत आणि सिंधुपासून बंगालपर्यंत, कधीं एकमेकाशीं संबद्ध तर कधीं एकसारख्याच अशा ज्या निरनिराळ्या हालचाली नि घडामोडी घडल्या व तरीहि त्या सर्वांतून राष्ट्राचा एकसंघपणाच सर्वांपेक्षा जास्त उठावदारपणानें प्रकट झाला, त्या एकूणएक हालचालींचा आणि घडामोडींचा बारकाईनें अभ्यास करून त्याचा ऐतिहासिक आढावा किंवा समालोचन अद्यापर्यंत कोणीहि केलेलें नाहीं. कारण हिंदुस्थानची प्रतिष्ठा आणि स्वातंत्र्य टिकवून केवळ हिंदुधर्माचीच नव्हे तर साऱ्या हिंदुत्वाची सांस्कृतिक आणि सार्वजनिक जीवनविषयक एकता प्रस्थापित करण्याचा प्रश्न मुख्य महत्त्वाचा होता. ह्याच हिंदुत्वाकरितां शेंकडों रणांगणावर युद्धें लढली गेलीं होतीं आणि अनेक प्रकारचे राजनैतिक डावपेंचहि लढवावे लागले होते. हिंदुत्व हा एक शब्द आपल्या सबंध राजकीय जीवनाचा भरभक्कम पृष्ठवंश—पाठीचा कणाच—बनून गेला होता; आणि तो इतका कीं काश्मीरांतील ब्राह्मणाच्या

---

१. मद्रासकडील अस्पृष्ट जातींपैकीं एक.

यातनांनीं मलबारच्या नायरांच्या डोळयातून दुःखाच्या सहसंवेदनेचे अश्रू गळत ! आपल्या भाटांनीं हिंदूंच्या पराजयावर शोककाव्यें रचिलीं; आपल्यां·तील द्रष्टया पुरुषानीं हिंदूंच्या भावना प्रज्वलित केल्या; आपल्यांतील वीर योद्धे हिंदूंच्या रणात लढाया लढले ! आपल्या संतमहात्म्यांनीं हिंदूंच्या प्रयत्नाना शुभाशिर्वाद दिले; आपल्यातील राजकारणी मुत्सद्यांनीं हिंदूंचें परमोज्ज्वल भवितव्य घडविलें; तर आपल्या मातामाउलींनीं हिंदूंनीं रणांत सोसलेल्या घावांवर प्रेमळ अश्रु सिंचन केलें व हिंदूंच्या पराक्रम दिग्विजयानीं अभिमानित होऊन त्यांच्या डोळयांतून आनंदाश्रूचे पूर लोटले !

## महत्त्वाचीं स्फूर्तिदायक अवतरणें

आमच्या ह्या वरील विधानांना पुष्टी देऊन त्यांची सत्यता प्रस्थापित करण्याकरितां जर आपल्या पूर्वजांच्या ग्रंथांतील उतारे आणि वचनें येथें उद्धृत करण्याचें ठरविलें तर एक स्वतंत्र ग्रंथच होईल. परंतु सध्या ज्या विशिष्ट विषेयाच्या विवेचनाचें सूत्र आपण हातीं घेतलें आहे तेंच इतकें महत्त्वाचें आहे कीं, वर सांगितलेलें काम कितीहि आकर्षक असलें तरी तिकडे संपूर्णत्वानें लक्ष देणे आपणाला शक्य नाहीं. आणि म्हणूनच आपल्या हिंदु जातींतील प्रतिनिधीभूत अशा महान् योग्यतेच्या व्यक्तींच्या मुखांतून किंवा लेखनातून जीं काहीं आवेशयुक्त आणि स्फूर्तिप्रद वचनें प्रकटलेलीं आहेत त्यातील काहीं थोडींच येथें उद्धृत करून समाधान मानणें आपल्याला अवश्य आहे.

## ‘ पृथ्वीराज रासो ’

हिंदी भाषेत आजपर्यंत जे जे नवे आणि जुने ग्रंथ लिहिले गेले आहेत त्यामध्यें चंदबरदाई या कवीनें लिहिलेल्या ‘ पृथ्वीराज रासो ’ या महाकाव्याइतका जुना व तितकाच अधिकृत असा दुसरा कोणताहि ग्रंथ उपलब्ध नाहीं असें सध्याच्या ऐतिहासिक संशोधनाचा विचार करतां म्हणावें लागतें. याहिपेक्षा जुने असें वाङ्मय म्हणून ज्याकडे बोट दाखवितां येईल असें एकच एक लघुकाव्य आतांपर्यंत उपलब्ध झालेलें आहे. परंतु मोठ्या भाग्याची आणि तितकींच चमत्काराची गोष्ट अशी कीं, उत्तरेकडे रूढ

असलेल्या प्राकृत भाषेंत उपलब्ध झालेल्या या आद्य काव्यांत, हिंदुस्थान या शब्दाचा उल्लेख मोठ्या ज्वलन्त देशाभिमानानें केलेला दिसून येतो. चंदबारदाईचा पिता जो वेन कवि तो पृथ्वीराजाच्या पित्याला म्हणजे अजमीरच्या राण्याला उद्देशून म्हणतो:—

अटल टाट महिपाठ, अटल तारागढथानं
अटल नग्र अजमेर, अटल हिंदव अस्थानं
अटल तेज परताप, अटल लंकागढ डंडिय
अटल आप चहुवान, अटल भूमिजस मंडिय
सभरि भूप सोमेसनृप, अटल छत्र ओपै सुसर
कविराय वेन आसीस दे, अटल जगा रजेस कर

हिंदी वाङ्मयाचा आद्यकवि म्हणून ज्याचा यथार्थत्वानें उल्लेख करावा लागतो तो चंदबरदाई भाट हिंदु, हिंदुस्थान किंवा हिंद हे शब्द इतक्या सहजतेनें आणि पुनः पुनः उच्चारतो कीं, त्यावरून पार आकराव्या शतकापर्यंत मागें हीं नांवें अगदीं रोजच्या व्यवहारांत रूढ होण्याइतकीं मान्यता पावली होतीं असें दिसून येतें. कारण, यावेळपर्यंत मुसलमानाचा पाय पंजाबामध्येंसुद्धां पूर्णपणें मुळींच रुजलेला नव्हता. आणि त्यामुळें रजपुतांनाहि आपल्या शत्रूंनीं दिलेलें निंदाव्यंजक नांव स्वीकारून तेंच आपल्या राष्ट्राचें मोठें राष्ट्रीय आणि अभिमानार्ह (!) नाव म्हणून मिरविण्याचें कारण नव्हतें. शहाबुद्दीनाला हिंदूंनीं बद्ध करून आणल्यावर पुनः 'हिंदू'कडे डोळा वर करून पाहणार नाहीं या अटीवर पृथ्वीराजानें त्याला मोकळे सोडून दिलें. त्या संबधीं चंद कवि म्हणतो:—

"राखि पंचदिन साहि अदब आदर बहु किन्नो
सुज हुसेन गाजी सुपूत हथ्थै ग्रहि दिन्नो
किय सलाम तिनबार जाहु अपन्ने सुथानह
मति हिंदुपर साहि सज्जि आऔ स्वस्थानह"

(पृ. रासो. स. ९)

परंतु हिंदूंच्या परम औदार्यानें सरळ होण्याइतका शहाबुद्दीन सुष्ट नव्हता.

पुनः पुनः तो चढाई करून येई आणि भीषण युद्धाला तोंड लागे; त्यामुळें देवलोकातल्या कळीच्या नारदाला इकडे आनंदाच्या उकळ्या फुटतात.

“ जब हिंदुदल जोर हुअ छुट्टि मीरधर भ्रम
असमय अरब्बस्तान चला करन उद्धसाक्रम ”

आणि पुन्हा

“ जुरे हिंदु मीरं, बहे खग्ग तार
मुखे मारमारं बहे सूरसारं

आणि शेवटीं

हिंदु म्लेच्छ अघाअि घाअिन
नंची नारद युद्ध चायन !! ”

परंतु हिंदूंना चिरडून नामशेष करून टाकण्याचें प्रयत्न करूनहि शहाबुद्दीनाला मात्र कुठेंच आणि केव्हाच विजय मिळाला नाहीं; व एके दिवशीं प्रद्युम्नरायानें शहाबुद्दीनालाच बद्ध केल्याची विजयी वार्ता दिल्लीला येऊन थडकली व सारे दिल्ली नगर न भूतो न भविष्यति अशा आनंदात नाचूं लागलें. आपल्या राजराजेश्वर पृथ्वीराजाचें अभिनंदन त्या उभ्या नगरानें केलें.

“ आज भाग चहुआन घर।
आज भाग हिंदवान॥
इन जीवित दिल्लीश्वर।
गंज न सक्कै आन॥ ”

आजपर्यंत ज्यानें अनेक आणाभाका घेऊन त्या मोडल्या होत्या त्याच शहाबुद्दीनानें पुन: तशाच दीनतेनें आणाभाका वाहून, फिरून आपली सुटका करून घेतली; व आतां मात्र शेवटल्या खेपेला, त्यानें हिंदुस्थानावर जोराची चढाई करून एका मुसंडीसरशीं तो दिल्लीच्या वेशीपर्यंत येऊन धडकला. ‘हिंदपति’ पृथ्वीराजानें तातडीनें आपल्या युद्धमंडळाची सभा पाचारिली. शहाबुद्दीनानें उद्धटपणें युद्धाचें आव्हान दिलें. रावळ आणि सामंत यांचा क्रोध पुनः भडकून उठला. मुसलमान दूताला प्रतिनिरोप

देतांना चामुंडरायानें, शहानें पूर्वी अनेकदां आपल्या पायाची धूळ चाटल्याचें त्यास स्मरण देऊन पुढें सांगितलें.

" निर्लज्ज म्लेच्छ लजे नहिं। हम हिंदु लजवान्॥ "

—शेवटीं तो भीषण दिवस जवळ येत चालला आणि आतां ही निकराची प्राण देतीघेती झुंज निश्चित घडणार, याची दोन्ही पक्षांना निश्चिति होऊन चुकली. हम्मीर फितुर झाला त्याच दिवशीं चंदबरदाई भाट दुर्गादेवीसमोर जाऊन पुढील प्रकारची अत्यंत करूणरसपरिप्लुत पण तितकीच ज्वलन्त देशाभिमानानें विनटलेली प्रार्थना स्तोत्ररूपानें सादर करितो:—

" द्रग्गे हिंदुराजान बंदीन आयं
जंप जाप जालधरं तूं सहायं
नमस्ते नमस्ते इ जालंधरानी
सुरं आसुरं नागपूजा प्रमानी. "

त्या संग्रामाचा जो भयंकर निर्णय झाला त्याचे, आणि त्यानंतरच्या चंदबरदाईच्या ज्या चातुर्यपूर्ण युक्तीनें पृथ्वीराजानें शहाबुद्दीनाला मारलें त्याचें समग्र वर्णन देऊन त्या धारातीर्थी पतन पावलेल्या हिंदुसम्राटाला कवीनें आपली अत्यंत हृदयस्पर्शी अशी श्रद्धांजलि अर्पून आपलें काव्य पूर्ण केलें आहे.

" धनि हिंदु प्रथिराज, जिने रजवट्ट उजारिय
धनि हिंदु प्रथिराज बोल कलिमझ्झ उगारिय
धनि हिंदु प्रथिराज, जेन सुविहान ह संध्यो
बारबारह ग्रहिमुक्कि, अंतकाल सर-बंध्यो "

## श्रीरामदासांनीं पाहिलेलें गूढ स्वप्न

एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, 'रासो'मध्यें भारत हा शब्द महाभारत या अर्थी जरी कित्येक ठिकाणीं आलेला आढळतो तरी 'भारतवर्ष' या अर्थी मात्र तो अगदीं क्वचितच योजलेला आहे. ही जी गोष्ट आपल्या उत्तर हिंदुस्थानांतल्या अत्यंत जुन्या अशा प्राकृत

हिंदी ग्रंथांत दिसून येते तीच गोष्ट थेट जी महान् हिंदवी क्रांति घडली आणि हिंदु स्वातंत्र्याचें जें युद्ध मराठ्यांनीं ठाणलें, तेथपर्यंतच्या आपल्या सर्व प्राकृत वाङ्मयात पाहावयास सापडते. त्या महान् हिंदवी क्रातीचे द्रष्टे आणि सर्व श्रेष्ठ अधिकारी–उपदेशक असलेल्या समर्थ रामदासानीं आपल्या एका गूढ आणि भविष्यसूचक काव्यात त्याना पडलेल्या स्वप्नाचा उल्लेख केला आहे; आणि मोठ्या हर्षभरानें, परंतु तितक्याच कृतज्ञतेनें, त्यांनीं जें आपण स्वप्नात पाहिले त्यातील बराचसा भाग खरा ठरल्याचेंहि आग्रहानें सांगितलें आहे.

स्वप्नीं जे देखिलें रात्रीं, तें तें तैसेचि होतसें
हिंडता फिरता गेलों, आनदवनभूवनीं ॥ १ ॥
बुडाले सर्वहि पापी हिंदुस्थान बळावलें
अभक्तांचा क्षयो झाला, आनदवनभूवनीं ॥ २ ॥
कल्पात माडिला मोठा, म्लेच्छ दैत्य बुडावया
कैपक्ष घेतला देवीं, आनंदवन भूवनीं ॥३॥
येथून वाढला धर्म, राजधर्म समागमें
संतोष माडिला मोठा, आनंदवनभूवनीं ॥४॥
बुडाला औरंग्या पापी, म्लेच्छ संहार जाहला
मोडिली मांडिली छत्रे, आनंदवनभूवनीं ॥५॥
बोलणें वाउगे होतें, चालणें पाहिजे बरें
पुढें घडेल तें खरें, आनंद वनभूवनीं ॥६॥
उदंड जाहले पाणी, स्नानसंध्या करावया
जपतप अनुष्ठानें, आनदवनभूवनीं ॥७॥
स्मरलें लिहिलें आहे, बोलता चालतां हरी
रामकर्ता राम भोक्ता, आनंदवनभूवनीं ॥८॥

## शिवरायांचा भक्त—कवि भूषण

देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत हिंडून ज्यानीं ‘हिंदवाना’ला कृति करण्यास जागृत करून, हिंदूंच्या मुक्ततेचें रण लढावयास नि तें

यशस्वी करण्यास स्फूर्ति दिली, त्या आपल्या राष्ट्रीय भाटांत अत्यंत प्रख्यात असा जो 'भूषण' त्यानें औरंगझेबालाच पुढील सवाल टाकलेला आहे.

" लाज धरौ शिवजीसे लरौ सब सैयद सेख पठान पठायके।
भूषन ह्यां गढकोटन हारे उहां तुम क्यों मठ तोरे रिसायके ॥
हिंदुके पति सोंन विसात सतावत हिंदु गरीबन पायके।
लीजै कलंक न दिल्लीके बालम आलम आलमगीर कहायके ॥

आणखी एके ठिकाणीं भूषण लिहितो—

" जगतमे जीते महावीर महाराजन ते
महाराज बावन हूं पातसाह लेवाने।
पातसाह बावनौ दिल्लीके पातशाह दिल्लीपति
पातसाह जीसो हिंदुपति सेवाने"
दाढीके रखैयन की दाढीसी रहति छाति
बाढी जस मर्याद हद हिंदुवाने की
कढि गयि रयतिके मनकी कसम मिट गयी
ठसक तमाम तुरकानेकी
भूषण भनत दिल्लीपति दिल धकधका सुनिसुनि
धाक सिवराज मरदानेकी
मोठी भयि चंडि बिन चोटीके चबाय सीस
खोटी भयि संपत्ति चकताके[१] घरानेकी ॥"

( गरीब बिचाऱ्या हिंदु गोसाव्या भिकाऱ्यांना छळून आणि हिंदु मठ-मंदिराचा विध्वंस करून हे औरंगजेब, तूं काय मोठी फुशारकी मिरवतोस ? स्वतः हिंदपतीशीं सामना देण्याचें धैर्य तुज जवळ कोठें आहे ? हिंदुसम्राट शिवरायानें तुझी रग जिरविली असल्यानें आलमगीर म्हणजे जगाला जिंकणारा अशी धादांत खोटी पदवी आपल्यामागें लावून घेताना तुला एवढी-सुद्धां लाज कशी वाटत नाहीं ! )

---

१. बाबरच्या घराण्याची.

शिवाजीनें केलेल्या पराक्रमाविषयीं भूषण गातो:—

राखी हिंदुवानो, हिंदुवानके तिलक राख्यो,
स्मृति और पुराण राख्यो वेद विधी सुनि मैं

राखी रजपूती राजधानी राखी राजनकी,
धरामे धरम राख्यो राख्यो गुण गुणीमे
भूषण सुकविजीति हद्द मरहट्टनकी, देसदेस
करिति बखानी तव सुनि मैं

साहीके सुपूत सिवराज समसेर तेरी, दिल्लीदल
दाबीके दीवाल[२] राखी दुनिमै ॥

## छत्रसालाचें गुणगायन

शिवरायानीं आणि त्याच्या बरोबरच्या देशवीरांनीं जीं शौर्य पराक्रमाचीं कृत्यें केलीं त्याविषयीं वरील प्रकारचीच अभिमान–प्रशंसेची भावना हिंदुस्थानमधील सर्व स्वकीय हिंदूंच्या मनात वसत होती. भूषण हा जरी मराठा नव्हता तरीहि शिवरापासून बाजीरायापर्यंतच्या मराठा योद्धयांच्या वीरमर्दुमकीच्या स्वाऱ्या जशा कांहीं आपल्याच बाधवांनीं केल्या या अभिमानानें तो त्यांकडे पाहात असल्याचें दिसतें. तो अगदीं हिंदूतला सच्चा नि कट्टर हिंदु होता; आणि अगदीं आपल्या अंतकाळच्या दिवसापर्यंत तो अखिल हिंदु आंदोलनाचें माहात्म्य मोठमोठया पुढाऱ्यांच्या मनांवर ठसवीत त्याच प्रकारची स्फूर्तिप्रद आणि परिणामकारक काव्यें रचीत आणि गात होता. भूषणाच्या आवडीचा दुसरा शूर राजपुरुष म्हणजे बुंदेलखंडाचा छत्रसाल:—

“हैवर[३] हरट्ट[४] साजि गैवर[५] गरट्ट[६] समपैदर थट्ट
फौज तुरकानकी

भुषण भनत रायचंपतिको छत्रसाल रोप्यो रनख्याल
व्हैके ढाल हिंदवानेकी”

२. देवालय. ३. अश्व, ४. हृष्टपुष्ट, ५. गजवर, ६. संघ.

आणि छत्रसालाचा गाईलेला हा महिमा कांहीं खोटाहि नव्हता. शिवाजी, राजसिंह, गुरुगोविंदसिंह यांप्रमाणेंच छत्रसालहि खरोखर हिंदवानाची रक्षक ढालच होता. तो स्वतः हिंदुत्वाचा पाठीराखा म्हणून आपणाला समजत असे. छत्रसाल म्हणतो.

हिंदु तुरक दीन द्वै गाये। तिनसो बैर सदाचलि आये ॥
लेख्यो सूर असुरनको जैसो। केहरि करिन बखानो तैसो ॥

जबते शहा तखतपर बैठे। तब ते हिंदुन सौं उर डाठे ॥
महगेकर तीरथनि लगाये। वेद देवाले निदर ढहाये ॥

सब रजपूत सीर नित नावै। ऐड करे नित पैदल धावे।
ऐड एक शिवराज निबाही। करै आपके चित्तकि चाही ॥
आठ पातसाही झुक झौरे। सूबनि बाधि डाड ले छौरे ॥

छत्रसालानें शिवरायाना दिलेल्या ऐतिहासिक भेटीचे वेळीं शिवरायांनीं छत्रसालाला चागलें प्रोत्साहन देऊन गोरविलें होतें "तुम छत्री सिरताज। जीत आपनी भूमिकौ करौ देशकी राज ॥" हा बुंदेला वीर जेव्हा बुंदेलखंडातील प्रबल रजपूत सुजानसिंह याला भेटला तेव्हा त्याच्या भेटींत देशातील राजकीय परिस्थितीचें मोठें हृदयस्पर्शी चित्र सुजानसिंहानें रेखाटलें होतें.

"पातसाह लागे करन, हिंदुधर्म कौनासु
सुधि करि चंपतरायकी लइ बुदेला सासु
जब तै चंपति करयौ पयानौ, तब तै परयौ हीन हिंदवानो

लग्यो होंग तुरकजको जोरा, को राखे हिंदुनका तोरा
अब जो तुम कटि कसौ कृपानी, तौ फिरि चढे हिंदमुख पानी"

असें म्हणून त्या वृद्ध राजा सुजानसिंहानें आपली समशेर आणि आपलें हृदय छत्रसालाला अर्पिलें व त्याला व त्याच्या अंगीकृत कार्याला शुभाशीर्वाद चिंतिला—

"यह कहि प्रीति हिये उमगाई। दिये पान किरवान बधाई

दोऊ हाथ माथपर राखे । पूरन करौ काज अभिलाखे
हिंदुधरम जग जाइ चलावौ । दौरि दिलीदल हलनि हलावो
( छत्र प्रकाश[१] )

## शीख गुरु तेजबहादुरांचा हिंदुत्वाचा जाज्वल्य अभिमान

ज्या वंद्य गुरु तेजबहादुरांनीं हिंदुस्वातंत्र्यासाठीं चाललेल्या देशव्यापी युद्धांत प्रमुखत्वानें भाग घेऊन पंजाबमध्यें झगडा चालू ठेवला, इतकेंच नव्हे तर त्या करितां स्वतःचा देहहि ठेवला, त्याच्याविषयीं असें सागण्यात येतें कीं, ज्या वेळीं काश्मीरमधल्या ब्राह्मणावर जुलूम होऊन त्यांना "मुसलमान तरी व्हा नाहींतर मरणाला तरी सिद्ध व्हा" अशा प्रकारची धमकी देण्यात आली, तेव्हां त्यांनीं तेगबहादुरांची सहाय्याची याचना केली होती. त्यावेळीं तेगबहादुरांनीं त्याना असा उपदेश दिला कीं,

तुम सुनो दिजेसु ढिग तुर्केसु अबैसु इमगावो
इक पीर हमारा हिंदु भारा भाईचारा लख पावो
है तेगबहादुर जगत उजागर ता आगर तुर्क करो
तिसपाछे तबहि हम फिर सबहि बन है तुरक भरो
( पंथ–प्रकाश )

( "ब्राह्मणानो ! जा आणि तुमच्या तुर्की पीडकांना सांगा कीं, आमचा एक महान् हिंदु पुढारी आहे. त्याचे नाव तेजबहादुर, पहिल्यानें त्याला मुसलमान करा मग आम्हीहि होऊं !" )

आणि जेव्हां देशशत्रूनीं आणि धर्मशत्रूंनीं त्याला आव्हान दिलें तेव्हा त्या शूर गुरूनें निधडेपणानें सागितलें.

तिन ते सुन श्री तेगबहादुर । धर्म निवाहन विषे बहादुर
उत्तर भनयो धर्म हम हिंदु । अति प्रियको किम करे निकंदु
( सूर्य प्रकाश )

---

१. छत्रप्रकाश हें छत्रसालाच्या राजवटीवर त्याच्याच आज्ञेनुसार लालकवि यानें लिहिलेले ऐतिहासिक काव्य.

( हे शब्द ऐकुन गुरु तेग बहादुर उत्तरले " मला प्राणापेक्षाहि प्रिय असलेल्या हिंदुधर्माची मी विटंबना कशी करूं ! " )

त्याचाच प्रथितयश पुत्र गुरुगोविंदसिंह, कवि, द्रष्टा आणि आपल्या हिंदु जातीसाठीं व हिंदु संस्कृतीसाठीं युद्ध ठाणणारा वीर योद्धा, आपल्या कविप्रतिभेत उद्गारला,

सकल जगतमें खालसा पंथ गाजे
जगे हिंदु धर्म सकल भंड भाजे
( विचित्र नाटक–गुरुगोविंदसिंहकृत )

( खालसा पंथाचा सर्वत्र पसार होवो, हिंदुधर्म चिरंजीव होवो व सर्व असत्य थोतांडाचा नाश होवो. )

' शिवछत्रपतींचें चरित्र ' या जुन्या बखरींत लेखक लिहितो, " शिवाजीनें मनात आलें जें. आपण हिंदु. सर्व दक्षिण देश यवनांनीं पादाक्रांत केला. क्षेत्रास पीडा केली. हिंदुधर्म बुडविला. प्राणहि देऊन धर्म रक्षू. आपलें पराक्रमें नवीन दौलत संपादू, तें अन्न भक्षू. परंतु महान् धोरणी आणि परम विश्वासू दादाजीनें सांगितलें " आपण म्हणतां तें कार्य चांगलें खरें, पण याचा शेवट लागणें परम दुष्कर. यास मातबर स्थलें असावीं. हिंदु राजे व हिंदु फौजा जागजागीं साह्यकर्त्या असाव्या. ईश्वराचें अनुकूल व सिद्ध पुरुषाचा आशिर्वाद असतां अशा गोष्टी घडतील.

( चिटणीस बखर )

आणि इतकें असूनहि त्या प्रचंड घालमेलीचा दादाजी कोंडदेव म्हणजे उजवा हात होता–प्रमुख मार्गदर्शक होता. खि. १६४६ त तरुण शिवबानें आपल्या एका तरुण देशप्रेमी सहकाऱ्याला पुढीलप्रमाणें पत्र लिहिलें होतें. " शहास तुम्ही आपली बेमानगिरी करीत नाहीं. आदि कुलदेव स्वयभू. त्यानीं आम्हास यश दिले व पुढें तो मनोरथ हिन्दवी स्वराज्य करून पुरविणार आहे. हें राज्य व्हावें हें श्रीचें मनात फार आहे. "

श्री. राजवाडे यांच्याजवळ या पत्राची मूळ प्रत आहे, आणि त्यावरून १७ व्या आणि १८ व्या शतकात घडलेल्या महान् हिंदु स्वातंत्र्य आंदो-

लनाचा खराखुरा मूर्त आत्माच आपल्या डोळ्यापुढें उभा राहतो. हें आदोलन, ही उठावणी आकुंचित वा मर्यादित नव्हती. हिंदवी स्वराज्याच्या, हिंदुसाम्राज्याच्या या महान् ध्येयानेंच विशीच्या आंत असलेल्या शिवबाच्या अंतःकरणाला स्फूर्ति देऊन कार्य प्रवृत्त केलें होते. त्याविषयीं त्याचे स्वतःचे शब्दच आपल्यापुढें आहेत.

## शिवरायांची हिंदुत्वाची चळवळ

परंतु शिवाजी आणि त्यानें चालविलेल्या राज्यस्थापनेच्या चळवळीलाच दडपून टाकण्यासाठीं जेव्हां रजपूत सरदार जयसिंग त्याजवर चालून आला, तेव्हा साहजिकच शिवरायाची प्रतिकाराची धार थोडीशी बोथट बनली. हिंदुत्वाची पुरातन पासूनची असलेली रक्षक ढाल जी राजपूत जाति, तीच आपल्या सहधर्मी बंधूंचें, आपल्या हिंदुधर्मीय बाधवाचें रक्त सांडण्यास, केवळ मुसलमानांना विजय मिळावा म्हणून पुढें यावी, हें दृश्य खरोखरच उद्वेगकारक होतें! शिवाजीनें जयसिंगाला लिहिलें "तुम्हांस जे किल्ले पाहिजेत ते मी देतों. निशाण चढवितों. पण मुसलमानांना यश न देणें. मी हिंदु. आपण रजपूत तेव्हा हिंदूच. राज्य मूळचें हिन्दूचें. हिंदुधर्मरक्षकापुढें मी डोकें शतदा नमवीन पण हिंदुधर्माची मानहानी होईल असें कधींहि करणार नाहीं!!"

जयसिंगावर या पत्राचा निःसंशय परिणाम झाला. आणि त्यानें प्रत्युत्तर लिहिलें, "औरंगजेब बादशाह पृथ्वीपति. त्याशीं तुम्ही सख्य करावें. शत्रुत्वानें राहून या कालीं परिणाम लागणार नाहीं. आम्ही हिंदु जयपूरचे राजे. हिंदूच. तुम्ही हिंदुधर्म स्थापन करता यास्तव आम्ही तुम्हाला अनुकूल आहों."

शिवरायाच्या नेतृत्वाखालीं उदय पावलेल्या हिंदु सत्तेनें उभ्या हिंदुस्थानांतील हिंदूचीं मनें एका नव्याच चैतन्यानें भारून टाकलीं होतीं. जुल्म अन्यायाखालीं वांकलेल्या अभाग्यांना तो आपला उद्धारक आणि प्रति अवतारी पुरुषच वाटला. मुसलमानी पारतंत्र्याच्या जोखडाखालीं संत्रस्त होऊन चरफडत असलेल्या सावनूर जिल्ह्यातील हिंदूंनीं म्हणूनच त्याला विनतिपत्र धाडलें "हा युसुफ फार खस्त आहे. बायकापोरांस उपद्रव देणें

जुलूम गोवधादि निंद्य कर्मे आम्ही त्याचे हाताखालीं वागण्यास कंटाळलों. तुम्ही हिंदुधर्माचे संस्थापक, म्लेच्छाचे नाशक, म्हणून तुम्हाकडे आलो. तुम्हाकडे आम्ही आलो म्हणून आमचे द्वारां चौकी बसली आहे. अन्नपाण्यावांचून जीव घेण्यास उद्युक्त झाले आहेत. तरी रात्रीचा दिवस करून येणें. "

"मुसलमानांचें अधिपत्य यापुढें मानणार नाहीं" या अटीवर शिवरायानीं जेव्हां तंजावरच्या आपल्या भावाला व्यंकोजीला तेथील गादी दिली आणि त्याला जहागिरीवर स्थापिलें तेव्हा शिवराय लिहितात "दुष्ट हिंदुविद्वेषी यांस आपुलें राज्यांत ठेवूं नये"

## मराठ्यांनीं घडविलेली 'हिंद्वी क्रांति'

स्वातंत्र्याच्या कामामध्यें सताजीनें आणि त्याच्या भावानीं केलेल्या राष्ट्रसेवेचें चीज करण्यासाठीं छत्रपति राजारामानें बहिर्जीला मोठ्या सन्मानाची आणि प्रतिष्ठेची 'हिंदुराव' ही पदवी अर्पण केली. जिंजीच्या वेढ्यांत ज्यावेळीं मराठी सैन्यें तो वेढा फोडून त्यातून निसटून जाण्याचा प्रयत्न करीत होतीं त्यावेळीं मोंगल सेनाधिकाऱ्याच्या हातांखाली लढत असलेल्या मराठ्याना आपल्याकडे वळवून घेण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता.– "नागोजी राजे याजकडे संधान केलें, तुम्ही आम्ही एक झाल्यास ही फौज मोडून हिंदुधर्म जतन करूं. त्यापक्षीं तुम्ही फुटून आम्हाकडे यावें." तेव्हा नागोजी राजे मुसलमानी नोकरी सोडून, मोर्चे उठवून, शहरांत ५००० फौजेनिशीं गेले...शिर्के हे मोंगलाचे ताबेदार बनले. (कारण त्याचे संभाजीनें शिरकाण केलें.) तेव्हा खंडोबल्लाळ म्हणाले "तुमचें शिरकाण केलें. तसेंच आमचेहि तीन पुरुष हत्तीपायीं मारविलें. परंतु हिंदूच्या दौलतीकरिता आम्ही झटत आहोंत. तुम्ही तों भागी आहां." तेव्हां शिर्के पण कारस्थानात आले; व मराठ्यास मिळून जिंजीहून राजाराम शत्रूच्या वेढ्यास तोडून गेले."

शाहूचा आणि सवाई जयसिंगाचा[१], हिंदुधर्माचे संरक्षणासाठीं मी काय

१. अंबरचा रजपूत राजा. (खि. १६६९–१७४३) हा मोंगलाचा सेनापति असूनहि पहिल्या बाजीरावाला आतून वश होता.

केलें व तूं काय केलेस, यावरून प्रेमांतलाच पण खूप वाद झाला. ( सरदेसाई मध्य विभाग. ) बाजीराव व नानासाहेबांच्या काळच्या पिढ्यातहि हिंदुत्व विषयींची ह्याच अहमिहमिकेची स्पर्धाळू भावना वास करीत होती. एक इतिहासकार लिहितो " पुष्कळांनीं बाजीरावाच्या उद्योगाचें अनुकरण व परिपोश केलेला दिसतो....ब्रह्मेंद्रस्वामी, गोविंद दीक्षित वगैरे देशभर यात्रा करून अनुभव घेतलेल्या साधुपुरुषाच्या ठिकाणीं वरील 'हिंदुपद पादशाही 'ची भावना स्फुरण पावत होती, व ते आपल्या सर्व शिष्यवर्गास याच भावनेनें उपदेशित होते." बाजीराव स्वतः म्हणतात " अरे बघत काय! चला जोरानें चाल करून, हिंदुपद पादशाहीस आतां ऊशीर काय? ( बाजीराव )

## हिंदुपदपादशाहीचा दरारा

त्या वेळच्या प्रमुख विचारवंतात ब्रह्मेंद्रस्वामी[1] हे अग्रेसर होते. " परंतु हिंदुधर्माचा उच्छेद ज्या राज्यात होतो त्यास भेटणें स्वामीस योग्य वाटलें नाहीं. हिंदूंच्या साम्राज्यांत देवब्राह्मणांचा छळ होणें ही गोष्ट किती लज्जास्पद आहे ही गोष्ट त्यानें शाहूच्या मनात भरवून दिली." ( सरदेसाई )

मथुराबाई[2] स्वामीस लिहितेः-" शंकराजी मोहिते, गणोजी शिंदे, खंडोजी नाळकर, रामाजी खराडे, कृष्णाजी मोड इत्यादि मातबर सरदारांनीं राज्य रक्षण करून शामलांचा ( हबशांचा ) मोड केला व कोकणांत हिंदु-धर्म राखला!" मथुराबाई आंग्रे या शूर ललनेनें लिहिलेलीं पत्रें इतक्या जळजळीत देशाभिमानानें भरलेलीं आणि आवेशपूर्ण आहेत कीं, ज्याना त्या महान् हिंदुउत्थानाचें खरें मर्म समजून घ्यावयाचें असेल त्यानीं हीं पत्रें अवश्यमेव वाचावींत.

पोर्तुगीजानीं गोव्यामध्यें धर्माच्या नांवाखालीं जी छळणूक आरंभिली

---

१. पहिले बाजीराव आणि छत्रपति शाहुमहाराज यांचे गुरु ( खि. १६४९-१७३८ ). हे स्वामी साताऱ्याजवळ धावडशीस राहात होते.

२. कान्होजी आंग्रे यांची पत्नी.

होती ती म्हणजे युरोपातील इन्क्विझिशनचीच[१] हिंदुस्थानात काढलेली आवृत्ति होती. एकदा त्यानीं हिंदूंना आपले धार्मिक आचार-विधि उघड-पणें पाळण्यास बंदी केली. तेव्हा लोकांच्या मूलभूत अधिकारांचा पाठपुरावा करणाऱ्या अंताजी माणकेश्वरानें ती आज्ञा मोडून इतर हिंदूंनाहि तेंच करण्यास सांगितलें. परंतु त्याला हें पूर्णपणें माहीत होतें कीं, दुबळा सविनय प्रतिकार याचा अर्थ म्हणजे दुबळ्याच्या नशीबीं येणारीं दुःखें भोगणें हाच होय! म्हणून त्यावेळच्या परिस्थितीवर विजय मिळवावयाचा असेल तर कोण्या बाजीरावाच्या नाहींतर चिमणाजीच्या तरवारीचें साहाय्य मिळविणें अवश्य होतें. हिंदुस्थानामध्यें पोर्तुगीजांच्या प्रदेशात क्रांति घडवून आणणारा म्हणजे अंताजी माणकेश्वर हाच होय. महान् हिंदुनेत्याची सहानुभूति त्यानें या कार्यासाठीं बाजीरावाला मिळवून दिली. आणि खरें पहातां ज्यानें मराठ्यांचें दडपण आणून, चिमाजी आप्पाच्या विजयी चढाईनें जवळ जवळ सारा हिंदु प्रदेश मुक्त केला, तो अंताजी हाच या सर्व चळवळीचा खरा सूत्रधार होता.

## पहिले बाजीरावसाहेब पेशवे

परंतु इतक्यामध्येंच आणि वसईच्या पाडावानंतर, नादिरशहा हिंदुस्थानावर चालून आला आणि दिल्ली त्याच्या हातात पडली. बाजीरावाचे मराठे हस्तक त्याला लिहितात "तहमास्पकुलीखान काहीं देव नाहीं, जे पृथ्वी कापून काढील! जबरदस्ताशीं सूलूख करील. म्हणून मातबर फौजेनिशीं यावे. आधी जबरदस्त व मग सूलूख. आतां सारे रजपूत व स्वामी ( बाजीराव ) एक झालिया निकाल पडेल. समस्तास ( हिंदूस ) बुंदेले वगैरे एक जागा करून मोठा भाव दाखविला पाहिजे. नादिरशहा माघारा जात नाहीं. हिंदु राज्यावरी निघेल....रायाचें ( सवाई जयसिंग )

---

१. १३व्या व १४व्या शतकांत इनक्विझिशन या धर्म शासन संस्थेनें रोमन कॅथॉलिक पंथावर विश्वास न ठेवणाऱ्या लोकांची चौकशी करून त्यांना भयंकर शिक्षा देण्याचें सत्र चालू ठेवले होते. परधर्मी अपराध्यांना कित्येक वेळीं जिवंत जाळण्यांत येई.

मनीं राणाजीस तख्तावर बसवावें असें आहे. हिंदूराजे सवाई आदी करून स्वामीचे स्वारीची मार्ग प्रतीक्षा करतात. स्वामीचे पुष्टिबळ होताच जाट वगैरे फौज दिल्लीवरी पाठवून सवाईजी आपण दिल्लीस जाणार.' ( धोंडो गोविंदाचें बाजीरावास पत्र )

परंतु अद्याप वसई न पडल्यामुळें बाजीरावाला वेळेवर जातां आलें नाहीं. तो लिहितो. "हिंदु लोकांस संकट फार प्राप्त झालें आहे. अद्याप वसई आली नाहीं...ऐशास तमाम मराठी फौजा एक होऊन चमेलीपार व्हावें. त्यास ( नादिरास ) अलीकडे येऊं देऊं नये; असा विचार आहे." ( बाजीरावानें ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेलें पत्र. )

परंतु त्याचें खंबीर अंतःकरण या सर्व आपत्तींना पुरून उरणारेंच होतें. तो फिरून लिहितो, "आपली घरगुतीं भांडणें (रघुजीचें पारिपत्य वगैरे) बाजूला ठेविलीं पाहिजेत. आतां सर्व हिंदुस्थानास एक शत्रू उत्पन्न झाला आहे. मी तर नर्मदा उतरून सर्व मराठी सैन्य चंबळेपर्यंत पसरून देणार. मग पाहूंया नादिरशहा कसा खालीं येतो तो!" (बाजीरावाचीं पत्रें)

सवाई जयसिंगलाहि, हिंदूंच्या पुनरुत्थानाच्या आंदोलनांतील इतर मोठमोठ्या नेत्याप्रमाणेंच हिंदुत्वाचा कट्टर अभिमानी होता. बाजीरावानें माळव्यात यावें व हिंदुस्वातंत्र्याचें युद्ध तेथपर्यंत भिडवून, शिवरायापासूनच्या अनेक पिढ्यांच्या त्याच्या अनुयायांनीं जे हिंदुपदपादशाहीचें महान् ध्येय पुढें ठेवलें होतें त्याचा हिंदुस्थानभर प्रसार करण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें आणि पुढचें पाऊल टाकावें म्हणून माळव्यांतील गांजलेल्या हिंदूंना बाजीरावास माळव्यात बोलविण्यास यानेंच सांगितलें होतें. हा स्वदेशाभिमानी, आणि सुविद्य रजपूत राजश्रेष्ठ आपल्या एका पत्रात लिहितोः—" सिधिश्री......नंदलालजी प्रधान व भाईजी ठाकूर संस्थान इंदोर अमर गढसु महाराजाधिराज श्रीसवाई जयसिंगजीकृत प्रमाण बंचजो...सो आपको लिखते है कीं बादशहानें चढाई कीं है; तो कुछ चिंता नहीं. श्री परमात्मा पार लगावेगा. बाजीराव पेशवे हमने आपके निसबत कोलवचन कर लिया है," पुढें आणखी तो लिहितो:—" हजार शाबास है आप सब मालवे सरदार एक रहके हिंदुधर्मका कल्याण होना और मालवेमें हिंदुधर्मकी वृद्धि होना. इस बात विचार कर मालवेमें मुसल

मानोंको नौमेद किये. और हिंदुधर्म कायम रखा." (जयसिंगाचीं पत्रे. २६-१०-१७२१ खि.)

## हिंदुस्वातंत्र्याच्या आघाडीवरचा नेता 'नानासाहेब'

अखिल हिंद स्वातंत्र्याच्या आणि हिंदुपदशाहीच्या या महान् आंदोलनात आघाडीवर चमकलेल्या वीरांमध्यें बाजीरावाचा पुत्र नानासाहेब हा सर्वश्रेष्ठ अग्रगण्य नेता होता. त्याचा पत्रव्यवहार हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय होण्यासारखा आहे. जिथें जिथें तो आपल्याला आढळतो तिथें तिथें तो हिंदुत्वाचाच पाठपुरवा करीत असलेला आपणास दिसतो. ताराबाईला तो लिहितो, "मोंगल केवळ हिंदुराज्याचे शत्रु. त्यास देखील अनुमधानें होत असता सेवकच वाकडे वर्ततात हा दोष!" (नानासाहेबाचीं पत्रे)

पानिपतच्या भूमीवर जरी बरीच हानि झाली तरी त्यामुळें सर्वनाश काहीं झाला नव्हता. कारण, या युद्धातून दोन वीर बचले; आणि त्यानीं हिंदुत्वाचें कार्य सावरलें! नाना फडणवीस आणि महादजी; हिंदु राजसत्तेचें डोकें, तरवार आणि ढाल!! या दोघांनीं पानिपतचा भीषण पराभव होऊनहि-नव्हे तसा तो झाल्यामुळेंच-५० वर्षेपर्यंत सतत, विचाराची आणि कृतीची कठोर झुंज दिली. कारण पानिपतच्या पराभवानें तें युद्ध जिंकणाऱ्याना असा जबर तडाखा मिळाला होता कीं, त्यामुळें हिंदु हेच हिंदुस्थानचे खरे राजे ठरलें. एकंदर इतिहासालाच जी यशस्वी कलाटणी मिळाली त्याची स्पष्ट जाणीव होण्याइतका राष्ट्राच्या मनाचा विकास कसा झाला होता, आणि निःसंदिग्धपणें प्रस्थापित झालेल्या हिंदु साम्राज्याविषयीं आणि हिंदुत्वाविषयीं राष्ट्राच्या मनात कसा तीव्रतर अभिमान उत्पन्न झालेला होता, याची साक्ष, त्यावेळच्या बुद्धिमान आणि राजकारणी लोकांच्या लेखनात आपणाला स्पष्टपणें पहावयास मिळते.

## गोविंदराव काळे यांचें नाना फडणविसांना पत्र

नाना आणि महादजी यांच्यामध्यें धुमसत असलेले मतभेद पूर्णपणें नष्ट झाल्याचें कळताच महाराष्ट्राच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत प्रत्येक

मराठ्याला अत्यत आनंद झाला होता. ही वार्ता कळतांच पेशव्यांचे वकी गोविंदराव काळे यानीं निजामाच्या राजधानींत बसून नाना फडवीसा एक पत्र लिहिलें होतें तें असें:--

" पत्र पाहतांच रोमाच उभे राहिले. अति संतोष झाला. विस्तार प किती लिहूं! ग्रथचे ग्रथ मनात आले. अटक नदीचे अलीकडे दक्षि समुद्रापावेतों हिंदूंचें स्थान, तुरकस्थान नव्हे. हे आपली सीम पांडवापासून विक्रमाजित पावेतों. त्यांनीं राखून उपभोग घेतला. त्य मागें राज्यकर्ते नादान निघाले. यवनाचें प्राबल्य झाले. चकत्यानीं ( बाबरच्य वंशजानीं ) हस्तिनापूरचें राज्य घेतलें. शेवटीं आलमगीराचे कारकीर्दी यज्ञोपवीतास साडेतीन रुपये जेजया बसून ओलें अन्न विकत घ्यावें अश नौबत गुजरली. "

" त्या दिवसात कैलासवासी शिवाजी महाराज शककर्ते व ध राखते निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत धर्मरक्षण केलें. पुढें कैलासवास नानासाहेब व भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे झालें कीं, अ कधीं झाले नाहीं. हल्ली श्रीमंताचे पुण्य प्रतापेंकरून व राजेश्री पाटि बुवाच्या बुद्धि व तरवारीच्या पराक्रमेंकरून सर्व घरास आलें. परंतु झा कसें! प्राप्त झालें तेणें करून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोण असते तरी मोठे मोठे तवारिखनामे झाले असते. यवनांच्या जातींत इतक गोष्ट चागली झाल्यास गगनाबरोबर करून शोभवावी. आमचे हिंदूंत गगना इतकी झाली असतां उच्चार न करावा हे चाल आहे. अलभ्य गोष्टी घडल्या यवनाच्या मनात कीं, काफरशाही झाली असें बोलतात. "

" लेकीन ज्यांनीं ज्यानीं हिंदुस्थानात शिरें उचललीं त्याची पाटी बावांनीं फोडली. न लाभल्या त्या गोष्टी लाभल्या. त्याचा बंदोबस्त शककर्त्य प्रमाणें होऊन उपभोग घ्यावें पुढेंच आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल नकळे. झाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्य प्राप्त इत केंच नाहीं तरी वेदशास्त्र रक्षण, गोब्राह्मण प्रतिपालन, सार्वभौमत्व हात लागणें, कीर्तियश याचे नगारे वाजणें इतक्या गोष्टी आहेत. हें किमय संभाळणें. हक्क आपला व पाटील बावांचा. त्यांत वेत्यास पडला कीं, दोस दुष्मन मजबूत. संशय दूर झाला. अति चांगलें. अति चांगलें. दुष्म

उशापायथ्याशीं लागून आहेत. चैन नव्हते. आपण लिहिल्यावरून मन स्वस्थ झालें." (ख्रि. १७९३)

इतक्या सहजसुंदर शैलीनें लिहिलेलें हें एकच एक पत्र आपल्या इतिहासाचें अंतरंगदर्शन जितक्या उत्कटतेनें आणि वास्तवतेनें घडवितें तितकें ते दुसऱ्या शेकडों शुष्क इतिहास ग्रंथानीं कदापिहि घडणें अशक्य आहे. हिंद आणि हिंदुस्थान या नांवांची कशी सहज स्फुरलेली आणि अचुक अशी व्युत्पत्ति या लेखकानें दिलेली आहे! त्याच बरोबर अगदीं शेवटच्या पिढ्यापर्यंत आपल्या पूर्वजांना या नावाविषयीं किती प्रेम होते, किती भक्तिभाव होता नि त्या नावांशीं ते कसे एकरूप झाले होते याचे इतके सावेश दिग्दर्शन या पत्रात झालेलें आहे कीं, त्यासंबंधीं आतां दुसरा पुरावा उद्धृत करणेंच निरर्थक होईल.

*

## ५

## ‘हिंदु’ नांव मुसलमानांनीं द्वेषबुद्धीनें दिल्याची निराधार शंका

अशा रीतीनें, प्राचीन वैदिक कालापासून ते आपल्या शेवटल्या हिंदु साम्राज्याच्या १८१८ तील अंतापर्यंत हिंदु आणि हिंदुस्थान या नावाच्या इतिहासाच्या सर्व क्रमवार प्रकरणांचा शोध घेण्याचा आपण येथवर उपक्रम केला. आता या पुढें हिंदुत्वाची प्रमुख लक्षणें निश्चित करण्याचें जें आपलें मुख्य काम, तिकडे आपणास वळण्यास योग्य भूमिका निर्माण झालेली आहे. आपल्या या संशोधनातून पहिलीच गोष्ट निश्चित झाली ती ही कीं, हिंदु किंवा हिंदुस्थान या शब्दांचा उगम मुसलमानाच्या द्वेषबुद्धींतून झाला असावा अशी जी एक निराधार शंका आमच्या शहाण्या सुरत्या परंतु उतावळया लोकांच्या मनांत ठाण माडून बसली होती तिचें स्पष्ट खंडण झालें. या नांवांच्या इतिहासाविषयीं मागील प्रकरणातून इतके सामर्थ्यानें लिहिल्यानंतर वरील शंका इतकी दुबळेपणाची ठरते कीं, तिचा नुसता निर्देश करणें म्हणजेच तिचें खंडण केल्याप्रमाणें आहे. महंमद जन्मण्यापूर्वी किती तरी मागे, इतकेंच काय पण अरबाचे राष्ट्र म्हणून कांहीं आहे हें जगाला ज्ञात होण्यापूर्वी कितीतरी शतकापासून, हें प्राचीन राष्ट्र आम्हाला आणि आमच्या बाहेरच्या जगालाहि, सिंधु किंवा हिंदु याच पुण्य नावानें माहीत होतें. आणि दुसरें असें कीं, जितका त्या प्रत्यक्ष सिंधूचा शोध लावणें अरबांना शक्य झालें नाहीं, तितकेंच हेंहि नाव शोधून काढणें त्यांना कधींहि शक्य नव्हतें. त्यांना तें केवळ पूर्वीच्या इराणी, ज्यू आणि इतर लोकाकडूनच माहित झालेलें होतें. परंतु ऐतिहासिक पुराव्यानीं खंडन करण्याचा हा गंभीर खटाटोप जरी क्षणभर बाजूला ठेवला तरी, ही गोष्ट अगदीं उघड नाही का, कीं जर खरोखर कांहीं लोक म्हणतात त्याप्रमाणें तें नाव आपल्या शत्रूनें तिरस्कार भावनेनें आपणाला दिलें असेल तर, आपल्या जातींतल्या सर्वश्रेष्ठ नि पराक्रमी लोकांनीं तें चुकून तरी कधीं मान्य केलें असतें कां! खरोखरींच आपले पूर्वज, अरबी किंवा पर्शियन भाषा अगदींच जाणत नव्हते असें नाहीं. तसें म्हणावें तर मुसलमान आपला काफीर

म्हणूनहि उल्लेख करीतच होते. म्हणून कांहीं आपल्या लोकानीं तें नाव धारण करून तेंच आपलें वैशिष्ट्यदर्शक अभिधान म्हणून मिरविलें होतें काय? मग हिंदु किंवा हिंदुस्थान या दुसऱ्या नांवाच्या संबंधांत तेवढा मात्र त्यानीं राष्ट्रीय अपमान नीमूटपणें का गिळला? याचें साधे कारण हें आहे कीं, जुन्या राष्ट्रीय परंपराची, आपल्यांतील काहीं लोकांपेक्षा त्यांना अधिक माहिती होती, आणि आपल्या राष्ट्रीय जीवनाशीं त्याचा संबंधहि फारसा तुटलेला नव्हता. आणि याच कारणामुळें हिंदु हा शब्द संस्कृतांत नाहीं म्हणून आपल्यांतील काहींची ओरड सतत चालू असते. परतु ह्याच शब्दाचें मोठेंसें तें काय? संस्कृत वाङ्मयांत, किशन, बनारस, मराठा, शीख, गुजराथ, पाटणा, सिया, जमना इ. सारखे रोजच्या व्यवहारातलें दुसरे कितीतरी शेकडोशें शब्द तरी कुठें आलेले आहेत? म्हणून ते काय परकी भाषेतून आलेले आहेत असे समजावयाचे? बनारस शब्द संस्कृतात नसला तरी संस्कृतांतील वाराणसी शब्दाचाच तो प्राकृतमधील पर्याय असल्यामुळें तो आपलाच आहे. खरोखर संस्कृत वाङ्मयात प्राकृत शब्द सांपडतील ही अपेक्षा करणेंच हास्यास्पद आहे! याहिपेक्षां दुसरें असें कीं, हिंदु हा शब्द संस्कृतांतील एका शब्दाचेंच प्राकृत रूप आहे हें जरी खरें असलें तरी, हें प्राकृत रूप कांहीं काहीं वेळा संस्कृत वाङ्मयातहि दृष्टीस पडते ही गोष्ट तर या शब्दाचें महत्त्व सिद्ध करणारा सबल असा पुरावाच नव्हे काय? उदाहरणार्थ, मेरू तन्त्रामध्यें 'हिंदु' हा शब्द योजलेला दिसतो. महाराष्ट्रांतील आपटे आणि बंगाल्यांतील तारानाथ तर्कवाचस्पति या दोघा प्रख्यात संस्कृत कोशकारानीं या शब्दाना आपल्या कोशात स्थान दिलें आहे. आणि 'शिव शिव न हिंदुर्न यवनः' ही उक्ति तर आपल्या इतक्या परिपाठातली आहे कीं ती उद्धृत करण्याचेंच काम नाहीं!

## 'सप्तसिंधू'चेंच 'हप्तहिंदु' हें रूपांतर आहे

आतां असें असू शकेल कीं, अलीकडच्या मुसलमानी भाषेची छाप पडलेल्या फारसी भाषेमध्यें, या हिंदु शब्दाला थोडा तिरस्काराचा भाव चिकटविण्यात आला असेल. परंतु त्यावरून हिंदु शब्दाचा मूळ अर्थहि तुच्छतादर्शक व 'काळया'शीं समान अर्थी होता असें कसें सिद्ध होईल?

फारसीमध्यें हिंदी अथवा हिंद हे शब्द येतात. परंतु त्यांचा अर्थ काळा असा कुठेंच दिसून येत नाहीं. आणि त्याचबरोबर हेंहि सर्वांना माहीत आहे कीं, ते शब्द हिंदु या शब्दाबरोबर सिंधु किंवा सिंध या संस्कृत शब्दापासूनच बनलेले आहेत. जर हिंदु हा शब्द आपण 'काळे' आहोंत म्हणून आपणाला लावण्यात आलेला आहे असें गृहीत धरलें तर हिंद किंवा हिंदी यांचा अर्थ 'काळा अदमी' असा नसूनहि ते आपणाला लावण्यात आलेले आहेत काय ! खरी गोष्ट अशी आहे कीं, हिंदु शब्दाची खरी उत्पत्ति मुसलमानी संस्कार झालेल्या फारसींतून नसून, ती इराणची प्राचीन भाषा जी झेंद तींमध्यें आढळते. आणि त्यावेळीं हप्तहिंदूचा अर्थ केवळ 'सप्तसिंधु' एवढाच होता. आपण अक्षरशः काळे होतो म्हणून आपणाला हें नांव देण्यांत आलें असावें हें तर कदापीहि शक्य नाहीं. त्याचें अगदीं साधे कारण असें आहे कीं, अवेस्ताकाळचे हिंदु–म्हणजेच प्राचीन काळचे 'सप्तसिंधु'–हे त्यावेळच्या आर्याणातील लोकाइतकेंच सुंदर होते; आणि ते त्यांच्याशेजारींच तर कधीं त्याच्यामध्येंहि, एकत्र राहात होते. अगदीं अलीकडे म्हणजे ख्रिस्तकालाच्या प्रारंभीं, आपल्या सीमाप्रांतांना पार्थियन लोक श्वेतभारत असें संबोधित होते. आणि म्हणून मूळांत हिंदु या शब्दाचा अक्षरशः काळा असा अर्थ कधींच नसला पाहिजे, हेंच स्पष्ट होते.

## म्हणून काय 'हिंदु' हें नांव आम्हीं टाकावयाचें ?

खरोखर, मुसलमान किंवा मुसलमानी संस्कार झालेले पारशी यांनाहि पत्ता नव्हता तेव्हांपासून हिंदु किंवा हिंदुस्थान हीं नांवें, आपली भूमी आणि आपलें राष्ट्र यांचाच साभिमान आणि गौरवपूर्वक उल्लेख करण्यासाठीं वापरण्यात येत होतीं हें मागील विवेचनांत पुरेपूर सिद्ध करून दाखविलेंच आहे. तेव्हां हिंदु या नावाच्या माहात्म्याचा किंवा त्याविषयीं वाटणाऱ्या आपल्या भक्तिभावाचा विचार करतां इकडच्या तिकडच्या चार दोन माथेफिरूंनीं त्या नावाशीं जे कांहीं बरेंवाईट अर्थ चिकटविले असतील, त्याना काहीं विशेष किंमत देऊन त्याचा विचार करण्याची आपणाला मुळांतच आवश्यकता नाहीं. एकदा अशी वेळ होती कीं, प्रत्यक्ष इंग्लंड-मध्येंच, इंग्लंड हा शब्द इंग्लड जिंकणाऱ्या नार्मन लोकांना इतका तुच्छता

दर्शक वाटूं लागला होता कीं, एकमेकाचा उद्धार (!) करतांना तोच शब्द उपयोगांत आणला जाई. " मी काय इंग्लिश होऊं " एवढें म्हणणें म्हणजे स्वतःची भयंकर विटंबना करून घेण्यासारखे समजले जाई ! तर एखाद्या नॉर्मन माणसाला ' इंग्लिशमन ' म्हणून संबोधणें, हा अतिशय अक्षम्य गुन्हा ठरे. परंतु, त्यामुळें आपल्या भूमीचें नि राष्ट्राचें नाव बदलून इंग्लंडच्या ठिकाणीं त्यास नॉर्मंडी म्हणून म्हणावें असा विचार इंग्लिशाच्या डोक्यांत चुकून तरी कधीं आला होता काय ? किंवा आपलें ' इंग्लिश ' हें नांव टाकून दिल्यानें त्याना तत्काळ मोठेपणा प्राप्त झाला असता काय ? कधींच नाहीं ! उलट ठामपणें त्यांनीं आपलें नांव आणि आपला प्राचीन वंश याचा त्याग केला नाहीं म्हणूनच, आज ज्यावेळीं नॉर्मन हा शब्द अस्थवशेष होऊन बसला आहे आणि नॉर्मंडीलाहि जगाच्या आलेखामध्यें कुठें स्थान राहिलेलें नाहीं त्यावेळीं, तेच ते तिरस्करणीय इंग्लिश आणि त्याची ती इंग्लिश भाषा, जगानें आजपर्यंत न पाहिलेल्या अशा सर्वात प्रचंड साम्राज्याची स्वामिनी होऊन राहिली आहे. मात्र इंग्रजी साम्राज्याचें वैभव जरी इतकें थक्क करून सोडणारें असलें तरी एकंदरीनें विचार करता, हिंदु जगताच्या अपरंपार वैभवाशीं तुलना करण्यासारखे इंग्लंड जवळ तरी खरोखर काय आहे ! !

## ' हिंदु ' हें नांव जगाला बहुमानाचें द्योतकच वाटें

जेव्हां परस्परात कांहीं वितुष्ट येतें तेव्हां एकमेक राष्ट्रें बहुधा बेताल बनत असतात व त्यांच्या मनाचा तोल सुटतो. पारशी आणि इतर कोणी लोक हिंदु या शब्दाचा अर्थ ' चोर ' किंवा ' काळा अदमी ' एवढाच जर एकेकाळीं समजत असतील, तर त्यांच्या हेहि चांगलेंच स्मरणात असूं द्या कीं, ' मुसलमान ' हा शब्दहि कांहीं मनुष्यजातींतील फार मोठ्या हेवा वाटण्यासारख्या माणसाकरिता म्हणून हिंदु वापरीत नव्हते ! एखाद्या माणसाला मुसलमान किंवा त्याच्याहिपेक्षा अधिक म्हणजे ' मुसडा ' म्हणणें हें तर त्याला ' पशू ' संबोधण्याच्याहि पलीकडचेच समजण्यांत येई. ज्यावेळीं परस्परांमध्यें प्राणांतिक झगडे चालू असतात तेव्हां, आणि ज्यावेळीं खवळलेल्या पाशवी क्रोधभावनांच्या ज्वाला भडकलेल्या असतात तेव्हां, अशा

प्रकारची मर्मभेदी आणि कडवट शिविगाळ व उणीदुर्णी जरी अपरिहार्य आणि योग्य ठरत असली, तरी परस्पर लोक जेव्हां या वैराच्या झटक्यांतून शुद्धीवर येतात आणि स्वतःला सद्गृहस्थ म्हणवू लागतात तेव्हां तरी तसली शिविगाळ व उणींदुर्णी त्यांनीं विसरून जावयास पाहिजेत. आतां वरील संबंधांत आपणाला हेंहि विसरून चालणार नाहीं कीं, प्राचीन ज्यू लोक हिंदु हा शब्द सामर्थ्य आणि उत्साह या अर्थी वापरीत असत. कारण या गुणाचें साहचर्य आपल्या भूमीशीं आणि राष्ट्राशीं मानण्यात येत असे. 'सो हाअ मो अल्क' या अरबी महाकाव्यांत असें म्हटलें आहे कीं, आपल्याच रक्ताच्या लोकानीं केलेले जुलम अत्याचार, हे हिंदु खड्गापेक्षां अधिक छळणुकीचे आणि प्राणांतिक असतात. तर 'हिंदूच्या शब्दात उत्तर देणें' ही जी म्हण इराणी लोकात रूढ होऊन बसली आहे, तिचा अर्थ "हिंदु-खड्गानें जोराचा आणि खोल घाव करणें" हाच त्यांना अभिप्रेत होता. प्राचीन बाबिलोनियन लोक अत्युत्तम प्रकारच्या कापडाच्या जातीला 'सिंधु' म्हणत. कारण, बहुश: ते 'सप्तसिंधु' मधूनच येत असे. आणि या गोष्टी वरून आपणास असें दिसतें कीं, आपल्या देशाला ते जुन्या 'सिंधु' याच नावानें ओळखीत होते. प्राचीन बाबिलोनियन भाषेमध्येंहि या शब्दाच्या राष्ट्रीयवाचक अर्थावाचून, दुसरा कोणता अर्थ त्या शब्दाला होता असें आमच्या तरी अद्याप ऐकिवात नाहीं.

## चिनी लोकांना 'हिंदु' हे 'इंदू' प्रमाणेंच आवडत

आपल्या शेजारच्या अत्यंत प्राचीन आणि सुसंस्कृत अशा चीन राष्ट्रांतला सुप्रसिद्ध प्रवासी ह्यूएनत्संग यानें या हिंदु नावाचा जो मजेदार अर्थ लावला होता तें पाहून कोणत्याहि हिंदूला स्वतःविषयीं धन्यता वाटल्यावांचून राहणार नाहीं. त्याच्या मतानें संस्कृतांतील 'इंदु' हा शब्द आपलें राष्ट्रीय नाव 'हिंदु' याच्याशींच पूर्णतया एक आहे. आणि या मताच्या पुष्ट्यर्थ तो पुढें म्हणतो कीं, जगानें या राष्ट्राला अगदीं यथार्थत्वानें 'हिंदु' हें नांव दिलें. कारण, हिंदु आणि त्याची संस्कृति ही मानवाच्या निराश आणि निरुत्साह आत्म्याला शीतल चंद्रिकेप्रमाणें सदैव आनंद आणि उत्साह याचा झराच होऊन राहिलेली आहे! याच्यावरून हेंच सुस्पष्ट

होत नाहीं का कीं, लोकांच्या मनांत आपल्या नांवाविषयीं आदर उत्पन्न करण्याचा मार्ग म्हणजे तें नांव बदलणें किंवा टाकून देणें हा नसून, आपल्या पराक्रमी शस्त्रबलानें, आपल्या ध्येयाच्या शुद्ध सात्विकतेनें आणि आपल्या अध्यात्मिक उंचीनें त्याना तें तसें मान्य करावयाला लावणें हा आहे. जरी आपल्यांतील कांहीं बांधवाना मनच्या हौसेच्या तट्टावर बसून दौडण्याची आणि जनगणनेमध्यें 'हिंदू'च्या ठिकाणीं 'आर्यन' म्हणून स्वतःची नोंद करण्याची आपण मोकळीक दिली, तरी जोंपर्यंत आपल्या राष्ट्राला पूर्वीचें वैभव आणि बल प्राप्त झालें नाहीं तोपर्यंत तसं करणें म्हणजे 'आर्य' या नावाला खाली आपल्या पातळीवर ओढणें, आणि 'गुलाम,' 'मजूर' या शब्दांच्या जोडीला कोशामध्यें आणखी एका नव्या शब्दाची भर घालणें, एवढाच त्याचा अर्थ होईल!

## नांव बदलण्याचा 'मूर्ख' खटाटोप

परंतु हिंदु आणि हिंदुस्थान हीं नावेंच टाकून देण्याच्या अनाठायीं सूचनेला काहीं गंभीर विधानानीं उत्तर देण्याची खटपट सध्या न करता, आणि हिंदु त्या नावाचा मूळ उगम परक्याच्या द्वेषबुद्धींतून झाला आहे ही दुधखुळी उपपत्ति क्षणभर मान्य करून आम्ही एवढेंच विचारतों कीं, तीं नावें फेंकून देऊन त्याच्याठिकाणीं दुसरें एखादें नवीन नाव प्रचलित करणें आपणाला शक्य आहे काय? सध्याची तरी परिस्थिती अशी आहे कीं, हिंदु हें नाव आपल्या जातीचें ध्वजचिन्हच होऊन राहिले आहे! आणि काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत व अटकपासून कटकपर्यंत आपल्या जातीचें ऐक्य प्रस्थापून तें चिरंतन टिकविण्याच्या दृष्टीनेंहि हें नांव म्हणजे एक महान् वैशिष्ट्यच झालेलें आहे. एखादी टोपी बदलावी त्याप्रमाणें इतक्या सहजासहजीं तें तुम्हाला बदलता येईलसें वाटतें कां? एकदां असें झालें कीं, एका चांगल्या सुबुद्ध आणि स्वदेशप्रेमी गृहस्थानें जनगणनेमध्यें आपली 'हिंदु' अशी नोंद न करता, 'आर्यन' म्हणून हेतुत: नोंद केली. कारण, इराणी मुसलमान आपणाला द्वेषबुद्धीनें 'हिंदु' असें संबोधीत असत व त्याचा अर्थ 'चोर' किंवा 'काळा मनुष्य' असाच समजला जात असतो, या सर्वत्र प्रचलित झालेल्या असत्य कल्पनेला तो बळी पडलेला होता.

वेळेच्या अभावीं मी जरी त्या नावाच्या उत्पत्तीविषयीं त्याच्याशीं संपूर्ण चर्चा करीत बसलों नाहीं तरी त्याचें नाव काय एवढाच साधा प्रश्न मी त्याला टाकला. तेव्हां तो म्हणाला "तक्तसिंग!" मी उत्तरलों, "भल्या गृहस्था, हिंदु या शब्दाच्या उत्पत्तीविषयीं कितीहि वादविवाद असला तरीं तुझें नांव मात्र निर्विवादरीत्या वाडगें आणि वेडगुजरी आहे. आणि तसे तें आहे म्हणूनच तें बदलून त्या ठिकाणीं, दुसरें कोणतें तरी मौद्गलायन किंवा सिंहासनसिंह यासारखे पूर्वीचें आणि निर्मळ आर्यन नाव नोंदणें प्रथम अवश्य आहे! कांही वेळपर्यंत मूळ सूत्र टाळून, तसें करणें हें किती अवघड आहे आणि त्यामुळें आपल्या आर्थिक स्थितीवर त्याचा किती वाईट परिणाम होईल, इत्यादि नसत्या गोष्टीच सागण्यास त्यानें प्रारंभ केला. पुढें तो असें म्हणाला कीं, "या नवीन नांवाला लोक मान्यताच तरी देतील म्हणून कशावरून? आणि दुसरे लोक आपल्याला 'तक्तसिंग' म्हणत असताना आपण मात्र स्वत:ला 'सिंहासन सिंह' म्हणून घेण्याचा नवीन घातकी उपक्रम करण्यानें विशेष तें काय मिळणार आहे!" मी लगेच म्हणालों "सद्गृहस्था, निर्विवादरीत्या जें परकीय आहे तें तुझें, केवळ एका व्यक्तीचें नाव बदलणें, म्हणजे तुला इतकें अवघड आणि हानिकारक वाटत आहे, तर मग जें कुणाहि परक्यानें न शोधून काढलेलें, आणि वेद जितके आपले आहेत तितकेच संपूर्णपणें आपलें असलेलें असें जें आपल्या संबंध जातीचें नाव तें बदलणें ही किती अवघड गोष्ट असली पाहिजे! किती व्यर्थ खटाटोप तो असला पाहिजे!" प्राचीन काळापासून बद्धमूल झालेलें नाव बदलण्याचा खटाटोप व्यर्थ कसा असतो याचें, वरील व्यक्तिगत उदाहरणापेक्षां अधिक खात्री पटविणारें दुसरें उदाहरण म्हणजे आपल्या पंजाबांतील शीख बधूंचें आहे. "धर्म चलावन संत उबारण, दुष्ट दैत्यके मूल उपाटण यहि काज धरा मै जनमम्। समझ लेहु साधुसम मननम् (परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृता। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।) हें तातडीचें आणि सुस्पष्ट ध्येय डोळ्यापुढें ठेवून, "नीलवस्त्रके कपडे फाडे, तुरक पाणी अंमल गया' अशी विजयी घोषणा गर्जून त्या आपल्या महान् गुरूंनीं हिंदूंतील सर्वश्रेष्ठ आणि सर्वोत्तम अशा वीरवरांची जी एक स्वतंत्र जाति, जो एक स्वतंत्र पंथ निर्मिला त्याचेच 'खालसा' असें नाव होतें! "क्षत्रियांहि धर्म छोडिया म्लेच्छ

भाषा गही। सृष्टि सब इकवर्ण हुई धर्मकी गति रही!'' असें म्हणून जो परम साधु नानक शोक विव्हल झाला होता त्यालाच आज "वाह गुरु-जीकी फते। वाह गुरुजीकी खालसा'' या जयघोषांनीं वंदन केलें जातें. दरबार, दिवाण, बहादुर हे शब्द तर आमच्या हरिमंदिरांच्या गाभाऱ्या-पर्यंत चोराप्रमाणें आत शिरले आहेत. आपल्या पूर्वींच्या घावांचे हे अद्याप राहिलेले वण आहेत. आपले घाव भरून निघाले, परंतु वण मात्र तसेच राहून आपल्या शरिराचाच ते भाग होऊन राहिले आहेत. जोंपर्यंत त्यांना खरवडून काढण्यानें कांहीं उपयोग होण्याच्या ठायीं हानीच होणारी आहे तोंपर्यंत, ते तसेच सोसणें एवढेंच जास्तींत जास्त काय तें आपण करूं शकू. कारण काहीं झालें तरी, ते वण आपण ज्या लढाया, रक्ताचें रण लढून जिंकल्या आणि ज्यामध्ये आपण विजयीच ठरलों, त्या लढायात झालेल्या घावाचे आहेत!

## 'हिंदु' आणि 'हिंदुस्थान' या नांवाची परंपरा

आणि, जर कोणते शब्द,–मग ते कितीहि पवित्र वस्तूंशीं निगडित झालेले असोत,–बदलणें आणि टाकून देणें अवश्य असतील तर ते (तक्त-सिंग इ.) हेच शब्द होत; कारण निर्विवादपणें ते परकी आहेत आणि परकीयाच्या सत्तेचे ते राहिलेले अवशेष आहेत. जगताच्या सर्वांत प्राचीन आणि आदरणीय वाङ्मयांत–म्हणजे वेदांत,–ग्रथित केलेली जीं आपल्या जातीचीं आणि राष्ट्राचीं मूळ पाळण्यातली जीं हिंदु आणि हिंदुस्थान हीं नावें, त्या नावांविषयींच ओरड करून, तींच टाकून देण्यास–ज्यानीं तींच नावें आतापर्यंत नुसती धारण केली इतकेंच नव्हे तर त्याच्याविषयीं प्रेमहि दाखविलें, त्यानींच–प्रवृत्त व्हावें, हें खरोखर अप्रामाणिकपणाचेंच नाहीं का? हींच नावे, सिंधुच्या दोन्ही तीरावर राहाणाऱ्या आपल्या देश-बाधवांनीं उणीं पुरीं चाळीस शतकें मोठ्या अभिमानानें धारण केलेली होतीं. काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत आणि अटकपासून कटकपर्यंतचा प्रदेश ह्याच नावानीं दाखविला जाई. सिंधूंच्या अथवा हिंदूंच्या या आपल्या जातीची आणि भूमीची भौगोलिक मर्यादा ह्याच नावामध्यें सांठविलेली होती, आणि 'राष्ट्रमार्यस्य चोत्तमम्' अशा रीतीनें आपणाला

सर्वांपेक्षां निराळ्या तऱ्हेनें स्वतंत्र अस्तित्व अर्पिणारीं हींच तीं नांवें होतीं. ह्याच नावाकरितां आपल्या शत्रूंनीं आपला द्वेष केला, आणि ह्याच नावांकरिता शालिवाहना[1]पासून ते शिवाजीपर्यंतचे आमचे वीर हजारोंनीं रणांत घुसले आणि शतकोनुशतकें तीं रणें त्यानीं लढत ठेवलीं. हींच नांवें त्या पद्मिनीच्या आणि चितोडच्या चिताभस्मावर उमटलेलीं होतीं. तुलसीदास, तुकाराम, रामदास आणि रामकृष्ण[2] यानीं ह्याच 'हिंदु' शब्दाचा अभिमान बाळगला. हिंदुपद-पादशाही हें श्रीरामदासाचें स्वप्न होतें; शिवरायाचें तें आयुष्यकार्यच झालें. बाजीराव आणि बंदाबहादुर, छत्रसाल आणि नानासाहेब, प्रताप आणि प्रतापादित्य[3] या सर्वांच्या ध्येयाकाक्षांचा तो ध्रुवताराच होता! ज्या ध्वजावर हीं अक्षरें कोरलीं होतीं त्या ध्वजाच्या मानरक्षणासाठीं, हातीं खड्ग घेतलेल्या भाऊसाहेबांच्या नेतृत्वाखालीं शत्रूला प्राणघातक प्रहार करीत सहस्रावधि हिंदु झुजले, आणि पानिपतच्या त्या रणांगणावर पडलेहि! आणि इतका हौतात्म्यपूर्ण संहार होऊनहि–किंवा तो तसा झाल्यामुळेंच–'हिंदुपदपादशाही' करिता नाना आणि महादजी यानीं आपल्या राष्ट्राचें तारू सर्व खडकांना आणि उथळ प्रवाहांना चुकवून अपेक्षित किनाऱ्यापर्यंत निर्धोकपणे हाकारीत आणलें. आजसुद्धा नेपाळच्या सिंहासनावरील सम्राटापासून ते कटोरा घेऊन भीक मागत हिंडणाऱ्या रस्त्यांतील भिकाऱ्यापर्यंत लक्षावधि लोक याच हिंदु किंवा हिंदुस्थान या नावाला आपला भक्तिभाव आणि प्रेमपूर्वक निष्ठा अर्पण करीत आले आहेत. आणि हींच नावें टाकून देणें म्हणजे आपल्या राष्ट्राचें हृदयच चरचरा चिरण्यासारखें आहे! परंतु तसें करण्यापूर्वीच तुम्ही मृत झालेले असाल हें मात्र निश्चित! तें करणे हें नुसतें तुम्हाला

---

१. आंध्रांची साम्राज्यसत्ता दक्षिणेंत प्रस्थापित करणारा प्रसिद्ध शककर्ता शालिवाहन. खि. १३० ते १५८पर्यंत यानें राज्य केले. 'रक्षणीं ध्वजाच्या ह्याचा। शालिवाहनानें साची। उडविली शकाची शकलें। समरिं त्या क्षणा॥' या सावरकरानीं रचलेल्या ध्वजगीतांतील ओळींत याच शालिवाहनाचा गौरव केलेला आहे.

२. स्वामी रामकृष्ण परमहंस.

३. कर्कोट नांवाच्या राजवंशांतील काश्मीरचा एक प्रसिद्ध हिंदु राजा.

मारकच नव्हे तर व्यर्थ ठरणार आहे. हिंदु व हिंदुस्थान ह्या शब्दाचें त्याच्या सध्यांच्या स्थानापासून उच्चाटण करणे म्हणजे हिमालयालाच त्याच्या स्थानावरून हलविण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे! प्रचंड घडामोडी आणि भयंकर उलथापालथ घडविणारा एखादा धरणीकंपच हें करण्याला समर्थ आहे!!

## ' हिंदुइझम ' या शब्दानें उडवून दिलेला घोंटाळा

हिंदु आणि हिंदुस्थान हीं नावें आपणाला परकीयानीं दिलेली आहेत अशी समज करून घेऊन जे आक्षेप त्या नावावर घेतले जातात त्याचें खंडण, काहीं अप्रिय असे ऐतिहासिक पुरावे देऊन सहजासहजीं करता येण्यासारखें आहे. परतु गोष्ट अशी आहे की, काहीं काहीं वेळेला या आक्षेपामागें एक भीति लपून बसलेली असते. आणि ती भीति म्हणजे हीं कीं, जर हें नांव आपण मान्य केलें, आणि त्याचा यथोचित गौरव केला, तर हिंदुधर्म या नांवामध्यें समाविष्ट होणारे सर्व आचार आणि विचार याच्यावर विश्वास ठेवणारेच आपण आहोंत असे सारेजण आपणाला समजतील! ' हिंदु ' म्हटला कीं तो तसा असल्यामुळें तथाकथित हिंदु धर्मावर विश्वास ठेवणाराच असला पाहिजे अशा प्रकारच्या वाटणाऱ्या भीतीमुळेंच ( जरी ती स्पष्ट शब्दात अनेकदा पुढें माडली जात नाहीं ) हीं नावें आपणाला परकयानीं दिलेलीं नाहींत, ही गोष्ट मान्य करण्यास अनेक लोक सिद्ध नसतात. आणि ही भीति खोटीहि आहे असेंहि नाहीं. परंतु, ज्याना हिंदु म्हणून घ्यावयाचें नसेल त्यानीं आपली ही भीति आपल्या विरोधाचें कारण म्हणून स्पष्टपणें बोलून दाखवावी. भ्रामक आणि न टिकणाऱ्या आक्षेपांत ती दडवून ठेवण्याचा प्रयत्न करू नये; तें अधिक प्राजलपणाचें होईल. हिंदुत्व आणि हिंदुधर्म या दोन शब्दात जें सकृद्दर्शनीं साम्य आहे त्यामुळें कित्येकदा आपल्या चांगल्या चागल्या आणि सुबुद्ध हिंदुबांधवातहि परकेपणाची फुटीर भावना निर्माण झाली आहे. या दोन शब्दातील मूलभूत भेद आम्ही लवकरच स्पष्ट करून सागणार आहोंत. या ठिकाणीं इतकेंच सांगितलें म्हणजे पुरें कीं, परकीय लोकाकडून आलेला जर कोणता शब्द असेल तर तो ' हिंदुइझम ' ( हिंदुधर्म या अर्थी ) हा शब्द आहे. परंतु या नव्यानेंच प्रचा-

रांत आलेल्या शब्दानें आपल्या विचाराचा घोंटाळा करून घेण्याचें आपणाला कारण नाहीं. स्वतंत्र धर्म ग्रंथ म्हणून वेदावरहि विश्वास न ठेवणारा माणूसहि अगदीं पूर्णपणें हिंदु असू शकतो ही गोष्ट आपल्याला हजारों जैन बांधवांच्या उदाहरणावरून सिद्ध करून देतां येईल. हे जैन बांधव, –इतरांची तर गोष्टच राहो–पिढ्या न् पिढ्या आपणाला हिंदु म्हणवून घेत आले आहेत, आणि त्याना दुसऱ्या कोणत्याहि नावानें संबोधलें तर त्यांच्या भावना दुखावतात असा अनुभव आहे. ही गोष्ट आम्ही केवळ एक वस्तुस्थिती म्हणूनच या ठिकाणीं सांगितली. या संबंधींची सविस्तर चिकित्सा आणि समर्थन आम्ही यापुढें करणारच आहोंत. तोंपर्यंत वाचकांनीं कृपा करून आमच्या प्रतिपादनाचा शेवट त्यांतील सहजसिद्ध गुणांच्या दृष्टीनें कसा होतो या विषयीं पूर्वग्रहदूषित भीतीला आपल्या मनात थारा देऊं नये; व त्याच बरोबर हेंहि लक्षात ठेवावें कीं, आतांपर्यंत मागें जें विवेचन झालेलें आहे त्यामध्यें आम्ही कोणत्याहि एका इझमचा (धर्ममताचा) विचार केलेला नाहीं. केवळ हिंदुत्व आणि त्याची राष्ट्रीय, जातीय आणि सांकृतिक उपांगें एवढाच विषय आम्ही त्यांत कटाक्षानें हाताळलेला आहे.

## हिंदुस्थान म्हणजे हिंदूंचें स्थान

अशा रीतीनें अद्यापर्यंत कोणत्याही मानवी भाषेला ज्ञात न झालेल्या, एका अत्यंत व्यापक आणि कमालीच्या कूट नि संमिश्र विचार–परंपरेच्या अंगोपांगाची सविस्तर चिकित्सा करण्याच्या अवस्थेपर्यंत आपण आतां येऊन पोंचलों आहों. हिंदुत्व हा शब्द 'हिंदु' शब्दापासूनच झाला आहे. आपण हें यापूर्वीच पाहिलें आहे कीं, आपल्या सर्वांत पवित्र आणि सर्वांत प्राचीन अशा वाङ्मयांत सप्तसिंधु किंवा हप्तहिंदु हें नाव, ज्या भूमींत आपलें वैदिक राष्ट्र भरभराटलें त्या भूमीलाच लावण्यांत आलेलें आहे. मुळांतली ही भौगोलिक कल्पना कधीं आंकुंचन पावत तर कधीं विस्तार घेत, पण अगदीं सतत, हिंदु आणि हिंदुस्थान या शब्दाशींच निगडित झालेली आहे; व आता उण्यापुऱ्या ५००० वर्षांनंतर हिंदुस्थान याचा अर्थ सिंधूपासून समुद्रापर्यंतचा हा सर्व भूखंड असा होऊन बसला. कोणत्याहि एखाद्या लोक-

समाजात परस्पर जिव्हाळा, सामर्थ्य आणि ऐक्य निर्माण करण्यास जर कोणत्या दोन महत्त्वाच्या गोष्टी कारणीभूत होत असतील तर एक म्हणजे त्या लोकाना आतून सलग आणि बाहेरून स्पष्ट सीमारेखांनीं आपलें वेगळें अस्तित्व प्रस्थापित करणारी अशी स्वतंत्र 'निवसनभूमि', आणि दुसरी म्हणजे ज्याच्या नुसत्या उच्चारासरशीं आपल्या प्रियतम मातृभूमीची मूर्ति नि आपल्या ऐतिहासिक कालातील प्रियस्मृति आपल्या मनात उसळून येतात असें 'नांव'. मोठ्या भाग्याची गोष्ट ही कीं, राष्ट्र अखंड आणि शक्तिसंपन्न होण्यास ज्या दोन गोष्टींची अत्यंत आवश्यकता असते त्या आपल्याला आपोआपच लाभल्या आहेत. आपला हा देश इतका विस्तृत असूनहि इतका एकत्र साधलेला, आणि दुसऱ्यापासून सुस्पष्ट सीमांनीं वेगळा असूनहि इतका सुसंरक्षित असा आहे कीं, निसर्गाच्या दिव्य अंगुलींनीं पृथ्वीच्या पाठीवरील दुसरा कोणताहि देश इतक्या रेखीवपणें वेगळा आखून दिलेला नाहीं, कीं ज्याच्या स्वतंत्र भौगोलिक अस्तित्वाच्या दृष्टीनें शंकाकुशंकाना एवढीहि जागा न राहावी. हिंदु अथवा हिंदुस्थान हें जें नाव त्याला प्राप्त झालें आहे त्या नांवासंबंधीं हीच गोष्ट आहे. या नावाच्या उच्चारासरशीं पहिल्याप्रथम जर कोणती मूर्ति आपल्या मनःश्चक्षूपुढें उभी राहात असेल तर निर्विवादपणें ती आपल्या प्रिय मातृभूमीचीच उभी राहाते! व नंतर जेव्हा तिच्या भौगोलिक आणि भौतिक स्वरूपाचा विचार आपल्या मनात येतो तेव्हां तिचें स्वतंत्र असें सजीव अस्तित्वच आपणाला प्रतीत होतें. हिंदुस्थान म्हणजे हिंदूंचें स्थान. म्हणून हिंदुत्वाचें पहिलें आवश्यक लक्षण हें भौगोलिकच आहे. हिंदु हा प्रथम, स्वतः किंवा आपल्या पितृपरंपरेनें हिंदुस्थानचा नागरिक असतो, आणि ह्या भूमीला तो आपली मातृभूमि म्हणून मानीत असतो. अमेरिकेंत किंवा फ्रान्स-मध्येंहि हिंदु या शब्दाचा अर्थ अगदीं असाच, म्हणजे कोणत्याहि अमूकच धर्माचा किंवा संस्कृतीचा नसलेला सर्वसाधारण 'हिंदी', एवढाच समजला जातो. आणि हिंदु या शब्दानें 'सिंधू' पासून उपन्न झालेल्या सर्व शब्दांप्रमाणें त्याचा एवढाच मूळ अर्थ दाखविला गेला असता तर 'हिंदी' या शब्दाप्रमाणें त्याचाहि अर्थ केवळ 'हिंदुस्थान'चा नागरिक इतकाच झाला असता.

## हिंदुत्वाचें पहिलें आवश्यक लक्षण

परंतु आतांपर्यंतच्या सर्व विवेचनात आपण ‘ काय झालें असतें ’ किंवा ‘ काय असावें ’ याचा विचार न करता ‘ काय आहे ’ त्यावरच प्रामुख्यानें आपली दृष्टी खिळवलेली आहे हें लक्षात येईल. याचा अर्थ असा नव्हे कीं, काय असावें याची चर्चा अगदींच अनावश्यक आहे. नाहीं; ती तितकीच आवश्यक आहे. इतकेंच नव्हे तर त्याचबरोबर ती स्फूर्तिप्रदहि असते. परंतु हें सर्व अधिक चांगल्या रीतीनें साधण्यासाठीं प्रथम ‘ आहे काय ’ याचाच विचार निश्चितपणें करणें क्रमप्राप्त ठरतें. म्हणून हिंदुत्वाची प्रमुख आणि आवश्यक लक्षणें ठरवितांना सांप्रतच्या त्या शब्दातून प्रत्यक्ष-पणें प्रतीत होणाऱ्या गोष्टींचाच एकमेव विचार डोळयापुढें ठेवण्याची दक्षता आपण घेतली पाहिजे. म्हणून, हिंदु या शब्दाचा मूळ अर्थ त्याच्याच अर्थाचा दुसरा शब्द जो, ‘हिंदी’ त्याप्रमाणें केवळ ‘हिंदुस्थानांत राहणारा’ एवढाच जर केला गेला, आणि तेवढ्यावरून हिंदुस्थानात राहणाऱ्या एखाद्या मुसलमानालाहि जर आपण हिंदु म्हणूं लागलों तर शब्दांच्या चालचलाऊ व्यावहारिक अर्थाची आपण इतकी ओढाताण केल्यासारखी होईल कीं, आम्हाला त्याच्या अर्थाचा अनर्थ केला जाइल अशी राहून राहून भीति वाटते. कदाचित् पुढें मागें हिंदु म्हणजे हिंदुस्थानचा केवळ एकमेव नागरिक आणि अन्य कोणीहि नाहीं, अशा प्रकारची गोष्ट घडून येणारच नाहीं असें नाहीं. परतु तो दिवस तेव्हाच उगवेल कीं जेव्हां आक्रमक आणि स्वार्थी अशा प्रभुत्ववृत्तीचे हात बळकट करणारे जातीय आणि सांस्कृतिक दुरभिमान गळून जातील, आणि सारे धर्म हे जेव्हा आपला संकुचितपणा सोडून देऊन विश्वाच्या बुडाशीं असलेल्या सनातन तत्त्वाच्या विचाराचें सर्वांचें असें एक जागतिक पीठ निर्माण करतील ! आणि हें सारे मानव कुटुंब एकाच शासनाखाली वैभवानें नांदावयास पाहिजे असेल तर असल्याच प्रकारच्या भेदाभेदशून्य भक्कम पायाची आवश्यकता आहे. परंतु इतक्या सोत्कण्ठ आतुरतेनें अपेक्षिलेल्या त्या परमोच्च विकासाचा एकहि किरण अद्याप जोपर्यंत, क्षितिजावरसुद्धां दिसत नाहीं तोंपर्यंत कठोर सत्य परिस्थितीकडे डोळेझाक करणें मूर्खपणाचे ठरेल. ज्यांची मूळ प्रवृत्तीच

भीषण अशा युद्धघोषात रूपांतरित होण्याची आहे, तीं आपापलीं आग्रही-मतें जोंपर्यंत दुसऱ्या धर्मांनीं सोडून दिलेलीं नाहींत तोंपर्यंत, सांस्कृतिक आणि जातीय दृष्टीनें एक असलेल्या घटकांनीं, ज्यातून अपार शक्ति आणि सांघिक ऐक्य याचा लाभ होतो, असें समान नावाचे आणि समान ध्वजाचें बंध ढिलावून चालणार नाहिं. एखादा अमेरिकन हिंदुस्थानचा नागरिक होईलहि; आणि जर तो असा खरोखर नागरिक होइल तर त्याला भारतीय किंवा हिंदी म्हणूनच वागविले जाण्यास काहींच अडचण उरणार नाहीं. परंतु आपल्या देशाबरोबर आपल्या संस्कृतीचा नि ऐतिहासिक परंपरेचा जोंपर्यंत त्यानें स्वीकार केलेला नाहीं, जोंपर्यंत रक्त संबंधानें तो आपल्याशीं एकजीव झाला नाहीं, आणि जोंपर्यंत आपली ही भूमि त्याच्या केवळ प्रेमाचाच नव्हे तर नितान्त भक्तीचा विषय झाली नाहीं, तोंपर्यंत हिंदु-जातींत त्याला हिंदु म्हणून स्थान मिळणें शक्य नाहीं. कारण स्वतः, किंवा आपल्या पितृपरंपरेनें, जो हिंदुस्थानचा नागरिक असतो तो हिंदु, हें जरि हिंदुत्वाचें पहिलें आणि आवश्यक लक्षण आहे तरी तें काहीं तेवढेंच एकमेव लक्षण होऊं शकत नाहीं. कारण त्यात अभिप्रेत असणाऱ्या भौगोलिक अर्थापेक्षा हिंदु या शब्दात फार मोठा अर्थ सामावलेला आहे.

## आम्हीं सारे रक्तानें एकच आहोंत

'हिंदु' हा शब्द 'भारतीय' आणि 'हिंदी' या दोन शब्दांशीं समानार्थक कसा नाहीं, व केवळ हिंदुस्थानचा नागरिक एवढाच अर्थ त्याचा कसा होऊं शकत नाहीं, याची कारणमीमांसा केल्यावर साहजिकच आपण 'हिंदु' या शब्दाच्या दुसऱ्या आवश्यक लक्षणाचा विचार करण्याच्या अवस्थेप्रत येऊन पोंचतों. हिंदुस्थानचे हिंदु हे काहीं केवळ नुसतें नागरिकच नाहींत. कारण, मातृभूमीविषयीं वाटणाऱ्या प्रेमाच्या बंधनानींच नुसत्या नव्हे तर रक्तसंबंधानींहि ते परस्पर एकरूप झालेले आहेत. ते नुसते राष्ट्र नव्हेत, तर जाति आहेत. 'जा' या धातूपासून निर्माण झालेल्या जाति या शब्दाचा साधित अर्थ एकाच ठिकाणीं जन्मलेले, एकाच रक्ताचे नि एकाच बंधुभावानें जोडलेले लोक असाच होतो. आपले वैदिक पूर्वज जे

सिंधु. त्यांची परंपरा घेऊन जी पराक्रमी जाति अस्तित्वांत आली होती, तिचेंच रक्त आपल्या नसानसांतून खेळत असल्याचें प्रत्येक हिंदु मोठ्या अभिमानपूर्वक सांगतो. काहीं स्वार्थी हेतु मनात ठेवून अनेकदा जे वायफळ प्रश्न आक्षेपकांकडून विचारण्यांत येतात कीं, "खरोखर तुम्ही एकजाति आहां काय ?" किंवा "तुम्ही सारे रक्तानें एकच आहात असें म्हणतां येईल काय ?" ते आम्हाला चांगले माहीत आहेत. त्यांचे उत्तर आम्ही त्यानाच परत प्रश्न करून देऊं तें असें की, "खरोखर इंग्लिश ही जाति आहे का ?" "खरोखर या जगतात इंग्लिश रक्त, फ्रेंच रक्त, जर्मन रक्त, चिनी रक्त असा काहीं पदार्थ आहे काय ?" परकीय जातीशीं आणि परकीय लोकांशीं लग्ने करून जे लोक सर्रास आपल्या रक्तांत परकीय रक्त मिसळू देत आहेत ते एकाच रक्ताचे आणि एकाच वंशाचे आहेत असें त्याना म्हणता येईल काय ? जर त्याना तसें म्हणता येत असेल, तर हिंदूनासुद्धा तितक्याच जोरानें आपणहि तसेच असल्याचें सांगतां येईल. ज्या जातिभेदाचें यथार्थ स्वरूप तुमच्या भयंकर अज्ञानामुळें लक्षांत येत नाहीं त्याच जातीभेदामुळें आमच्यामध्यें एकरक्त खेळण्याला आडकाठी निर्माण झाली असे तुम्ही आग्रहानें मांडता. परंतु वस्तुस्थिती अशी आहे कीं, जर कोणाचें रक्त आपल्यात येऊन मिसळण्याला या जातिसंस्थेनें प्रतिबंध निर्माण केलाच असेल तर खऱ्या अर्थानें तो परक्या रक्तालाच केलेला आहे; स्वकीयाच्या नव्हे. इतकेंच नव्हे तर सध्या जी जातिसंस्था अस्तित्वात आहे तीच, ब्राह्मणापासून ते चांडाळापर्यंत एकच रक्त आमच्या सर्वांत वाहात आहे हें सिद्ध करून देणारा सदाचाच पुरावा नाहीं का ?

## हिंदुजातीच्या रक्तगंगेचा प्रचंडोदात्त प्रवाह

आपल्या चारांपैकीं कोणत्याहि एका स्मृतीकडे नुसती ओझरती दृष्टी जरी आपण टाकली तरी तेवढ्यावरूनहि सहज कळून येण्यासारखे आहे कीं, अनुलोम व प्रतिलोम विवाह संस्था ही त्याकाळीं अत्यंत रूढ आणि सुप्रतिष्ठित होती; व तिच्यामुळेंच आज दिसत असलेल्या बहुतेक जाति अस्तित्वात आलेल्या आहेत. शूद्र स्त्रीपासून एखाद्या क्षत्रियाला मुलगा झाला तर त्यामुळें उग्र जातीची निर्मिती होई. त्याच उग्र जातीशीं क्षत्रियाचा

संबंध येऊन अपत्यनिर्मिती झाली की श्वपच जाति निर्माण होई. तर ब्राह्मण आई आणि शूद्र पिता यांच्यापासून चांडाळ ज्ञाती अस्तित्वांत येत असे. सत्यकाम जाबालीच्या[1] वैदिक कथेपासून ते महादजी शिंद्यांपर्यंत[2] आमच्या इतिहासाच्या प्रत्येक पानापानावरून हें आढळून येईल कीं, आपल्या जातींच्या रक्ताची ही प्राचीन गंगा वैदिक कालाच्या प्रोत्तुंग गिरीपर्वतातून उगम पावून, आपल्या चालू इतिहासाच्या सपाट प्रदेशातून कितीतरी भूभाग सुपीक करीत, मोठमोठ्या अनेक उदात्त प्रवाहांना आपल्यामध्यें मिसळून घेत, किती तरी पतित आत्म्यांचा उद्धार करीत, स्वतःच्या प्रवाहाचा विस्तार, खोली आणि ऐश्वर्य वाढवीत, व आडरानात आणि वाळवंटात लुप्त होऊन जाण्याचा धोका टाळीत, पूर्वीपेक्षां कितीतरी पटीनें अधिक वेगानें आणि उत्साहानें अखंड वाहात चालली आहे. आमच्या जातिभेदाच्या संस्थेनें जर काहीं केलें असेल तर तें हें कीं, जें जे ओसाड आणि नापिक होतें, तें तें सुपीक आणि संपन्न करण्याकरितां आणि जे जे आधींच समृद्ध आणि बहरण्याच्या मार्गांत होतें त्यास धक्का न लावता किंवा त्याचें जीवनहि न तोडता, जो मार्ग आपल्या साधुवृत्तीच्या स्मृतीशास्त्रकारांनीं आणि देशाभिमानी राजश्रेष्ठांनीं अत्यंत योग्य रीतीनें घालून दिलेला होता, त्याच मार्गानें हा आमच्या जातीच्या रक्तगंगेचा प्रचंडोदात्त प्रवाह अखंड वाहात राहील अशी व्यवस्था केली.

## राजमान्य झालेले आंतर्जातीय विवाह

ही गोष्ट केवळ, आपल्या चार मुख्य जातींत जे आंतर्जातीय विवाह होत त्यातून निर्माण झालेल्या, किंवा चार मुख्य जाति आणि दुसऱ्या भेसळ पोटजाती यांच्या विवाहसंबंधानें निर्माण झालेल्या, अन्य जातींच्याच संबधांत

१. याच्या आईचें नांव जबाला व याचें नांव सत्यकाम. याचा जन्म होताच याचा बाप मेला, त्यामुळें याच्या आईलाहि आपल्या मृत पतीचे गोत्र इ. कांहींच माहित नव्हते. म्हणूनच हा आईच्या व आपल्या जोड नावानेंच ओळखला जाऊ लागला असावा.

२. महादजी शिंदे. पाटिलबुवा यांची आई रजपूत होती.

खरी आहे असें नसून, इतिहासाच्या अतिप्राचीन अशा अंधुक भूतभूत कालात जे लोकसमाज आणि ज्या जाति स्वतंत्र आणि स्वत: पुरतेंच जीवन जगत होत्या, त्याच्याहि संबंधात तितकीच खरी आहे. याचें प्रत्यंतर पहावयाचे असल्यास नेपाळ किंवा मलबार येथें सध्या ज्या चालीरीती अद्याप जिवंत आहेत त्या एकदा दृष्टीखालून घालाव्या. या ठिकाणीं ज्या जाती मूळच्या आर्येतर अशा आदिवासी जाति मानल्या जातात त्या जातींतील स्त्रीशीं उच्चवर्णीय पुरुषाला विवाह करण्याला मोकळीक असते. आता त्या स्वतंत्र आदिवासी जाति आहेत, ही वरील प्रकारची समजूत जरी खरी मानली तरी, हिंदुसंस्कृतीचें रक्षण करण्यात त्यांनीं जें धैर्य आणि प्रेम दाखविले आहे त्यामुळें त्या आपल्याच जातींत समाविष्ट केल्या जात असतात इतकेंच नव्हे, तर समान रक्ताच्या अत्यंत जिव्हाळयाच्या नात्यानें त्या आमच्याशीं सदाच्या बांधल्या गेलेल्या आहेत. नागवंश हा काय द्रविड जातीपैकीं आहे ? मग जेव्हा अग्निवंशातील तरुणानीं नागकन्याचा अंगिकार केला आणि चंद्रवंशानीं आणि सूर्यवंशानीं त्या दोन्ही वंशातील तरुणाना आपल्या कुमारिका समर्पण केल्या, तेव्हां आता हे आणि ते असा भेदाभेद कुठें राहिला ? ज्यावेळीं जातिभेदाची संस्थाच थोडीफार विस्कळीत होऊन लुप्तप्राय होते कीं काय अशी भीति वाटत होतीं तो मध्यंतरीचा बौद्धधर्माच्या चलतीचा काहीं शतकांचा काळ जर सोडला, तर पार हर्षाच्या राजवटीपर्यंत आंतर्जातीय विवाह हे अगदीं राजमान्य झालेले होते. उदाहरण म्हणून पाहिजे असेल तर पांडवांच्या एकाच कुटुंबाचीच गोष्ट घ्या. पराशर ऋषि हा ब्राह्मण होता. कोळयाच्या सुंदर मुलीवर[1] त्याचें प्रेम बसलें व त्या दोघापासून जगद्विख्यात व्यास निर्माण झाले. पुढें व्यासांनाहि अंबा आणि अंबालिका या दोन क्षत्रिय राजकन्यापासून दोन पुत्र झाले. या दोहोंपैकीं एक जो पांडु, त्यानें नियोगाच्या पद्ध-

---

१. सत्यवति अर्थात् मत्स्यगंधा. हिच्या अंगाला येणारी समुद्रांतील माशांची घाण नाहींशीं करून पराशरऋषीनें तिचा देह सुगंधित बनविला. एक योजन दूरवर तिच्या शरीराचा सुवास दरवळत असे. ' बाग योजनगंधा त्या वनदेव-पराशरी ' ( ' कमला ' सावरकरकृत ).

तीनुसार आपल्या स्त्रियांना पुत्रोत्पत्ति करण्यास मोकळीक दिली. आणि पुढें निरनिराळया अज्ञात अशा जातींतील पुरुषाचें प्रेमाराधन करून त्यांनीं आपल्या विख्यात महाकाव्याच्या नायकाना जन्म दिला. कर्ण, बभ्रुवाहन[1] घटोत्कच[2], विदुर[3] इ. त्या काळच्या तितक्या सुप्रसिद्ध अशा व्यक्ति-विशेषांचा उल्लेख न करता त्या कालाच्या मानानें आधुनिक अशा चंद्रगुप्ताचें उदाहरण आम्ही वाचकांपुढें ठेवतों.

## "आचारं कुलमुच्यते ।"

चंद्रगुप्तानें ब्राह्मण कुमारिकेशीं लग्न करून अशोकाच्या पित्याला जन्म दिला असें सांगण्यात येतें. अशोक राजकुमार असतांनाच त्यानें एका वैश्यकन्येशीं विवाह केला. वैश्य असलेल्या हर्षानें आपली मुलगी क्षत्रिय राजपुत्राला दिली. व्याधकर्मा हा व्याधाचा मुलगा. याची आई ही एका ब्राह्मणाची मुलगी होती. व व्याधावर तिची प्रीति जडून तिनें व्याधाशीं लग्न केलें व या दोघांपासून विक्रमादित्याचा जो 'यज्ञाचार्य' तो जन्माला आला. सुरदास कृष्णंभट हा जरी ब्राह्मण होता तरी एका चांडाल कन्यकेवर त्याचें निरतिशय प्रेम बसलें व उघड-

१. मणिपूरच्या राजाच्या चित्रांगदा नावाच्या राजकन्येपासून अर्जुनाला झालेला पुत्र. यानेंच पांडवाचा अश्वमेधाचा घोडा अडवून अर्जुनाशीं युद्ध केले व त्यात आपल्या बापाला म्हणजे अर्जुनाला ठार केले. परंतु पुढें पातालातील संजीवनी मणि आणून त्यानें अर्जुनाला पुनः जिवंत केलें.

२. हिडिंबेपासून झालेला भीमाचा पुत्र. भारतीय युद्धात ह्यानें पांडवाच्या बाजूनें लढून अचाट पराक्रम केले. शेवटीं कर्णानें आपली अमोघ शक्ति मारून त्याला ठार केले.

३. दासीपासून कृष्ण द्वैपायन व्यासांना झालेला पुत्र. हा परम नीतिमान आणि निस्पृह होता. धृतराष्ट्राला यानें केलेला उपदेश विदुरनीति म्हणून महाभारताच्या उद्योगपर्वाच्या नऊ अध्यायात आलेला आहे. मांडव्य ऋषीप्रमाणें अरण्यात पिशाच्च वृत्तीनें १०० वर्षें हिंडून पुढें तो मरण पावला.

पणें तिच्याशीं विवाह लावून त्यानें आपला संसार थाटला, आणि 'मातंगी-पंथ' या नांवाच्या धार्मिक पंथाचा तो संस्थापक म्हणून प्रसिद्ध पावला. मातंगी पथाचे लोक आपल्याला हिंदूच म्हणवून घेतात आणि तसे म्हणून घेण्याचा अधिकार निःसंशय त्याना पोंचतोहि. पण एवढ्यानेंच हें काहीं संपलें नाहीं. एखादा पुरुष किंवा एखादी स्त्री आपल्या वैयक्तिक कृतींनीं आपल्या पहिल्या जातीला मुकून दुसऱ्या एखाद्या जातींत पडत असेल. "शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम्।" "न कुलं कुलमित्याहुराचारं कुलमुच्यते। आचार कुशलो राजन् इहचामुत्र नंदते॥ उपासते येन पूर्वां द्विजा संध्यां न पश्चिमां। सर्वांस्तान् धार्मिको राजा शूद्रकर्माणि योजयेत्॥ ही आज्ञा काहीं नेहमींच पोकळ बुजगावण्याच्या स्वरूपाची नव्हती. अनेक क्षत्रियांनीं शेतीच्या व इतर उद्योगधंद्याला वाहून घेतल्यामुळें क्षत्रिय म्हणून असलेला त्याच्याविषयींचा आदर नष्ट झाला, व दुसऱ्या इतर जातींमध्यें त्याची गणना करण्यात येऊ लागली. तर अनेक शूर लोक आणि काहीं काहीं वेळेला संबध रानटी आदिवासी जातीच्या जाती स्वतःच्या शौर्यपराक्रमानें क्षत्रियाच्या योग्यतेला पोंचून क्षत्रियाच्या वर्णविशिष्ट अधिकारांचा आणि बिरूदाचा उपभोग घेण्यास पात्र ठरत, व लोकहि त्याचें क्षत्रियत्व मान्य करीत. जाति-बहिष्कृत होणें ही नित्याच्या परिपाठांतलीच गोष्ट होती; म्हणजेच दुसऱ्या कोणत्या तरी जातींत हे जाति-बहिष्कृत पुन्हां समाविष्ट करून घेतले जात होते.

## वैदिकांचे अवैदिक जातीशीं विवाहसंबध

आता ही गोष्ट कांहीं वैदिक धर्मानें घालून दिलेल्या जातिसंस्थेवर विश्वास ठेवणाऱ्या हिंदूंमध्येंच तेवढी दिसून येत होती असें नसून हिंदूंमधील ज्या अवैदिक जाती होत्या, त्यांच्यांतहि वरील प्रकार घडून येत असत. एकाच कुटुंबांत पिता बौद्ध, माता वैदिक व पुत्र जैन, हा जो प्रकार बौद्ध कालात दिसून येई तसा आजहि दिसून येतो. गुजराथमध्यें तर वैष्णव आणि जैन यांच्यामध्यें विवाहसंबंध घडून येतात. पंजाबात आणि सिंधमध्यें शीख आणि सनातनी याच्यांत लग्नें होत असतात. एवढेंच काय पण आजचा मानभाव किंवा लिंगायत किंवा शीख किंवा सत्नामी हा,

कालचा हिंदु आहे आणि आजचा हिंदु हा उद्यांचा क्वचित् लिंगायत, किंवा शीखहि असेल!

आणि म्हणूनच, हिंदु या नांवाप्रमाणें दुसरें कोणतेंहि नाव आमच्यातील जातीय आणि वांशिक एकतेचें यथार्थत्वानें दिग्दर्शन करू शकत नाहीं. आमच्यापैकीं काहीं आर्य तर दुसरे कांहीं अनार्यहि होते. परंतु आयर काय नि नायर काय, आम्ही सारे हिंदुच होतों आणि रक्तानें एक होतों. आमच्यांत कांहीं ब्राह्मण, काहीं नामशूद्र किंवा पंचम असेहि आहेत. परंतु ब्राह्मण असो वा चंडाल असो, आम्ही सारे हिंदूच आहोंत आणि रक्तानें एक आहोंत. आमच्यामध्यें कांहीं दाक्षिणात्य तर कांहीं गौड आहेत; परंतु गौड काय नि सारस्वत काय, आम्ही सारे हिंदु आहोंत. आमच्यांतच काहीं राक्षस होते आणि काहीं यक्षहि होते, तरीहि आम्ही हिंदूच असून एकच रक्त आमच्या सर्वांच्या नसांतून वाहात आहे. आपल्यापैकीं काहीं वानर तर किन्नरहि होते; परंतु वानर वा नर असो आम्ही सारे हिंदूच असून एकाच रक्ताचे आहों. आमच्यापैकीं कांहीं जैन तर जंगम आहेत, परंतु जैन असो वा जंगम असो आम्ही सारे हिंदूच असून एकाच रक्ताचे आहों. आमच्यामध्यें कोणी एकेश्वरवादी, कोणी सर्वेश्वरवादी, कोणी ईश्वरवादी कोणी निरीश्वरवादी असे आहेत. परंतु एकेश्वरवादी असो नाहींतर निरीश्वरवादी असो, आपण सारे हिंदूच आहोंत आणि एकाच रक्ताचे आहोंत. आम्ही नुसतें राष्ट्र नसून जाति आहोंत. जन्मसिद्ध बन्धुभावाचें नातें आमच्यात वास करीत आहे. आणि खरोखर दुसऱ्या कसल्याहि गोष्टीची आवश्यकता असण्याचें कारण नाहीं. हा सर्व प्रश्न आपल्या मनाचा नि अंतःकरणाचा आहे! आम्हाला हें निश्चितपणें वाटतें कीं, राम आणि कृष्ण, बुद्ध आणि महावीर, नानक आणि चैतन्य, बसव[१] आणि

१. वीरशैव लिंगायत धर्माचा संस्थापक. (खि. ११६०) महादेवभट्ट नावाच्या तैलंग ब्राम्हणाचा पुत्र. विजल राजाला याची बहीण दिली असल्यामुळें याला प्रधानपद प्राप्त झालें. यानें आपल्या अधिकाराचे जोरावर लोकांना दम भरून आपल्या नवीन धर्माच्या अनुयायाची संख्या वाढविली.

(टीप पुढें चालू)

माधव,[2] रोहिदास[3] आणि तिरुवेल्लर[4] यांच्या धमन्यातून जें प्राचीन रक्त वाहात होतें तेंच रक्त, आमच्या यच्चयावत् 'हिंदु' मात्रांच्या धमन्या धमन्यांतून खेळत आहे; हृदया हृदयातून स्पदन पावत आहे. आम्ही जाति आहोंत असें आम्हाला निश्चयानें वाटते; आणि म्हणूनच आम्ही—रक्ताच्या जिव्हाळयाच्या संबंधानीं एक असलेले—एकजाति आहोंत.

## वास्तविकत: मानवजात हीच काय ती जगांतील एकमेव जात

खरें पाहता, मानवाचा विचार करता या समग्र जगावर एकच एक जात आहे, आणि ती म्हणजे मनुष्य जात! एकाच मानवी रक्ताच्या प्रवाहानें ती जात आज जगतावर जिवत राहात आली आहे. या व्यतिरिक्त दुसरें कोणतेंहि बोलणें म्हणजे काम भागवून नेण्यापुरतें, चालचलाऊ आणि केवळ सापेक्षत: सत्य, असेंच होय. जातीजातींमध्यें ज्या कृत्रिम भिंती तुम्ही उभारता त्या कोसळून पाडण्याचा निसर्गाचा अविरत प्रयत्न चालू असतो. रक्तारक्ताचे मिश्रण होऊ न देण्याचा प्रयत्न करणें म्हणजे वाळूच्या पायावर बांधकाम उभारण्यापैकींच आहे. स्त्रीपुरुषामधील आकर्षण हेंच साऱ्या धर्माचार्यांच्या आज्ञापेक्षा प्रबल ठरलेलें आहे. इतकेंच काय, परंतु

---

(मागील टीप पुढें चालू)

पुढें बसवानें विजलाचा वध केला परंतु विजलाच्या पुत्राच्या भयानें त्यानें विहिरींत उडी टाकून आत्महत्या केली. बसवाच्या धर्मात जातिभेद नाही. कर्नाटकांत याचा खूप प्रसार झाला.

२. पाचरात्र वैष्णव मताचा अनुयायी. शंकराचार्यांनीं यास वादांत जिंकून त्यास अद्वैतमतानुयायी केलें.

३. कबीराच्या समकालीन होऊन गेलेला चामार जातींतला एक कृष्णोपासक सत्पुरुष.

४. तामीळ कवि (ख्रि. १०० ते १३०)

अंदमानांतील आदिवासी लोकांच्या रक्तातसुद्धां तथाकथित आर्यांच्या[१] रक्ताचे बिंदु मिसळलेले आहेत! (ही गोष्ट अर्थात उलट रीतीनें आर्यांच्याहि संबंधांत समजावयाला हवी.) खरें बोलायचें तर कोणीही असें म्हणू शकेल, किंवा इतिहासा वरून तसें म्हणण्याचा त्याला तसा अधिकार प्राप्त होईल कीं, प्रत्येकाच्या रक्तवाहिन्यांत उभ्या मनुष्य जातीचेंच रक्त खेळत आहे! उत्तर ध्रुवापासून दक्षिण ध्रुवापर्यंत मानवाचें जें मुळातलेंच ऐक्य आहे तेवढेंच कायतें खरें, बाकी सारे सापेक्षतःच जें काय समजावयाचे तें!

## हिंदुत्वाचें दुसरें आवश्यक लक्षण

आणि सापेक्षतःच बोलावयाचें तर, हिंदु आणि क्वचित् ज्यू यांच्यापेक्षां जगांतील दुसऱ्या कोत्याहि लोकाना आपण एक जाति आहोंत असें न्याय्यतः सांगताच येणार नाहीं. एका हिंदूशीं लग्नसंबंध जुळविणारा दुसरा हिंदु आपल्या जातीला एक वेळ मुकेल, परंतु हिंदुत्वाला तो कधींच मुकणार नाहीं. ईश्वराचें अस्तित्व मानणाऱ्या अथवा न मानणाऱ्या अशा कोणत्याहि एखाद्या धर्ममतावर किंवा तत्त्वज्ञानावर किंवा सामाजिक पद्धतींवर विश्वास ठेवणारा जर कोणी हिंदु असेल आणि जर तें धर्ममत, तें तत्त्वज्ञान नि ती सामाजिक पद्धति निर्विवादपणें आपल्या राष्ट्रात जन्मास आलेली व एकमेवपणें हिंदुप्रणीत असेल, तर तो हिंदु एकवेळ आपल्याला विशिष्टपथाला मुकेल परंतु त्याच्या हिंदुत्वाला कदापि नाहीं! कारण हिंदुत्वाचें सर्वांत प्रमुख

---

१ हिंदुस्थानच्या इतिहासकालात अंदमानात पूर्वीच गेलेले भारतीय, तत्रस्थ वन्य मूळ निवासीयास सुधारण्याचे जागीं स्वतःच रानटी बनले असावेत आणि पुढें नवीन रक्तसंबंध अशक्य झाल्यानें त्या रानटी लोकांत लुप्त तरी झाले असावेत वा नष्ट तरी झाले असावेत. ('माझी जन्मठेप' पृ. ५८) अंदमानमध्यें 'अर्रा' नांवाची एक जाति आहे. त्या जातींतील लोकाची चेहेरेपट्टी थेट पंजाब्यांच्यासारखी आहे. 'अर्रा' ह्या नावांत 'आर्य' या नावाचेंहि सादृश्य दिसते. ('राष्ट्रमीमांसा' : ले. स्व. बाबाराव सावरकर)

असें आवश्यक लक्षण म्हणजे रक्तानें हिंदु असणें हेंच होय! म्हणून सिंधूपासून समुद्रापर्यंत पसरलेल्या या भूमीवर स्वतःची पितृभूमि म्हणून जे प्रेम करतात आणि त्यामुळेंच जी जाति दुसऱ्यांना आपल्यात मिसळवून घेऊन व त्यांच्याशीं संबंध जुळवून अगदीं प्राचीन सप्तसिंधूंच्यापासून आतांपर्यंत नावारूपाला आली त्या जातीच्या रक्ताचा वारसा जे सांगतात, त्यांच्याजवळ हिंदुत्वाची अत्यंत प्रमुख अशीं दोन महत्त्वाचीं लक्षणें आहेत असें समजावें.

## आमची सर्वांची संस्कृति एक आहे

परंतु दोनच मात्र: कारण थोड्या विचाराअंतीं आपल्या लक्षात येईल कीं, एकराष्ट्र आणि एकजाति ही दोनच लक्षणें म्हणजे कांहीं हिंदुत्वाचीं सर्व लक्षणें नव्हेत. अज्ञानांतून निर्माण झालेले दुराग्रह जर ते टाकून देतील तर हिंदुस्थानातले बहुसंख्य मुसलमान या आमच्या भूमीवर आपली पितृभूमि म्हणून प्रेम करूं लागतील; आणि त्याच्यातील जे स्वदेशाभिमानी दिलदार अंत:करणाचे आहेत त्यांनीं आतापर्यंत तसें प्रेम केलेंहि आहे. जें धर्मांतर लक्षावधि उदाहरणांत सक्तीचेच होते, त्या त्यांच्या धर्मांतराचा इतिहास इतका अलीकडचा नि ताजा आहे कीं, आपल्यामध्ये हिंदु रक्त खेळत आहे ही गोष्ट ते विसरूं म्हणाले तरी विसरूं शकणार नाहींत. परंतु. जे आपण केवळ सत्य संशोधन करण्यासच बसलों आहोंत, व काय असावें हें ठरविण्याचा आपला मुळांतच हेतु नाहीं त्यांनीं मुसलमानाना हिंदु कसें म्हणावे? काश्मीरातील आणि हिंदुस्थानांतील इतरत्रच्या मुसलमान जाति, त्याच प्रमाणें दक्षिण हिंदुस्थानातील खिश्चन जातीहि, आपल्यातलेंच जातिनियम आणि आचार इतक्यापर्यंत पाळतात कीं, केवळ त्याच्या जातीवाचून दुसऱ्याशीं ते बहुधा लग्नसंबध जुळवीत नाहींत. आणि यामुळें कोणाहि परकीयाच्या रक्ताची भेसळ त्यांच्या मूळच्या हिंदु रक्तात झालेली नाहीं. अर्थात् ही गोष्ट कितीहि स्पष्ट असली तरीहि, हिंदु याशब्दाचा जो अर्थ आपण समजतों त्या अर्थानें, त्यांना हिंदु म्हणून मानता येणार नाहीं. कारण. समान पितृभूमीविषयीं वाटणाऱ्या प्रेमाच्या जिव्हाळ्यामुळेंच आणि जें रक्त आपल्या हृदयाचें स्पंदन चालू ठेवतें नि आपल्या प्रीतिभावना अधिक

स्निग्ध बनविते, तेंच रक्त आपल्याहि नसानसांतून खेळत असल्यामुळें काहीं आपण हिंदु केवळ एक मेकाशीं बद्ध झालों आहों असें नाहीं, तर ज्या आपल्या महान् संस्कृतीला आपण सारेच मोठ्या भक्तिभावानें आदरितों, त्या संस्कृतीच्या समान प्रेमामुळे आपण सारे हिंदु एक आहोंत. आपल्या हिंदु सभ्यतेला (civilization) संस्कृति हाच शब्द अगदीं यथार्थ आहे. कारण त्यामध्यें संस्कृत भाषाहि सहजच सूचित केली जाते. आपल्या हिंदु जातीच्या भूतकालामध्यें जे जें अत्युत्कृष्ट आणि सुसंग्राह्य होतें त्याला, नि त्याचबरोबर आपल्या महान् संस्कृतीलाहि, शब्दरूप देऊन, त्यासर्वांचें संरक्षण करण्याचें अमूल्य साधन याच संस्कृत भाषेनें आपल्या द्वारां आपणाला प्राप्त करून दिलें आहे. आम्ही राष्ट्र आहोंत नि जाति आहोंत म्हणून, आणि आमची सर्वांची संस्कृतीहि एक आहे म्हणून, आम्ही एक आहोंत!

## संस्कृति म्हणजे तरी काय?

परंतु संस्कृति म्हणजे तरी काय? संस्कृति म्हणजे मानवी मनाचा आविष्कार. संस्कृति म्हणजे या भौतिक अशा जड सृष्टीवर माणसानें जे संस्कार घडविले त्याचा इतिहास. ह्या जडसृष्टीचा कर्ता जर परमेश्वर कल्पिला तर संस्कृति ही माणसानें निर्माण केलेली विश्वामित्री सृष्टीच आहे. हिचा सर्वोच्च विकास, मनुष्याच्या आत्म्यानें जड मातीवर आणि माणसावर मिळविलेला परमोच्च विजय यामध्येंच प्रकट झालेला दिसून येतो. जिथें जिथें आणि जेथपर्यंत, मानवाला त्याच्या आत्म्याला प्रसादवील अशा प्रकारची जड सृष्टीची रचना करण्यांत यश आलेलें आहे तेथेंच संस्कृतीला खऱ्या अर्थानें प्रारंभ होतो. आणि त्या संस्कृतीचा परमोच्च विजय आणि विकास जेव्हां सर्वत्र दृष्टींनीं सुसंमृद्ध नि पूर्णत्वास पोंचलेल्या जीवनाचे रस, मानव उपभोगतो आणि सामर्थ्य, सौंदर्य व प्रीति यां संबंधींच्या आपल्या आत्म्याच्या इच्छा तृप्त करून घेऊन अनिर्वाच्य नि अपार आनंद प्राप्तीचीं सर्व साधनें तो हस्तगत करतो तेव्हांच होतो.

राष्ट्राच्या संस्कृतीचा इतिहास म्हणजे त्याच्या विचारांचा आचारांचा आणि संपादिताचा इतिहास होय. वाङ्मय आणि कला यांवरून राष्ट्राची वैचा-

रिक उंची कळते; इतिहास आणि सामाजिक चालीरीती, यांच्या योगें त्याच्या रूढ आचारांची व त्यानें साध्य केलेल्या पराक्रम–दिग्विजयाची माहिती होते. आणि या साच्यामधून माणूस वेगळा असा राहत नाहीं. अंदमानी लोकाच्या ओबडधोबड डुंगीचीच–पोखरलेल्या लांकडी नांवेचीच–सुधारलेली आवृत्ति म्हणजे अमेरिकेच्या अद्यावत् रणतऱ्या किंवा विनाशिका नौका ( Dreadnaughts ), असेंच खऱ्या अर्थानें म्हटले पाहिजे. पॅरिसमधील तरुणींच्या अगदीं अद्यावत् देहभूषा प्रकाराचा मूळ उगमहि, आपल्या कमरपट्ट्यात 'पातुआ' स्त्री जो पानांचा झुबका खोंवते आणि एवढ्याकारण्यानेंच जिची देहभूषा नि सौंदर्यप्रसाधना परिपूर्णत्वानें साधते, त्या पातुआ-स्त्रीच्या त्या पानाच्या झुबक्यातच सांपडतो !

आणि तरीहि 'डुगी' डुगीच राहिली आहे आणि विनाशिका नौका त्या विनाशिका नौकाच आहेत. त्याच्यात एकसारखेपणापेक्षा विसादृश्यच अधिक आहे. असें असूनहि, इतराप्रमाणें हिंदूंनींहि दुसऱ्याच्या कितीतरी गोष्टी उचलल्या असल्या नि आपल्या दुसऱ्यांना दिल्या असल्या तरी, त्याची संस्कृति ही इतकी वैशिष्ट्यपूर्ण आहे कीं, दुसऱ्या एखाद्या संस्कृतीचा तोंडवळा तिच्यासारखा सापडणें सर्वस्वीं अशक्य आहे. आणि पुन्हा त्याचे आपापसात किंतुहि तरी भिन्नत्व असले तरी, एकमेकांपासून भिन्न असण्यापेक्षा ते इतके अधिक एकमेकासारखे आहेत कीं, समान संस्कृति, समान वाङ्मय आणि समान इतिहास यांच्या योगानें बनलेल्या जगातील ज्या दुसऱ्या इतर संस्कृति आहेत, त्याच्या पंक्तींत एक स्वतंत्र संस्कृति म्हणून बसण्याचा मान हिंदूंच्या या संस्कृतीसंबंधानें नाकारतां येणेंच शक्य नाहीं.

## आमच्या उज्ज्वल संस्कृतीचा वारसा

'हिंदूंना इतिहास नाहीं' अशा ज्या पक्षपाती आणि अज्ञानमूलक आरडाओरडीनें सध्याच्या जगाचें कान भारले गेले आहेत त्या आरडाओरडीचा ज्यांच्यावर परिणाम झालेला आहे त्यांना, 'जवळ जवळ एकट्या हिंदूंनींच धरणीकंपाच्या आणि जलप्रलयाच्या भीषण आपत्तींना तोंड देऊन आपल्या इतिहासाचें रक्षण केलें आहे' हें आमचे म्हणणें, अगदीं चमत्कारिक नि विपरीत वाटेल. हिंदु जातीच्या इतिहासाचें उपलब्ध असें

पहिलें प्रकरण ज्याना म्हणतां येईल त्या वेदापासून आमच्या इतिहासाला प्रारंभ होतो. पहिलें पाळण्यांतलें गाणें जें प्रत्येक हिंदु मुलगी ऐकत आली आहे तें, त्या साध्वी सीतेवर रचलेलें दिसून येतें. श्रीरामचंद्राला आपल्यापैकीं कांहीं लोक अवतार म्हणून भजतात; कांहीं जण त्यास रणरंगधीर असा लोकोत्तर वीर म्हणून पूजितात, तर आपल्यापैकीं सारेच जण, आपल्या जातीचा आदर्श आणि सुविख्यात सम्राट म्हणून त्याजवर भक्तिभावानें प्रेम करतात. मारुतिराय आणि भीमसेन हे प्रत्येक हिंदु तरुणाला बलाचें आणि वज्रदेही आदर्श—शरीरसौष्ठवाचें सदाचें स्फूर्तिस्थानच होऊन राहिले आहेत. त्याच प्रमाणें सावित्री आणि दमयंती ह्या प्रत्येक हिंदुकन्यकेला, एकनिष्ठ आणि पवित्र प्रेमाच्या आदर्शभूत सती साध्वीच होऊन राहिलेल्या आहेत. गायी चारणाऱ्या गोकुळच्या त्या दिव्य गुराख्यावर राधेनें जें प्रेम केलें, त्याच प्रेमाचे पडसाद, जिथें जिथें हिंदु प्रियकर आपल्या प्रियकरणीचें चुंबन घेतो तिथें तिथें उमटत असतात. कौरवाबरोबर झालेल्या प्रचंड लढाया, अर्जुन आणि कर्ण, किंवा भीम आणि दुःशासन यांच्यातील आव्हानपूर्वक खेळलेली द्वंद्वे, हीं जरी कुरुक्षेत्रावर हजारों वर्षांपूर्वी घडून आलेलीं होतीं तरी, झोंपड्या झोंपड्यांतून आणि राजवाड्या राजवाड्यातून त्यांतील भावना उचंबळून मोडणाऱ्या साऱ्या रसांसह आजलासुद्धा तीं गायिलीं जात असतात. अभिमन्यू जितका अर्जुनाला प्रिय नसेल तितका तो आज आपणा सर्वांना प्रिय होऊन बसला आहे. त्या राजीव नेत्र सुकुमार कुमाराच्या रणांगणावरील मृत्यूची वार्ता ऐकून जितक्या प्रेमानें आणि शोक विव्हलतेनें आक्रंदन करीत त्याच्या पित्यानें अश्रू ढाळले असतील, तितक्याच प्रेमानें आणि शोक विव्हलतेनें लंकेपासून काश्मीरपर्यंतचा सारा हिंदुस्थान प्रत्यहिं अश्रू ढाळीत असतो. आणि यापेक्षा अधिक तें आम्हीं काय सांगूं शकणार आहों ? मूठभर वाळूच्या कणाप्रमाणें आपणांस दाही दिशामध्यें जरी उधळून दिलें तरी, रामायण आणि महाभारत एवढे दोनच ग्रंथ आपणाला एकत्र आणून एकजाति म्हणून आपणांस पुन्हा एकजीव करूं शकतील. मी एखाद्या मॅझिनीचें चरित्र वाचतों आणि उद्गारतों, “किती देशाभिमानी ते आहेत.” माधवाचार्यांचें चरित्र मी वाचतों आणि माझ्या तोंडांतून उद्गार बाहेर पडतात “केवढे स्वदेश-

भक्त आम्ही आहों!" पृथ्वीराजाचें पतन आठवून बंगाल, आणि हौतात्म्य करून मृत्युला कवटाळणाऱ्या गोविंदसिंगाच्या शूर मुलांचे बलिदान स्मरून महाराष्ट्र, दोघेहि शोकानें वेडे होतात. देशाच्या उत्तर टोंकाला राहणाऱ्या आर्यसमाजी इतिहासकाराला देशाच्या दक्षिण टोंकाला जे हरिहर आणि बुक्क[1] ते आपल्याकरितांच लढले असें त्यास वाटतें; आणि दक्षिण टोंकाच्या सनातनी इतिहासकाराला गुरु तेजबहादुरहि आपल्याकरिताच मेले असें वाटतें. आमचे सर्वांचे राजे एकच होते. आमचीं राज्येंहि एकच होतीं. स्थैर्य नि स्वास्थहि आम्ही सर्वांनीं समानतेनेंच भोगिलें, आणि पराक्रम दिग्विजयहि आम्ही सर्वांनींच केले. विजयामध्यें आमचा सर्वांचा वाटा होता आणि पराभव-आपत्तींतहि आम्ही एकत्र उभे होतों. मोकाबसाय्या, आणि पिसाळ[2], जयचंद[3] आणि काळा पहाड[4] याच्या नामोच्चारानें आपणासर्वांनाच शतपा-

---

१. संगमाचे पुत्र हरिहर व बुक्क या दोघांनीं हिंदु राज्याचें पुनरुज्जीवन करण्याचें ध्येय ठेवूनच विद्यारण्याच्या सहाय्यानें तुंगभद्रेच्या दक्षिणेस विजयानगरचे हिंदु साम्राज्य स्थापिलें. (खि. १३२६.) महंम्मद तुघ्लकानें आनेगुंदीवर स्वारी केली त्यावेळीं हरिहर हा आनेगुंदीच्या राजाचा प्रधान होता.

२. सूर्याजी पिसाळ यानें मराठ्याविरुद्ध औरंगजेबाशीं फितुरी करून त्यास रायगड मिळवून दिला. पुढें शाहूनें याला ठार मारलें.

३. पृथ्वीराजाचा पराभव करण्यासाठीं शहाबुद्दीन घोरीला हिंदुस्थानवर चालून येण्यास आमंत्रण देणारा कनोजचा शेवटचा फितुर नि देशद्रोही राजा. पुढें याचाहि सर्वनाशच झाला.

४. बंगालमधील डाक्का येथें राहणारा पूर्वीचा शुचिर्भूत ब्राह्मण तरुण. अत्यंत हिंदुधर्माभिमानी. तेथील मुसलमान नबाबाच्या मुलीचे प्रेम याजवर बसल्यामुळे नबाबानें याला मुसलमान होण्यासाठीं जबरदस्तीनें तुरुंगात टाकून शेवटीं त्याचा शिरच्छेद करण्याचीहि आज्ञा दिली. परंतु त्या तरुणावर त्या मुलीचें इतकें प्रेम होतें कीं, त्याच्या जागीं तीच मरण्यास सिद्ध झाली. हें तिचें प्रेम पाहून तरुणानें तिच्याशीं विवाह करण्यास संमति

(टीप पुढें चालू)

तक्याप्रमाणें वाटूं लागतें. तर अशोक, पाणिनी आणि कपिल[1] यांच्या नांवासरशीं आपल्या शरिरात नवचैतन्य सळसळतें आणि एक प्रकारचा आत्मगौरव वाटूं लागतो.

## भांडणें नि युद्धें तुमच्यांत कुठें नाहींत ?

परंतु, हिंदूंमध्यें आपापसात जीं युद्धें झालीं त्याचें काय ? आम्ही यावर लगेच उत्तरतों, "इंग्लिशांमध्यें ज्या "गुलाबांच्या लढाया[2] झाल्या त्याचें काय ?" इटलीमध्यें, जर्मनीमध्यें, फ्रान्समध्यें, अमेरिकेमध्यें, संस्थाना संस्थानांच्या, पंथापथांच्या आणि वर्गावर्गांच्या–प्रसंगीं एका पक्षानें आपल्या प्रतिपक्षी देशबांधवाचा काटा काढण्यासाठीं परकीयांचे साहाय्य घेऊनहि–ज्या आपापसात मारामाऱ्या झाल्या त्याचें काय ? इतके होऊनहि ते सर्वजण एकराष्ट्र आणि एकच समान इतिहास असलेले असेच लोक अद्याप आहेत ना ! मग, ते जर तसे असू शकतात तर मग हिंदूंहि

(मागील टीप पुढें चालू)

दिली. पण सनातनी हिंदुसमाजानें त्या मुलीला हिंदु करून घेण्याचें नाकारले. तेव्हा तो जगन्नाथपुराला जाऊन देवाला साक्षी ठेवून आपलें लग्न हिंदुपद्धतीनें करण्याचा निर्धार करता झाला. परंतु तेथील देवालयाच्या सनातनी भक्ताच्या डोळ्याला हा भ्रष्टाकार (!) सहन न होऊन त्यानीं त्याला मारपीट करून हुसकून दिलें. त्यामुळें हिंदुधर्मात राहण्याची तीव्र तळमळ असूनहि समाजानें त्याला दूर लोटल्यामुळें तो चिडून जाऊन एक कडवट असा वाडगा मुसलमान झाला. व पुढें यानेंच हजारों मंदिरें भ्रष्ट करून अनेक हिंदूंना सक्तीनें बाटविलें. बंगालमध्यें मुसलमानाची संख्या वाढविण्याला हाच 'काळा पहाड' पुढें कारणीभूत झाला.

१. सांख्य शास्त्राचा कर्ता. त्याच्या नावावरूनच कापिल सांख्य अशी संज्ञा रूढ आहे.

२. इंग्लंडमधील यॉर्क व लॅंकेस्टर घराण्यातील युद्धे. (खि. १४५५). ध्वजचिन्ह गुलाब असल्यामुळें या युद्धांना Wars of Roses म्हणतात.

अगदीं तसेच एकराष्ट्र आणि एकजाति आहेत. जर हिंदूंना समान असा इतिहास नसेल तर जगांतील कोणालाच तो तसा नसला पाहिजे !

## संस्कृत ही आमच्या देवांची भाषा आहे

ज्याप्रमाणें आपल्या इतिहासावरून आपल्या जातीचे पराक्रम दिग्विजय आपल्याला माहीत होतात, त्याचप्रमाणें आपल्या वाङ्मयाचा सांगोपांग विचार जर आपण केला तर त्यावरून आपल्या जातीच्या विचारसंपत्तीचा इतिहास, आपणाला ज्ञात होतो. असें म्हणतात कीं विचार आणि शब्द वेगवेगळे असूच शकत नाहींत. व त्यामुळेच आमचें वाङ्मय आणि आमची सान्याची समान भाषा संस्कृत हीं दोन वेगवेगळीं असूच शकत नाहींत; तीं सर्वस्वीं अभिन्नच आहेत. खरोखर ती आमची मातृभाषा आहे. याच भाषेत आमच्या जातीच्या माता बोलत होत्या, आणि याच भाषेंतून आमच्या सध्याच्या प्राकृत बोलींचा जन्म झालेला आहे. आमचे देव देववाणीमध्यें म्हणजेच संस्कृतमध्यें बोलत. आमच्या ऋषींनीं संस्कृतांत आपली विचार संपत्ति साठविली, आणि आमच्या कवींनीं संस्कृतात काव्यें रचली. आमच्यामध्ये जो जो काहीं अत्युत्तम विचार, अत्युत्तम कल्पना किंवा अत्युत्तम काव्यचरण आहे तो तो सर्व, आपोआपच संस्कृतांतून प्रकटलेला आहे. लाखों लोकाना अद्यापहि ती देवभाषाच आहे; दुसऱ्यांना ती त्याच्या पूर्वजाची भाषा वाटते, तर एकदरींत सर्वांना, ती सर्वश्रेष्ठ भाषासम्राज्ञी होऊन राहिली आहे. ही आपली सर्वांची पिढिजात मत्ता आणि अमूल्य असा ठेवा आहे. हिच्याच शब्दसंपत्तींतून गुजराथी, आणि गुरुमुखी, सिंधी आणि हिंदी, तामिळ आणि तेलगू, महाराष्ट्री आणि मल्यालम्, बंगाली आणि सिंघाली आदि प्राकृत भाषाभगिनींचे संसार थाटले आहेत. संस्कृत ही आमच्या सर्व भावभावनाना आणि आशाआकांक्षाना एक प्रकारचें प्रमाणबद्ध सुसंवादित्व प्राप्त करून देऊन, त्याच्यात चैतन्य निर्माण करणारी अंतस्थ अशी महत्त्वाची ज्ञानवाहिनीच आहे. ती नुसती केवळ एक भाषा नव्हे. अनेक हिंदूंना ती मंत्राप्रमाणें भारते, तर सर्वांनाच ती संगीताप्रमाणें मोहविते.

## हिंदूंचीं वाङ्मय संपत्ति

वेद हे कांहीं जैनांचे प्रमाणभूत ग्रंथ होऊं शकत नाहींत. परंतु आपल्या जातीचे सर्वांत प्राचीन असे इतिहास ग्रंथ म्हणून वेद हे आपल्याप्रमाणेंच, जैनाचेहि आहेत. आदिपुराण हें काहीं कोण्या सनातन्यानें लिहिलेलें नाहीं तरीहि, आदीपुराण हें सनातन्याचें आणि जैनाचें दोघाचेहि आहे. बसवपुराण हा लिंगायतांचा वेद; परंतु तें लिंगायत आणि लिंगायतेतर या साऱ्या हिंदूंचेंच आहे. कानडींतील सर्वांत जुनें आणि ऐतिहासिक दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें असें उपलब्ध वाङ्मय तेंच आहे. गुरुगोविंदांनीं लिहिलेलें विचित्र-नाटक ही खरी बंगाल्यांतील हिंदूंना आपली वाटणारी वाङ्मयसंपत्ति आहे आणि त्याच नात्यानें चैतन्य चरित्रामृताचें मोल शीखांनाहि अधिक आहे. कालीदास आणि भवभूति, चरक[१] आणि सुश्रुत,[२] आर्यभट्ट[३] आणि वराह-मिहिर[४] भास आणि अश्वघोष[५] जयदेव[६] आणि जगन्नाथ[७] यानीं आपणांसाठीं लिहिलें. आपल्याला त्यांचें वाङ्मय आनदवितें. आपणां सर्वांना त्यांचें वाङ्मय अमूल्य ठेव्याप्रमाणेंच आहे. तामिळ कवि कंब आणि हाफीस[८] या दोघांचें काव्य जर बंगाली हिंदूपुढें एकाचवेळीं ठेवलें आणि त्यास प्रश्न केला कीं, " यापैकीं तुझें कोणतें ? " तर त्याच्या तोंडातून असे सहजोद्गार

---

१. वैद्यशास्त्र विषयाचा प्राचीन आचार्य.

२. खि. ५ व्या शतकांत लिहिलेला एक वैद्यक ग्रंथ व त्याचा कर्ता.

३. २३०० वर्षांपूर्वी होऊन गेलेला प्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ. यानें लिहिलेल्या आर्यसिद्धान्तांत पृथ्वीच सूर्याभोंवतीं फिरत असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे.

४. विक्रम सभेंतील आठवें पंडित रत्न. हा मोठा सिद्धान्ति ज्योतिषी होता. यानें ज्योतिष विषयावर तीन ग्रंथ लिहिले आहेत.

५. बुद्ध चरित्राचा कर्ता. कवि व पहिला संस्कृत नाट्यरचनाकार.

६. गीतगोविंद या शृंगारिक नि भक्तिपर काव्याचा कर्ता.

७. शहाजहानच्या पदरचा ख्यातनाम कवि. गंगालहरीचा कर्ता. यानें शहाजहानाच्या लवंगी या राजकन्येशीं विवाह केला होता. ८. फारसी महाकवि.

निघतील की, "कंच कवि माझा!" रविंद्रनाथ आणि शेक्सपियर या दोघांचें वाङ्मय महाराष्ट्रीय हिंदूपुढें ठेवलें तर तो ठासून सांगेल कीं, "रवींद्र! रवींद्र, माझा आहे"

## कला आणि कलाशिल्प

कला आणि कलांशिल्पाचीं कामें हीं सुद्धां आमच्या जातीची समान मत्ता आहे; मग त्या कला आणि तें शिल्प कोणत्याहि वैदिक किंवा अवैदिक धर्ममताचे असो. कारण, कलाकौशल्यांचें ते आदर्श निर्माण करण्यासाठीं जे शिल्पी कारागीर खपले, ज्या तज्ञानीं त्यांचें दिग्दर्शन केलें, ज्यानीं कराच्या रूपानें ते उभारण्यास द्रव्य साहाय्य दिलें, आणि ज्या राजानीं आपल्या प्रेरणेनें ते सर्व शिल्प घडवून आणलें, ते सारेजण वैदिक असोत वा अवैदिक असोत, याच आसिंधुसिंधुपर्यंता भूमींत निवसत आलेल्या महान् जातीपैकीं–हिंदु जातीपैकींच–होते. जे आज सनातनी म्हणून आहेत त्यांनीं त्या काळाच्या बौद्धस्तूपांचीं आणि कलाशिल्पांचीं कामें स्वतः खपून आणि द्रव्य देऊन पुरीं केलेली आहेत; तर त्यावेळीं जे बौद्ध होते, त्यानीं सध्यांच्या सनातनींचीं मंदिरास्मारकाचीं आणि इतर कलाकौशल्याचीं कामें द्रव्य आणि प्रत्यक्ष श्रम देऊन उभारून दिली आहेत.

## हिंदु निर्बंध–विधान

बारीक सारीक गोष्टींत जरी इकडे तिकडे थोडेफार मतभेद असले, तरी ज्या चालीरीती आणि समाज नियमनाचे निर्तिनिर्बंध आपण सर्वांना समान आहेत, तेच आपल्या जातीचे जें मुळांतले एकत्व नि ऐक्य आहे त्यांचें कार्य नि कारण दोन्हींहि आहेत. हिंदुधर्म शास्त्राच्याच मूलभूत पायावर आधारलेल्या हिंदूच्या निर्बंध–विधाना ( Hindu law ) संबंधीं कितीहि किरकोळ मतभेद असले आणि इथे तिथें त्यांत कितीहि परस्पर विरोधी अशी एखादी गोष्ट किंवा आज्ञा ग्रथित करण्यांत आली असली तरी, त्याची रचाई इतक्या पद्धतशीरपणें झाली आहे कीं बदलत्या काल प्रवाहातहि त्याचें वैशिष्ट्य ठळकपणें टिकून राहील. अमेरिकेंतील निरनिराळ्या संस्थानांमध्यें व ब्रिटिश लोकसत्ताक राज्यांत, नवीन नवीन निर्बंध

विधानाचें ( कायद्याचें ) उत्पादन आणि त्याची साफसुफी करण्यासाठीं, कायदे करणारी यंत्रें जरी कितीहि प्रचंड वेगानें धडधडत असली, तरी व्यवहार नीतीची धर्मशास्त्रानें घालून दिलेलीं तत्त्वें, आणि ज्या पद्धतीनें त्याची वाढ होऊन आमचें संपूर्ण असे निर्बंध-विधान बनतें ती पद्धत, आम्हीं आजसुद्धा स्वीकारीत असतों. सनातन सादृश्य आणि अगदीं मुळातला सारखेपणा हाच विचारांत घ्यायचा म्हटलें तर इंग्लिश निर्बंध-विधान हें अमूक, तें तमूक असे निरनिराळे वैशिष्ट्यदर्शक शब्दच वापरता येणार नाहींत. इतर मुसलमान जातींप्रमाणेंच कांहीं कांहीं प्रकरणीं—विशेषत: वारसा अधिकारांच्या संबंधात—हिंदुनिर्बंध विधानाचा आश्रय घेणारे खोजे किंवा बोहरी याचे तुरळक आणि घातक अपवाद असूनहि मुसलमानी कायद्यानें आपलें स्वतंत्र वैशिष्ट्य टिकविलें आहे. महाराष्ट्रांतील किंवा पंजाबातील हिंदूंच्या चालीरीतींत, बंगालच्या किंवा सिंधच्या हिंदूंच्या चालीरीतींपेक्षा थोडाफार बदल असू शकेल. परंतु इतर लहानसहान गोष्टींतहि इतका कमालीचा सारखेपणा आहे कीं, महाराष्ट्रांतील रूढ नीतिव्यवहार जणु कांहीं बंगाल किंवा सिंधमधील व्यवहार-निर्बंध शास्त्रानुसारच होताहेत किंवा सिंध बंगालमधील व्यवहार महाराष्ट्राप्रमाणेंच होत आहेत असें वाटावें. आपल्या कोणत्याहि एका जातीचे आचार, विचार, रूढी नि चालीरीति याचा एकत्र संग्रह केला तर आपल्या सबंध हिंदु नीति—व्यवहार—न्याय—शास्त्रांतील तें एक सुटें व सलग असे एक प्रकरण असल्याच तत्काळ दिसून येईल. परंतु त्याजबरोबर इंग्रजी किंवा मुसलमानी किंवा जपानी निर्बंध विधानात जर तें प्रकरण घुसडून द्यावयाचें म्हटलें तर, वाटेल ती धडपड करून वा वाटेल तेवढी अक्कल चालवूनहि तें साधणें अशक्य एवढें मात्र निश्चित !

## सण आणि यात्रा महोत्सव

आमचे सर्वांचे सण आणि उत्सव एकच आहेत. आमचे धार्मिक संस्कार आणि धार्मिक आचारहि एकच आहेत. जिथे जिथें हिंदु म्हणून राहात आहेत त्या त्या सर्वांना, दसरा आणि दिवाळी, राखीबंधन आणि होळी, हे सण अत्यानंदाचे वाटतात. शीख आणि जैन, ब्राह्मण आणि पंचम हे धरून सारे हिंदु जगत्, दिवाळीला आनंदोत्सवांत बुडून गेलेलें असतें.

हें हिंदुस्थानातच नव्हे तर जगावरील दुसऱ्या खंडांतहि ज्या ठिकाणीं बृहत्तर भारताची वाढ झपाट्यानें होत आहे त्या बृहत्तर हिंदुस्थानातहि दिसून येते. तराईच्या जंगलांत अशी एकहि झोंपडी सांपडणार नाहीं कीं, जिनें आपली इवलीशी पणती त्या रात्रीं पेटवून बाहेर ठेवली नाहीं! राखीच्या दिवशीं आपल्याला दिसून येईल कीं पंजाबमधील अल्लड आनंदी तरुणींपासून ते मद्रासच्या स्नानसंध्याशील कर्मठ ब्राह्मणापर्यंत प्रत्येक हिंदु, 'एक देश एक भगवान्, एक जाति एक मनःप्राण। भाई भाई एक ठायीं, भेद नाहीं भेद नाहीं॥' या भावनेनें रेशमी राखी बांधून घेत आहे. तरी हिंदूमधील ज्या सर्वसाधारण धार्मिक समजुती आहेत त्याचा आम्ही जाणून बुजून उल्लेख अद्याप केलेला नाहीं. पण इतकेंच काय आतापर्यंत धार्मिक स्वरूपाच्या किंवा अर्थाच्या अशा कोणत्याहि चालींचा, प्रसंगाचा किंवा संस्थांचाहि आम्ही उल्लेख केलेला नाहीं. कारण हिंदुत्वाच्या प्रमुख लक्षणाचा विचार, आम्हाला कोणत्याहि धर्ममतांना अनुसरून नव्हे तर जातीय दृष्टिकोनातूनच करावयाचा होता. आणि तरीसुद्धां, राष्ट्रीय आणि जातीय दृष्टीनेहि निरनिराळीं तीर्थक्षेत्रें आणि तेथें भरणाऱ्या यात्रा याहि, हिंदु जातीची परंपरागत मत्ताच आहेत. जगन्नाथाचा रथयात्रा महोत्सव, अमृतसरची वैशाखी, कुंभ आणि अर्धकुंभ या आमच्या महायात्रा म्हणजे आमच्या राष्ट्रदेहात जिवन्तपणा आणि विचार याचा सतत प्रवाह चालू ठेवणारीं खरोखुरीं आणि चालतीं बोलतीं विराट् अशी राष्ट्रीय संमेलनेंच आहेत. या यात्रा मेळाव्यातून ज्या लोकविलक्षण चाली, नाना समारंभ आणि संस्कार दिसून येतात त्यात कांहींजण आवश्यक धार्मिक कर्तव्य म्हणून, तर दुसरे इतर उत्सवप्रिय लोक जनसमाजात नाचाबागडायला मिळावें म्हणून, भाग घेतात. परंतु, त्यातील प्रत्येक व्यक्तीच्या मनावर त्यामुळेंच ही गोष्ट ठसविली जाते कीं, आपल्याला जर उत्तम तऱ्हेनें जीवितयात्रा पार पाडावयाची असेल तर ती केवळ हिंदु जातीच्या समायिक आणि सामुदायिक जीवनाशीं समरस होऊनच पार पाडतां येईल!

हा एकंदरीनें थोडक्यात आमच्या संस्कृतीचा गाभा आहे आणि त्यामुळेंच आमची अशी स्वतंत्र संस्कृति म्हणून ओळखली जाते. थोडक्यात म्हणण्याचें कारण असें कीं, या संबधीं समग्र विचार करणें आमच्या

हातीं असलेल्या चालू विषयामुळें आम्हांला अशक्य आहे. आम्ही हिंदु, हें केवळ राष्ट्र नाहीं आहोंत; जाति आहोंत! परंतु या दोन्हींमुळेंच आम्हाला समान अशी संस्कृति आहे. या संस्कृतीचा आविष्कार आणि संरक्षण अगदीं पहिल्यानें आणि प्रामुख्यानेंच—आमच्या जातीच्या खऱ्या मातृभाषेनेंच—केलेलें आहे. जो जो म्हणून हिंदु आहे तो तो प्रत्येकजण ह्या संस्कृतीचा वारस घेऊनच जन्मतो. आणि ज्याप्रमाणें आपल्या या भूमीपासून व पूर्वजाच्या रक्तापासून त्याचा देहपिंड अस्तित्वात येतो त्याच-प्रमाणें, त्याचा मनःपिंडहि खऱ्या अर्थानें याच सस्कृतीनें बनलेला असतो.

## हिंदुत्वाचें तिसरें प्रमुख लक्षण

म्हणून, हिंदु तो, की ज्याला सिंधूपासन समुद्रापर्यंत पसरलेली ही भूमि आपली पितृभूमि म्हणून अत्यंत प्रिय अशी वाटते. वैदिक सप्त-सिंधूंच्या हिमालयीन उच्च प्रदेशांमध्यें जिच्या प्रारंभाचा पहिला ठळक असा पुरावा सापडतो, आणि नवीन प्रदेश आक्रमीत पुढें जात असतां ज्याचा ज्याचा तिनें स्वीकार केला ते ते सर्व आपल्यांत समाविष्ट करून व जे जे समाविष्ट नि आत्मसात् केले ते ते परमोत्कर्षाला पोंचवून जी जाति पुढें 'हिंदु जाति' या नांवानें भरभराटली, त्या महान् जातीचें रक्तच या हिंदु नावाला पात्र ठरणाऱ्या माणसाच्या अंगांत खेळत असते. आणि शेवटीं हिंदूचें तिसरें लक्षण म्हणजे, समान इतिहास, समान वाङ्मय, समान कला, एकच निर्बंध विधान, एकच धर्मव्यवहारशास्त्र, समायिक यात्रा महोत्सव, समायिक धार्मिक आचारविधि, समायिक सण आणि समायिक संस्कार, एवंगुण विशिष्ट अशी जी हिंदु संस्कृति ती त्यास आपली वाटणें हे होय. आता सस्कृतीसंबंधींची वरील सर्व लक्षणें अगदीं काटेकोर-पणानें प्रत्येक हिंदूच्या ठिकाणीं सापडलीच पाहिजेत असें नाहीं; परंतु त्याच्यामध्यें आणि त्याच्या इतर हिंदु बांधवामध्यें, अरब किंवा इंग्लिश माणसापेक्षा अधिक साम्य निश्चितच सांपडेल! त्याचबरोबर हिंदुत्वाची वरील लक्षणें हिंदूप्रमाणें एखाद्या अहिंदूत सापडणारच नाहींत असे नाहीं, परंतु तरीहि हिंदूंत आणि त्यांच्यात सारखेपणापेक्षां वेगळेपणाचाच भाग जास्त असल्याचें आढळेल. आणि म्हणूनच ज्या ख्रिश्चन आणि मुसलमान

जमाती अगदीं परवापरवापर्यंत हिंदूच होत्या आणि धर्मांतरित अवस्थेच्या पहिल्या पिढींत ज्या अत्यंत दुःखी आणि नाराज असें धार्मिक जीवन कंठीत होत्या, त्या मुसलमान नि ख्रिश्चन जातींना हिंदु जातीच्या शुद्ध रक्तावर आणि समान पितृभूमीवर खऱ्याखुऱ्या अर्थानें जरी आपला वारसा सांगता येत असला तरीहि त्यांना हिंदु म्हणून कधींच म्हणवून घेतां येणार नाहीं. कारण हेंच कीं, ज्या दिवशीं त्यांचा त्यांच्यावर लादलेल्या नवीन धर्मांशीं प्रत्यक्ष संबंध आला त्याच दिवशीं त्या जाति हिंदुसंस्कृतीच्या समायिक वारश्याला मुकल्या. हिंदूंच्यापेक्षा सर्वस्वीं निराळी अशी त्यांची संस्कृति आहे किंवा तशी ती असल्याचें त्यांना तरी वाटतें. त्यांचे आदर्श वीर आणि त्यांचीं त्या वीरांविषयींची भक्तिभावना, त्यांचे उत्सव आणि त्यांच्या यात्रा, त्यांची ध्येयें आणि त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन, यामध्यें आणि आमच्या कल्पनामध्यें कोणत्याहि प्रकारचें साम्य आता राहिलेलें नाहीं. परंतु ज्यामुळें प्रत्येक हिंदु हा आपल्या जातिविशिष्ट संस्कृतीवर असामान्य प्रेम आणि नितान्त भक्तिभाव दाखवितो, त्या ह्या हिंदुत्वाच्या अत्यंत प्रमुख नि आवश्यक लक्षणामुळें, कोणतीहि अतिभोंगळ किंवा फार कांटेकोर विशेषणें न योजताहि, हिंदुत्वाचें अचूक स्वरूप निश्चित करणें आपणाला शक्य होतें.

## बोहरी व खोजे यांना 'हिंदु' म्हणतां येईल कां ?

आता आपल्या येथें राहाणाऱ्या देशप्रेमी खोजा किंवा बोहरी माणसाचें उदाहरण आपण विचारात घेऊं. या हिंदुस्थानवर तो पितृभूमि म्हणून प्रेम करतो; कारण निर्विवादपणें ही त्याच्या पुण्यपूर्वजाची भूमि आहेच. त्याच्यामध्यें—आणि कांहीं कांहीं उदाहरणात तर निश्चितच—शुद्ध हिंदुरक्तच खेळत असतें. आणि विशेषतः मुसलमानी धर्मांत त्याच्या पिढींत तोच प्रथम गेला असेल तर त्याच्यामध्यें हिंदु आईबापाचेंच रक्त असतें हें मान्य केलें पाहिजे. समंजस आणि ज्ञात्या माणसाप्रमाणें तोहि आपल्या हिंदु इतिहासावर आणि ऐतिहासिक वीर पुरुषावर प्रेम करतो. खरें पाहता बोहरी आणि खोजे लोक आमच्याच दशावताराची,—त्यात एक अकराव्या महम्मदाची तेवढी भर घालून—देव म्हणून पूजा करितात. तो बोहरी वा खोजा त्याच्या सबंध जातीप्रमाणेंच, त्याच्याच पूर्वजाचें असलेलें हिंदु निर्बंध-

विधानच प्रमाण मानतो. तेव्हां राष्ट्र, जाति आणि संस्कृति या तीन आवश्यक लक्षणांचा विचार करता तो हिंदूच म्हटला पाहिजे. त्याचे व आमचे कांहीं सण नि उत्सव निराळे असतील, किंवा त्याच्या सत्पुरुषांच्या आणि देवदेवताच्या मालिकेंत तो आणखी एक दोन देवांना वा अवतारांना नेऊन बसवीत असेल. परंतु आम्हीं पूर्वी अनेकदा सांगितल्याप्रमाणें इथें तिथें कांहीं एक दोन मतभेद असले तरी त्यामुळें कांहीं केवळ आपण हिंदु संस्कृतीच्या गोटांतून बाहेर टाकलें जात नाहीं. हिंदूंमधल्या काहीं पोटजातींमध्यें दुसऱ्या हिंदु पोटजातींपेक्षा अगदीं निराळ्या तर काहीं वेळेला परस्परविरुद्ध अशा चालीरीती असल्याचें आढळतें. तरीहि त्या सर्व हिंदु पोटजाति, हिंदूच असतात. तेव्हा वर उल्लेखिलेली हिंदुत्वाचीं तीन आवश्यक लक्षणें ज्याच्या ठिकाणीं ठळकपणें दिसून येतील त्या स्वदेशप्रेमी खोजाला, खिश्चनाला किंवा बोहऱ्याला हिंदु म्हणून समजण्यास मग कोणता प्रत्यवाय आहे!

खरोखर त्याला त्या अर्थानें हिंदु समजण्यांत कोणताच प्रत्यवाय नाहीं. परंतु हिंदुत्वाच्या एका लक्षणासंबंधीं त्याची जी वागणूक, जो दृष्टिकोन आहे त्यामुळेंच त्याला हिंदु म्हणता येणार नाहीं. कारण हें लक्षण जरी संस्कृति या शब्दाच्या पोटातच सामावणारें असलें तरी इतर अनेक विशेषणाच्या गोमकाल्यांत त्याच्याकडे कानाडोळा करण्याइतकें तें दुर्लक्षणीय नाहीं; म्हणजेच विचाराच्या दृष्टीनें तें फार महत्त्वाचें आहे. आणि म्हणून त्याचें स्वतंत्र विवेचन आणि चिकित्सा करावयास हवी. आणि हें करतांना आपणाला हिंदुत्वाच्या धार्मिक स्वरूपाच्या प्रश्नाची धिटाईनें चर्चा करणें क्रमप्राप्त आहे. आतांपर्यंत अशा प्रकारची चर्चा आम्ही केली नाहीं याचें कारण आम्हाला तसें करण्याचें धारिष्ट झालें नाहीं हें नसून त्या प्रश्नाचा सागोपांग आणि परिणामकारक निर्णय एकदाचा लावून टाकण्याचा आमचा निश्चय आहे हें होय. कारण, हिंदुत्व आणि हिंदुधर्म या दोन शब्दांचे महत्त्व व त्यानीं व्यक्तविला जाणारा अर्थ निश्चित करून त्या शब्दांची संपूर्ण छाननी करण्यास आवश्यक ती सर्व साधनसामुग्री आता आपणांस पाठीमागील संशोधन चिकित्सेनंतर प्राप्त झालेली आहे असें म्हणावयास कोणताच प्रत्यवाय दिसत नाहीं.

## ६

## हिंदुधर्मावरून 'हिंदू'ची व्याख्या करणें अयोग्य

हिंदुत्व आणि हिंदुधर्म हे दोन्हीहि शब्द हिंदु याच शब्दापासून निघालेले असल्यामुळें त्यांचा अर्थ सारी हिंदु जात असाच घेणें अवश्य आहे. हिंदुधर्माच्या ज्या कोणत्या व्याख्येप्रमाणें आपल्या जातींतील एखादा महत्त्वाचा गटच तींतून वगळलला जात असेल किंवा जी स्वीकारल्यानें त्यांतील लोकांना आपले श्रद्धाविषय सोडून देण्यास भाग पडत असेल किंवा त्याना हिंदुत्वाबाहेरच लोटून दिलें जात असेल, तर ती व्याख्याच मुळांत धिक्काराई ठरते. हिंदुधर्म म्हणजे हिंदु लोकांमध्यें मानलीं जाणारीं निरनिराळीं धर्ममतें. आणि हिंदूंचीं तीं निरनिराळीं धर्ममतें कोणतीं,–म्हणजेच हिंदुधर्म म्हणजे काय–हें निश्चित करण्याचा एकच मार्ग तो हा कीं, प्रथम 'हिंदु' या शब्दाची व्याख्या निश्चित करणें. परंतु हिंदूंच्या अगदीं स्वतंत्र अशा निरनिराळ्या धार्मिक समजुती, एवढाच अर्थ ज्यांत आधींपासूनच अभिप्रेत आहे, त्या हिंदुधर्म ह्या शब्दानें दर्शविला जाणारा तो महत्वाचा अर्थ तेवढा दृष्टीआड करून हिंदुधर्माची आवश्यक लक्षणें ठरविण्याचा जे लोक प्रयत्न करतात त्याना कोणतीं लक्षणें आवश्यक म्हणून गणावीं याचाच संभ्रम पडतो. कारण त्यांनीं आवश्यक ठरविलेल्या लक्षणाच्या साहाय्यानें त्यांना सर्व हिंदु जातींचा समावेश एका हिंदु या शब्दांत करता येत नाहीं, व या गोष्टीमुळें त्याचे स्वतःचेहि समाधान न होतां चिडून जाऊन, त्या जाति हिंदूच नव्हेत असा निष्कर्ष काढण्यापर्यंत त्यांची मजल जाते. याचें कारण म्हणजे त्या जातींचा समावेश न होण्याइतका अव्याप्तीचा दोष त्याच्या व्याख्येला चिकटलेला असतो हें नसून, ज्या कांहीं तत्त्वांना या सद्गृहस्थांनीं सारा 'हिंदुधर्म' समजावयाचें असें ठरविलेलें असतें, तीं तत्त्वें त्या जाति पाळत नाहींत किंवा त्यांना तीं अमान्य असतात हेंच तें खरें कारण असतें. म्हणून 'हिंदु कोण' या प्रश्नाचें उत्तर देण्याची ही तऱ्हा अगदींच विपरीत अशी आहे आणि त्यामुळेंच शीख, जैन, देवसमाजीसारख्या आपल्या अवैदिक धर्ममतांच्या बांधवांमध्यें, त्याचप्रमाणें प्रागतिक आणि देशप्रेमी

आर्यसमाजी बांधवामध्येंहि एक प्रकारचा कडवट दुजाभाव निर्माण झाला आहे.

## हिंदु कुणाला म्हणावयाचें ?

" हिंदु कुणाला म्हणावयाचें ? "— तर हिंदुधर्माची तत्त्वें जो मानतो त्याला ! बरें; आता 'हिंदुधर्म' म्हणजे तरी कशाला म्हणावयाचे ? तर ज्या तत्त्वांना हिंदु लोक प्रमाण मानतात त्याना. परंतु हे बोलणें म्हणजे उलट सुलट तेंच तेंच नि कधीं न संपणारें वादंग माजविण्यापैकींच आहे; व यामुळें याचा समाधानकारक निर्णय तर कधींच लागणार नाहीं. असल्या या आडवटेनें जाणाऱ्या आमच्या पुष्कळ मित्राना, पुन्हा परत पूर्वीच्याच ठिकाणीं येऊन आम्हाला सागण्याची पाळी आली आहे कीं " हिंदु म्हणून कोणी लोकच जगाच्या पाठीवर नाहींत ! " ज्यानें 'हिंदुइझम' हा शब्द ( हिंदुधर्म या अर्थी ) पहिल्यानें प्रचारांत आणला त्या महाविद्वान् इंग्लिश गृहस्थांप्रमाणें एखाद्या हिंदी माणसानें 'इंग्लिशिझम' हा शब्द बनवून जर तो इंग्लिशाच्यामध्यें रूढ असलेल्या धार्मिक समजुतींच्या बुडाशीं काहीं ऐक्य शोधूं लागला तर ज्यूपासून जॅकोबिनूस[१] पर्यंत आणि ट्रिनिटीचें[२] तत्त्व मानणाऱ्यापासून ते उपयुक्ततावाद्यांपर्यंत त्याला इतके पंथापपथ आणि जाति पोट जाती आढळून येतील कीं कंटाळून जाऊन त्राग्यानें तो उद्गारेल " इंग्लिश म्हणून कोणी लोकहि या जगाच्या पाठीवर नाहींत ! " आणि या त्याच्या बोलण्यानें "या जगावर हिंदु म्हणून कोणी लोक नाहींत" असें अगतिकपणें सांगून टाकणाऱ्या माणसापेक्षा कमी हास्यापद तो मुळींच ठरणार नाहीं ! या विषयासंबधीं विचारांचा किती घोंटाळा माज-लेला आहे आणि हिंदुत्व आणि हिंदुधर्म या दोन शब्दांचें वेगवेगळें पृथःकरण करण्यांत यश न आल्यानें त्या घोटाळ्यांत आणखी भर कशी पडली

---

१. फ्रान्समध्यें प्रस्थापित झालेल्या एका पंथाचे अनुयायी. दहशतवादी क्रांतिकारकांना जॅकोबिनच म्हणतात.

२. Union of three persons ( Father, son, Holy Spirit ) in one God head. ख्रिश्चन धर्मातील देवत्रितयाचें तत्त्व.

आहे याचें प्रत्यंतर पाहावयाचें असेल तर 'नटेसन आणि कंपनी'नें प्रसिद्ध केलेले "Essentials of Hinduism" (हिंदु धर्माचीं मूलतत्त्वें) हें छोटें पुस्तक वाचून पहावें.

## हिंदु धर्मांत अनेक धर्मपद्धति सामावतात

हिंदुधर्म म्हणजे हिंदूंचा धर्म; आणि ज्याअर्थी सिंधु शब्दापासून निर्माण झालेल्या हिंदु या शब्दाचा मूळ अर्थ, सिंधूपासून सिंधू पर्यंत-म्हणजे समुद्रापर्यंत-पसरलेल्या या भूमींत राहणारे लोक असा होतो त्याअर्थी जो धर्म किंवा जे धर्म विशेषपणें नि प्रथमपासून या भूमीचे आणि येथील लोकांचे म्हणून आहेत, तोच किंवा ते धर्म म्हणजेच हिंदुधर्म होय. जर आपणाला हीं निरनिराळीं तत्त्वें आणि समजूतीं एका धर्म पद्धतींत आणून गोंविता येत नसतील तर एकच एक मार्ग म्हणजे हिंदुधर्म या नावाची एकच धर्मपद्धत किंवा एकच धर्ममत आहे असें न समजता त्या ठिकाणीं एकमेकाला जुळत्या, किंवा परस्पर विरुद्ध-किंवा उलटसुलट सुद्धां-पण अशा अनेक धर्मपद्धति किंवा मतें आहेत असे समजणें हाच होय. परतु हिंदुधर्माची व्याख्या निश्चित करण्यात तुम्हाला अपयश आले म्हणून, त्यामुळें कोणत्याहि कारणानें हिंदुराष्ट्राचें अस्तित्वच तुम्हांला नाकारता येणार नाहीं, किंवा याहीपेक्षां अधिक घातुक अशी गोष्ट म्हणजे आमच्या वेदिक आणि अवैदिक हिंदु बांधवाच्या भावना दुखवून त्यांच्यापैकीं काहींना अहिंदु ठरवून दूर लोटण्याचें अपवित्र कृत्यहि तुम्हाला करता यावयाचें नाहीं.

## वैदिक धर्मालाच हिंदुधर्म समजण्याची गल्लत

या प्रबंधाच्या मर्यादा लक्षांत घेतां हिंदुधर्माचीं आवश्यक लक्षणें कोणतीं या विषयींची समग्र चर्चा किंवा सागोपांग विवेचन आम्हांस येथें करता येणार नाहीं. वर आम्हीं आधींच सांगितल्याप्रमाणें 'हिंदुधर्म म्हणजे काय?' या प्रश्नाची खरी चर्चा तेंव्हांच आपणांस करतां येईल कीं जेंव्हां आपण हिंदुत्वाचीं सर्व आवश्यक लक्षणें निश्चित करून 'हिंदु कोण' या प्रश्नाचें उत्तर अचूकरीतीनें देऊं शकूं. आणि 'हिंदु कोण' याचें उत्तर निश्चितपणें ज्यांमुळें आम्हांला सापडणार आहे त्या हिंदुत्वाच्या प्रमुख नि आवश्यक

लक्षणांचाच विचार प्रस्तुत स्थळीं आम्हास कर्तव्य असल्यामुळें आपोआपच हिंदुधर्माच्या स्वरूपाविषयींची कोणतीहि चर्चा आमच्या सध्याच्या कक्षेत येत नाहीं. आमच्या सध्यांच्या विषयांत त्याचा जितका संबंध येईल तितक्यापुरताच आम्ही त्याचा विचार करू इतकेंच. हिंदुधर्म हा शब्द, असा आहे कीं, हिंदु लोकांतील निरनिराळ्या जाति–पोटजातींचे जे निरनिराळे पंथ, मते किंवा धार्मिक समजुती आहेत त्या त्या सर्वांचा त्यात समावेश करण्यात आला पाहिजे. परंतु सर्वसाधारणपणें हिंदु धर्म हा शब्द हिंदूंतील बहुसंख्य लोकांनी मानलेली जी धर्मपद्धति तीसच लावण्यांत येत असतो. अ ता, हें अगदीं साहजिक असेंच आहे कीं, धर्माला किंवा देशाला किंवा जातीला जे नाव प्राप्त होत असतें ते त्या धर्माच्या, देशाच्या किंवा जातीच्या उत्कर्षाला कारणीभूत होणाऱ्या किंवा त्यात निर्विवादपणें बहुसंख्याक असलेल्या लोकांच्या वैशिष्ट्यावरूनच होत असतें. आणि हें नाव संभाषणांत किंवा संदर्भोल्लेखाच्या दृष्टिनेंहि अत्यंत सोयीचें असेंच ठरतें. परंतु हें सोयीस्कर नांव जर तें केवळ भ्रामकच नव्हे तर उघडउघड हानिकारक आणि निश्चितपणें दिशाभूल करणारे असेल, तर आपली विवेकबुद्धी त्यामुळें इत: पर आंधळी होणार नाहीं अशी दक्षता आपणांस घेतली पाहिजे. हिंदूंमधील बहुसंख्य लोक जी धर्मपद्धति शिरोधार्य मानतात, तिचें वैशिष्ट्य संपूर्णपणें दाखविणाऱ्या अशा योग्य नांवानें जर तिचा निर्देश करावयाचा म्हटलें तर तिला 'श्रुतिस्मृति पुराणोक्त' धर्म किंवा 'सनातन धर्म' हेंच नाव अधिक सार्थ ठरेल. किंवा तिला 'वैदिक धर्म' म्हणूनहि कोणी म्हटलें तरीहि त्यावर कोणाचा आक्षेप येणार नाहीं. परंतु या बहुसंख्य हिंदु लोकांव्यतिरिक्त, दुसरे असे किती तरी इतर हिंदु आहेत कीं, ज्याना अंशतः किंवा संपूर्णपणेंच, कुणाला पुराणाचें तर कुणाला स्मृतींचे तर कुणाला प्रत्यक्ष श्रुतींचेच प्रामाण्य अमान्य असतें. परंतु बहुसंख्य हिंदूंचा धर्म म्हणजेच यच्चयावत् सर्व हिंदूंचा धर्म असें समजून जर तुम्ही त्यालाच केवळ खरा हिंदुधर्म म्हणून संबोधूं लागाल, तर हिंदूच असलेल्या आपल्या अन्य धार्मिक मतें धारण करणाऱ्या बांधवाना, बहुसंख्याकानीं केलेल्या हिंदुत्वाच्या या अपहरणाविषयीं व हिंदुत्वाबाहेर आपणास लोटणाऱ्या त्यांच्या अन्याय्य कृत्याविषयीं राग येणें अगदीं रास्त आहे. अल्पसंख्य झाले म्हणून काय झालें, पण त्यांच्याहि धर्माला काहीं नाव

हें पाहिजेच ना! परंतु तुम्ही त्या तथाकथित सनातन धर्मालाच जर एकमेव हिंदुधर्म म्हणूं लागला तर त्यावरून साहजिकच असें म्हणावें लागेल कीं, तदितर अन्यमतें बाळगणाऱ्या लोकांच्या नवमतवादी धर्मांना हिंदुधर्म म्हणतांच येणार नाहीं. आणि याच्या पुढची येणारी पायरी म्हणजे ते हिंदूच नव्हेत असें म्हणण्यांपर्यंत मजल जावयाची हीच होय! परंतु पूर्वीच्या (दुष्ट) तर्काला ज्यांना नाकें मुरडत कां होईना पण सर्वतोपरी पाठिंबा देण्यावांचून दुसरा मार्ग राहिला नव्हता व ज्यांना तो मान्य करणें तर महत्संकट वाटत होतें परंतु त्यांतून सुटका कशी करून घ्यावयाची याचा ज्यांच्यापुढें पेच येऊन पडला होता, त्यानाहि या निष्कर्षानें चांगलेंच चक्करल्यावांचून राहणार नाहीं. आणि यामुळेंच आपणांला असें अनुभवास येतें कीं, जरी आमच्या लक्षावधि शीख, जैन, लिंगायत आणि कित्येक निरनिराळ्या समाजी बाधवांना, त्याच्या पूर्वजांच्या पूर्वजांमध्यें गेल्या दहा पिढ्यापर्यंत हिंदुजातीचेंच रक्त खेळत असूनहि एकाएकीं हिंदु या नावाला मुकावें लागल्यामुळें अतिशय दुःख होतें, तरीहि त्यांच्यापैकीं कितीतरी लोकांची मात्र निश्चितपणें अशीच समजूत झाली आहे कीं, एकतर ज्या चालीरीति आणि समजुति आपण आपल्या पूर्वीच्या प्रागतिक आणि नवमतवादी उत्साहाच्या भरांत, भोळया आणि वेडगळ म्हणून सोडून दिल्या होत्या त्या तरी आपण पुन्हा स्वीकारल्या पाहिजेत नाहींतर आपले पूर्वज ज्या जातींत जन्माला आले त्या जातीला तरी सदाचे अंतरळे पाहिजे.

## सर्व हिंदु एका ध्वजाखालीं गोळा होतील

हा सर्व दुजाभाव आणि कडवटपणा पुष्कळच अंशीं, हिंदुधर्म या शब्दाचा, बहुसंख्य लोकाचा धर्म या अर्थी जो दुरुपयोग करण्यात आला त्यामुळेंच निर्माण झाला आहे. एकतर, 'सर्व हिंदूंचे विविध धर्म' या खऱ्या अर्थी तरी तो वापरण्यात यावा किंवा तसें करता येणें अशक्य असेल तर तो एकदम गाळून तरी टाकावा. बहुसंख्य हिंदूंच्या धर्माचा निर्देश सनातन धर्म, किंवा श्रुतिस्मृति पुराणोक्त धर्म किंवा वैदिक धर्म या प्राचीन आणि आधींच स्वीकृत केलेल्या नावांनींच उत्तम प्रकारें करतां येतो. तेव्हा मग राहिलेल्या अल्पसंख्य हिंदूंच्या धर्मांचा निर्देशहि त्याच्या जुन्याच

आणि सर्वमान्य अशा शीख धर्म, किंवा आर्यधर्म, किंवा जैन धर्म किंवा बुद्ध धर्म याच नांवानीं पुढेंहि केला जावा. जेव्हा केव्हां ह्या सर्व धर्मांचा एकत्र उल्लेख करण्याचा प्रसंग येईल, तेव्हा केवळ हिंदुधर्म या समुच्चय वाचक शब्दाचा जर आपण उपयोग केला तर तें योग्य होईल. स्पष्ट स्पष्ट बोलण्याच्या दृष्टीनें किंवा जें आहे तें आडपडदा न ठेवतां मान्य करण्याच्या दृष्टीनेंहि यात कोणत्याहि प्रकारची हानि नाहीं. उलट त्यामुळें आटोपशीर-पणाच अधिक येणार असून कोणत्याहि तऱ्हेच्या समजुतीच्या घोंटाळयाला कारण उरणार नाहीं. आणि यातूनच पुढें अल्पसंख्य हिंदुजातींच्या मनांतील संशयाच्या कारणाचा निरास होऊन व बहुसंख्य हिंदुजातींच्या मनांतीलहि अढी नाहींशी होऊन, पुन्हां एकदां सर्व हिंदु आपल्या समान जातीचें आणि समान संस्कृतीचें एकमेव चिन्ह असलेल्या पुरातन ध्वजाखाली एकत्र गोळा होतील.

## हिंदु जातीनें निर्माण केलेली विशाल समष्टि

हिंदुस्थानांतील निरनिराळया जातींच्या—मनुष्य जातीसंबंधानें बोलणें दूरच—प्राचीन धर्म वाङ्मयांत अद्यापपर्यंत उपलब्ध झालेलें सर्वांत प्राचीन म्हणजे वेद वाङ्मयच होय. सप्तसिंधूंचें वैदिक परंपरेचें राष्ट्र हें अनेक संघांत आणि अनेक गटात विभागलेलें असें होतें. परंतु ज्याला आपण आज सोयीच्या दृष्टीनें वैदिकधर्म म्हणतो तो जरी त्यावेळच्या बहुसंख्याकाचा धर्म होता तरी, सिंधूमधल्याच अल्पसंख्य जातींना तो धर्म कधींच मान्य झालेला नव्हता. पाणी,[१] दास,[२] व्रात्य[३] आणि इतर अनेक लोक या सनातन धर्मापासून प्रथमपासूनच अलिप्त राहिलेले किंवा त्याच्यातून फुटून निघालेले वारंवार दिसतात. तरीहि पण जातीय आणि राष्ट्रीय दृष्टीनें आपण सर्व एकच आहोंत याची त्यांना पुरेपूर जाणीव होती. वैदिक धर्म नावाचा असा काहीं एक धर्म त्याकाळीं होताच. परंतु त्यावेळींसुद्धा तो सिंधु धर्म म्हणून एकच

१. पातालातील असुर विशेष. हे आर्यांचे शत्रु होते.
२. दस्यु. आर्यांचे विरोधी लोक.
३. आर्यांतीलच प्राचीन जाति.

मानला गेलेला नव्हता. कारण सिंधु धर्म हा शब्द जर तेव्हापासून रू
होत आला असता तर त्याचाहि अर्थ सप्तसिंधूमध्ये प्रचलित असलेला स
सनातन आणि तदितर अन्य धर्मपत असाच समुच्चयदर्शक झाला असत
नव्यांचा समावेश करून घेण्याच्या व नको असलेल्याना बाहेर टाकू
देण्याच्या रीतीनुसार सिंधूच्या जातीचें हिंदु जातींत आणि सिंधुची ज
भूमि सिंधुस्थान तिचे हिंदुस्थानात रूपांतर झालें. पुढें अनेक गोष्टींच
शोध लावून, अनेक साहसें अंगावर घेऊन, अनेक गोष्टींचें ज्ञान सांपादू
अणूपासून आत्म्यापर्यंतच्या आणि परमाणूपासून परब्रह्मापर्यंतच्या अगद
सूक्ष्मातल्या सूक्ष्मापासून ते विशालांतल्या विशालापर्यंत विस्तरलेल्या स
विश्वाचा कसून शोध करून, त्याचप्रमाणें विचाराच्या अंतिम अशा गू
तत्त्वाना वाचा फोडून आणि ब्रह्मानंदाच्या परमोच्चसमाधि–अवस्थेंत
विहार करून, सनातन धर्माच्या आणि त्या व्यतिरिक्त असलेल्य
दुसऱ्या धर्ममतांच्या अनुयायांनीं सर्वांनीं एकेश्वरवाद्यांपासून निरीश्व
वाद्यांपर्यंतच्या सत्तत्त्वाच्या शोधार्थ निघालेल्या सर्वांना सहानुभूती
सामावून घेईल, अशी एक विशाल समष्टि ( Synthesis ) निर्माण केली
अंतिम सत्याचा शोध हें तिचें ध्येय होतें व प्रत्यक्ष प्रचीति हा त्याचा मा
होता. ही समष्टि वैदिक किंवा अवैदिकच होती असें नाहीं, तर दोन्हीं
होती. प्रत्यक्ष धर्माचें अचूक शास्त्र तें हेच. वैदिक, सनातनी, जैन, बौद्ध, शी
किंवा देवसमाजी या सर्व धर्ममताच्या सूक्ष्म अनुभव–साक्षात्काराचा सम
न्वय घालून जो निष्कर्ष निघतो त्या निष्कर्षाचा निष्कर्ष म्हणजे खरा हिंदु
धर्म होय. सप्तसिंधूंच्या भूमींत किंवा वैदिक कालातील हिंदुस्थानच्या इत
भागातील अज्ञात अशा जातींत, जीं जीं वैदिक आणि अवैदिक धर्मम
त्याकाळीं प्रचलित होतीं, त्यांतूनच साक्षात् निर्माण झालेले किंवा त्य
धर्ममतात सुधारणा होऊन अस्तित्वात आलेले जे जे पंथ किंवा जीं ज
मतें, तीं तीं प्रत्येक हिंदुधर्म या नांवाखालींच येतात. हिंदुधर्माची त
वेगळीं न करता येणारीं अशीं अविभाज्य अंगेच होत.

## हिंदुधर्माची लो. टिळकांनीं केलेली व्याख्या

म्हणून वैदिक किंवा सनातन धर्म, हा हिंदुधर्मांतील केवळ एक पं

आहे. मग त्या धर्माच्या मागें कितीहि बहुसंख्य समाज कां उभा असेना! "प्रामाण्य बुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता। उपास्यानाम नियम एतद् धर्मस्य लक्षणम्॥ या प्रसिद्ध अनुष्टुपांत रचलेली सनातन धर्माची ही व्याख्या कै. लोकमान्य टिळकाची आहे. चित्रमयजगतामध्यें जो एक विद्वात्ताप्रचुर लेख त्यांनीं लिहिला होता आणि ज्यांत त्याचें सखोल ज्ञान आणि बुद्धिमत्ता याचें स्पष्ट प्रतिबिंब पडलेलें होतें, त्या लेखात या थोड्या-फार अभावात्मक व्याख्येचा स्पष्ट अर्थ विशदवून सागताना लोकमान्यानीं असें स्पष्टपणें सूचित केलें होतें कीं, सर्व साधारणपणें ज्याला हिंदुधर्म समजतात तेवढ्यापुरताच विचार करण्याचा त्यांचा हेतु होता; हिंदुत्व असें त्यांच्या डोळ्यापुढें नव्हतेच! आणि त्याचबरोबर त्यानीं हेंहि मान्य केले होतं कीं, त्या व्याख्येंत जे खरोखर जातीयदृष्ट्या आणि राष्ट्रीयदृष्ट्या कट्टर हिंदून आहेत त्या आर्यसमाजी लोकाचा आणि दुसऱ्या तसल्याच इतर पंथांचा समावेश होऊ शकत नाहीं. व्याख्या खरोखर तिच्यापुरती सर्वोत्तम अशीच आहे. परतु सत्याच्या कसोटीवरूनसुद्धां ती हिंदुधर्माची व्याख्या होऊ शकत नाहीं; हिंदुत्वाची तर नाहींच नाहीं. जो सनातन किंवा श्रुति-स्मृतिपुराणोक्त धर्म हिंदुधर्मांतील इतर धर्ममतांपेक्षा अतिशय लोकप्रिय असा झाला आणि साहजिकच ढिलेपणानें त्याला हिंदुधर्म संबोधण्याची चुकीची प्रथा पडली, त्या सनातन धर्माची मात्र ती व्याख्या होऊ शकते.

## हिंदु संस्कृतीची वज्रलेप मुद्रा

म्हणून, शब्दव्युत्पत्तीवरून व प्रत्यक्ष परिस्थिती लक्षांत घेऊन आणि त्याच्या धार्मिक अंगांचाहि विचार करतां ( कारण, धर्म म्हणजे केवळ धर्म नव्हे; त्यास इतर अनेक अंगें असू शकतात ) हिंदुधर्म हा हिंदूंचाच धर्म असल्यानें हिंदूंचीं जीं काहीं प्रमुख वैशिष्ट्ये आहेत तीं तीं सारीं त्या धर्मांत अवश्यपणें दिसून यावयाला पाहिजेत. आपण पाहिलेंच आहे कीं, हिंदूंचें पहिलें अत्यंत प्रमुख असें लक्षण म्हणजे सिंधूपासून समुद्रापर्यंत पसरलेली ही भूमि तो आपली पितृभू आणि मातृभू मानतो हें होय. ज्या वैदिक किंवा अवैदिक धर्ममतांना किंवा पंथांना आपण हिंदुधर्म म्हणून म्हणतों, ते ते सर्व धर्म खऱ्या अर्थानें त्या धर्मांना किंवा पंथांना विचाराचें तत्त्वज्ञान पुरविणाऱ्या

किंवा त्या धर्मांच्या सत्याचा ज्यांना साक्षात्कार झाला किंवा तें ज्ञान ज्यांना दिसले त्या द्रष्ट्या लोकांप्रमाणेंच याच भूमींत जन्मलेले आहेत. सर्व पंथ आणि सर्व मतें यांचा ज्यात समावेश होतो त्या हिंदुधर्मांचा आविष्कार प्रथम या सिंधुस्थानांत झाला; लौकिक अर्थानें सिंधुस्थान ही त्याची जन्मभूमी. ज्या प्रमाणें गंगा ही जरी विष्णूच्या पदकमलापासून उगम पावते तरी, अत्यंत धर्मश्रद्ध अशा माणसाला किंवा गूढवादी महात्म्यालासुद्धा या मनुष्य पातळीवरून विचार करता ती हिमालयाचीच कन्या आहे असे जसें वाटते, त्याप्रमाणें धार्मिक दृष्टीनें जें हिंदुधर्म म्हणून संबोधिलें जातें त्या तत्त्वज्ञानाची ही भूमि जन्मदात्री म्हणून मातृभू आणि पुण्यभूच आहे. हिंदुत्वाचें दुसरें महत्त्वाचें लक्षण म्हणजे हिंदु हा हिंदु आईबापाचा वंशज असला पाहिजे. प्राचीन सिंधूंचें आणि त्याच्यापासून जी जाति पुढें निर्माण झाली त्या जातीचें रक्त आपल्या नसांतून वाहात असल्याची प्रत्येक हिंदूला अभिमानपूर्वक जाणीव असते. हें लक्षणसुद्धा हिंदूंमधल्या निरनिराळ्या धर्ममतांच्या आणि पथांच्या संबंधात लागू पडणारे असेंच आहे. कारण तीं धर्मतत्त्वें हिंदुऋषींना आणि द्रष्ट्याना दिसलेलीं किंवा त्यानींच प्रस्थापित केलेली असल्यामुळें, ज्याप्रमाणें चागलें तें आपल्यात मामावून घेण्याच्या आणि वाईट तें आपल्यातून काढून टाकण्याच्या क्रियेला धरून ते धर्म पंथ किंवा तीं धर्ममतेंहि, नैतिक, सास्कृतिक आणि आध्यात्मिक दृष्ट्या, सप्तसिंधूंनीं जीं आपली वैचारिक उन्नती केली त्यातुनच जन्माला आलीं आहेत असे दिसतें. हिंदुधर्म हा काहीं केवळ हिंदूंच्या नैसर्गिक परिस्थितींतून किंवा विचार परंपरेंतूनच परिणत झाला असे नसून हिंदूंच्या संस्कृतीचेंहि ऋण तो वाहतोच. वैदिक कालातील प्रसंग असोत किंवा बौद्धाच्या किंवा जैनाच्या इतिहासांतील प्रसंग असोत; इतकेंच काय पण अगदीं आधुनिक असे जें चैतन्य, चक्रधर, बसव, नानक, दयानंद किंवा राजा राममोहनराय यांच्या संबंधींचे प्रसंग असोत; ते ज्या आजूबाजूच्या परिस्थितींत किंवा वातावरणांत घडून आलेले आहेत, त्या सर्व वातावरणावर, त्याचप्रमाणें जी भाषा आणि जे पारिभाषिक शब्द हिंदुधर्मांतील उत्कट अनुभूतीला आणि दिव्य साक्षात्कार–समाधी–अवस्थांना शब्दरूप देण्यास उपयोगी पडले त्या पारिभाषिक शब्दांवर नि त्या भाषेवर आणि त्याचप्रमाणें हिंदु-

धर्मांच्या पुराणांवर आणि तत्त्वज्ञानावर, व हिंदुधर्मानें विरोधिलेल्या आणि त्यानें स्वीकारलेल्या कल्पनांवर, हिंदुसंस्कृतीची वज्रलेप मुद्रा उमटलेली आहे. पंथोपपंथ आणि मतमतांतरें असलेला हा हिंदुधर्म, हिंदुसंस्कृतीच्या वातावरणातच जगतो, वाढतो आणि आपलें अस्तित्व टिकवून राहतो. आणि हिंदूचा हा धर्म हिंदूंच्या या भूमीशीं इतका निगडीत आहे कीं, त्याच मुळें, ही भूमि त्याला केवळ पितृभू वाटते इतकेच नव्हे तर ती त्याला पुण्यभूसुद्धा येऊन राहिली आहे.

## ऋषीमुनींची आणि साधुसत्पुरुषांची कर्मभूमि

होय; सिंधुपासून समुद्रापर्यंत पसरलेली ही भारतभूमि, हें सिंधुस्थान आमची पुण्यभूमीच आहे. कारण, आमच्या धर्मांच्या संस्थापकाना आणि ज्याना वेद ( ज्ञान ) स्फुरले त्या द्रष्ट्या ऋषींना म्हणजेच वैदिक ऋषीमुनीपासून ते दयानंदा[1]पर्यंतच्या, जिनमुनीपासून महावीरापर्यंतच्या, बुद्ध भगवानापासून नागसेनापर्यंतच्या, नानकापासून गुरु गोविंदापर्यंतच्या, बंदा बहादुरापासून बसवेश्वरापर्यंतच्या, चक्रधरा[2] पासून चैतन्यापर्यंतच्या आणि रामदासापासून राममोहना[3] पर्यंतच्या आमच्या सर्व गुरूना आणि सत्पुरुषाना, या भूमीनें जन्म दिला आणि त्यांना आपल्या अंकावर वाढविलें. हिच्या मार्गावर विखुरलेल्या प्रत्येक धूलिकणातून आमच्या महात्म्याच्या आणि आमच्या वंद्य गुरुंच्या पदाघाताचे निनाद आमच्या कानात आजहि उमटत असतात. येथील नद्या परम पवित्र आहेत; त्यांच्या काठची उद्यानें उपवनेंहि तशीच निर्मल नि पवित्र आहेत. कारण चांदण्या रात्रीं अधिकच रम्य झालेल्या याच नद्यांच्या घाटावर किंवा याच उद्यानांउपवनातील वृक्षांच्या सायंकालच्या दीर्घावनत छायाखाली बसून एखाद्या बुद्धानें किंवा

---

१. आर्यसमाजाचे संस्थापक.

२. महानुभाव पंथाचा संस्थापक. गोविंदप्रभूचा शिष्य. लीळाचरित्र या महानुभावीय ग्रंथाचा नायक.

३. ब्राम्होसमाजाचे संस्थापक.

एखाद्या शंकराचार्यांनें जीवित, जीव, जगदीश, आत्मा, मानव, ब्रह्म आणि माया इ. सारख्या गहन तत्त्वांचा ऊहापोह नि चर्चा केली असेल. होय! येथें दिसणारी प्रत्येक टेकडी आणि प्रत्येक दरी वा गुहा एखाद्या कपिलाची किंवा एखाद्या व्यासाची, एखाद्या शंकराचार्यांची किंवा एखाद्या रामदासाची स्मृति आपल्या डोळ्यापुढें जशीच्या तशी उभी करते. येथें भगीरथानें राज्य केले. तें तेथें कुरुक्षेत्र आहे. रामचंद्रानें आपल्या वनवासांतील पहिला विराम येथें केला; तर तिथें सुवर्णमृग जानकीच्या दृष्टीस पडला; आणि तो मारून आणण्याचा लडिवाळ हट्ट तिनें आपल्या 'आर्यपुत्रां'पाशी धरला. या ठिकाणीं गोकुळच्या त्या दिव्य गुराख्यानें आपली बासरी वाजविली आणि गोकुळांतलें प्रत्येक हृदय मोहिनीनें मोहित केल्याप्रमाणें त्या बांसरीच्या तालावर नाचू लागले.

## हुतात्म्यांची वीरभूमि नि यज्ञभूमि

या ठिकाणीं तो बोधिवृक्ष आहे; आणि इथें हें मृगोद्यान आहे. या ठिकाणीं महावीर निर्वाणास गेले. या ठिकाणीं भक्तगणांच्या मेळाव्यांत बसून गुरु नानकांनीं आपली "गगन थाल रविचंद दीपक बने!" ही आरती गायिली. या येथें गोपीचंदानें जोगीपणाची दीक्षा घेतली आणि हातीं भिक्षा पात्र घेऊन, मूठभर भिक्षेकरितां तो आपल्या बहिणीच्या दारापुढें 'अलख' म्हणून उभा ठाकला. याच ठिकाणीं, बंदा बहादुराच्या मुलाला त्याच्या पित्याच्या डोळ्यादेखत तुकडे तुकडे करून ठार मारण्यांत आलें; आणि रक्तानें लिडबिडलेलें तें त्या मुलाचें काळीज हिंदु म्हणून मरण पत्करण्याच्या अपराधावरून त्याच्या पित्याचा तोंडात बळानें कोंबण्यांत आले! हे मातृभूमि, तुझी तसू न् तसू भूमि ही हौतात्मानें पावन झालेली आहे. केवळ कृष्णसार जातीचे मृग येथें सापडतात एवढेंच नव्हे तर काश्मीरपासून सिंहलद्वीपापर्यंत, ज्ञानयज्ञानें किंवा आत्मयज्ञानें पण पवित्र झालेली अशी ही खरोखरच 'यज्ञीय भूमि' आहे. आणि म्हणून संताळापासून साधूपर्यंतच्या सर्व हिंदूंना ही भारतभूमि,—हें सिंधुस्थान—आपली पितृभू आणि पुण्यभू दोन्हीहि होऊन राहिली आहे.

## ख्रिश्चन किंवा बोहरी किंवा मुसलमान हिंदु नव्हेत

आणि म्हणूनच जरी आमच्या कांहीं मुसलमान किंवा ख्रिश्चन देशबांधवांना ज्यांना पूर्वी अहिंदु धर्मांत सक्तीनें बाटवून घेण्यांत आलेले होते, आणि म्हणूनच इतर हिंदूंप्रमाणें पितृभू, भाषा, निर्बंध–विधान, चालीरीती, प्रचलित आख्यायिका नि इतिहास यानीं मिळून होणाऱ्या समान संस्कृतींतल्या बराचशा भागाचा वारसा ज्यांना प्राप्त झालेला असतो तरीहि त्याना हिंदु म्हणून कधींच समजता येणार नाहीं. कारण, दुसऱ्या इतराप्रमाणें हिंदुस्थान ही त्याची पितृभू असू शकते; परंतु पुण्यभूमात्र कधींच असू शकत नाहीं. त्याची पुण्यभूमी कुठें तरी दूर अरबस्तानांत किंवा पॅलेस्टाईनमध्यें असते. त्याच्या पौराणिक कथा नि त्याचे संत सत्पुरुष, त्यांच्या धार्मिक समजुति आणि त्यांचे अवतारी देव हे या भूमींत उत्पन्न झालेले कधींच नसतात. आणि याचकरिता त्याचीं नावें आणि त्याच्या आकांक्षा या साऱ्याना एक प्रकारचा परकेपणाचा दर्प येतो. त्याचें या भूमीविषयींचे प्रेम हे नेहमींच विभागलेले असेंच असणार इतकेंच नव्हे तर, त्यांच्यापैकीं जे नेहमीं बढाई मारीत असतात त्याबढायाप्रमाणें त्याचीं जर खरोखर तशीच मनोमन भावना असेल, तर मग मात्र तेथें कांहीं विचार करण्याचेंच कारण नाहीं. त्याच्यामधील प्रत्यकानें आपली सर्व निष्ठा आणि प्रेम, पितृभूपेक्षा सर्वाआधीं पुण्भूमीलाच अर्पण केलें पाहिजे. याविषयीं आम्हीं धिक्कार किंवा शोक प्रकट करतों असेंहि नाहीं. आम्हीं केवळ आहे ती वस्तुस्थिति कथन केली आहे. आम्हीं हिंदुत्वाचीं अत्यंत प्रमुख नि आवश्यक अशीं लक्षणें निश्चित करण्याचा आतांपर्यंत प्रयत्न केला. आणि तो करीत असतां आपल्याला असें आढळून आलें कीं, बोहरी आणि कांहीं दुसरे मुसलमान किंवा ख्रिश्चन जाति यांच्या ठिकाणीं हिंदुत्वाचें एक अत्यंत आवश्यक लक्षण वगळून बाकी हिंदुत्वाचीं सारीं लक्षणें दिसून येतात; आणि त्यांच्या ठिकाणीं नसलेलें हिंदुत्वाचें ते एकच एक लक्षण म्हणजे या हिंदुस्थानला ते आपली पुण्यभू म्हणून मानीत नाहींत.

## परधर्मांत गेलेल्या बांधवांनो ! परत हिंदुधर्मांत या

ईश्वर, आत्मा, मनुष्य या संबंधीं एखादी नवी उपपत्ती सांगणाऱ्या

असल्या एका नवीन धर्मपंथाचा अंगीकार करयाचा प्रस्तुतचा प्रश्न नाहींच. कारण आम्हाला अगदीं प्रामाणिकपणानें असें वाटतें कीं, हिंदु तत्त्वज्ञानामध्यें (याठिकाणीं आम्हाला कोणत्याहि विशिष्ट धर्ममतासंबंधीं बोलावयाचें नाहीं) अज्ञेयासंबंधीं जरी नाहीं तरी अद्यापपर्यंत जे कुणालाच ज्ञात झाले नाहीं त्याचा, आणि 'तत्' नि 'त्वम्'[१] यामधील परस्पर संबंधाचा मानवी बुद्धीला जितका विचार करणें शक्य असेल तेवढा सारा विचार करण्यात आलेला आहे. आपण कोण आहांत? अद्वैती एकेश्वरवादी, सर्वेश्वरवादी, निरीश्वरवादी का अज्ञेयवादी? येथें अनंत अवकाश अगदी मोकळा आहे. हे आत्मारामा! तू कोणीहि एस; परंतु कोणाच्याहि वैयक्तिक महात्म्यावर नव्हे तर सत्याच्या विस्तृत, आणि शाश्वत अशा पायावर उभारलेल्या या परम पवित्र आणि महतिमहान् मंदिरात, विश्वावर प्रेम करण्यास आणि ज्यान अपार शांतीची प्राप्ती होईल असा आपला परमोच्च विकास साधण्यास तुला संपूर्ण मोकळीक आहे. मग अशा या स्फटिकशुद्ध गंगाप्रवाहाच्या तीरावर उभा राहून आपली लहानशी झारी भरून घेण्यासाठीं तू दूरदूरच्या वापी–तडागावर का जातोस? तरवारीच्या एकाच घावानें क्रूरपणानें उच्छेदून टाकल्यामुळें जीं तुला सदाची अंतरलीं होतीं त्या पूर्वीच्या परिचित अशा हृदयाच्या आणि प्रीतिबंधांच्या स्मृतींनीं व्याकुळ होऊन हे बघो! तुझ्या नसानसांतून वाहणारे आपणा सर्वांच्या पूर्वजांचें समान रक्त दीर्घ टाहो फोडून कसें आक्रंदत नाहीं? बघो! ये, परत आमच्यात ये; हे तुझेच बांधव, ह्या तुझ्याच भगिनी, या आपल्याच रक्ताच्या नि नात्याच्या चुकलेल्या तुझे स्वागत करण्यासाठीं बाहू पसरून महाद्वारावर उभ्या आहेत. ज्या ठिकाणीं महाकालाच्या मंदिराच्या पायऱ्यांवर उभे राहून चार्वाकानेंसुद्धा आपला नास्तिकवाद उपदेशिला त्या या भूमीवाचून दुसऱ्या कोणीकडे तुला एवढें धार्मिक स्वातंत्र्य मिळणार आहे? ज्या हिंदुसमाजात ओरिसातील पट्णापासून ते काशीच्या पंडितापर्यंत, आणि संताळापासून साधूपर्यंत प्रत्येकाला निरनिराळया प्रकारची

---

१. 'तत्त्वमसि'; अद्वैत वेदांत तत्वज्ञानाचें महावाक्य. "तें (ब्रह्म) तू आहेस".

स्वतंत्र समाजरचना निर्माण करून तिची वाढ करतां येते, त्या हिंदुसमाजावांचून इतके सामाजिक स्वातंत्र्य तुला अन्यत्र कुठें मिळणार आहे? खरोखर हेंच त्रिवार सत्य आहे कीं, "यदिहास्ति न सर्वत्र यन्नेहास्ति न कुत्रचित्" जें जें म्हणून जगांत सापडतें तें तें सर्व इथें आहे, आणि एखादी गोष्ट जर इथेंच सांपडणारी नसेल तर ती मात्र त्रिखंडातहि मिळणार नाहीं हें निश्चित. म्हणून बांधव हो! एक जाति, एक रक्त, एक संस्कृति, आणि एक राष्ट्रीयत्व हीं हिंदुत्वाचीं सर्व आवश्यक लक्षणें तुमच्या ठिकाणीं निःसंशयच वसत आहेत. अत्याचाराच्या पंजात पकडून तुम्हांला तुमच्या वाडवडिलांच्या प्रेमळ छत्राखालून बळानें हिसडून नेलेलें होतें आणि म्हणूनच यापुढें तुम्ही आपल्या मातृभूमीला आपलें नितान्त हार्दिक प्रेम अर्पण करा, आणि तिला नुसती पितृभूच नव्हे तर पुण्यभूमीहि समजूं लागा कीं, ही हिंदु जाति तुम्हालाहि आपल्यामध्यें सामावून घेईल!

जे आमचेच देशबांधव असून आमच्या रक्ताचेच पुराणे भाईबंद आहेत त्या बोहरी, खोजे, मेमन आणि दुसऱ्या मुसलमान आणि ख्रिश्चन लोकांनीं या उदार संधीचा लाभ आतां करून घ्यावा; अर्थात् हें सर्व शुद्ध प्रेमाच्या भूमिकेवरूनच व्हावें. परंतु, जोंपर्यंत या दृष्टीनें विचार करण्यास ते सिद्ध होत नाहींत तोंपर्यंत, त्याना हिंदु म्हणून कधींहि मानलें जाणार नाहीं. येथें हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं, हिंदुत्व या शब्दाचा प्रत्यक्ष जो कांहीं अर्थ आपणाला त्या शब्दावरून कळतो त्याच्याच अनुषंगानें आम्ही हिंदुत्वाच्या आवश्यक अंगाचा विचार नि चिकित्सा करीत आहोंत; आपल्या पूर्वग्रहाना किंवा आपण स्वीकारलेल्या पक्षाच्या उपयोगाच्या दृष्टीनें सोयीस्कार होईल अशा तऱ्हेचा अर्थ त्यातून ओढून ताणून काढणें हें केव्हाहि न्याय्य होणार नाहीं.

## हीच ती हिंदुत्वाची सार्थ नि सुटसुटीत व्याख्या

सारांश, आतापर्यंतच्या विवेचनाचा थोडक्यात निष्कर्ष म्हणजे हिंदु तो, कीं जो सिंधुपासून समुद्रापर्यंत पसरलेल्या या आसिंधुसिंधुपर्यंता भूमीला आपली पितृभू मानतो त्याचप्रमाणें वैदिक सप्तसिंधूच्या प्रदेशांत ज्या जातीच्या

प्रारंभाचा पहिला आणि दृश्य असा पुरावा मिळतो, व ज्या जातीनें नवीन प्रदेश आक्रमीत पुढें जात असतां ज्याचा ज्याचा स्वीकार केला तें तें सर्व आपल्यांत समाविष्ट केलें आणि जें जें समाविष्ट केलें तें तें परमोत्कर्षाला पोंचविलें व जी जाति पुढें हिंदु जाति या नांवानें प्रसिद्ध पावली, त्या जातीचे रक्त हिंदु या नांवास पात्र होणाऱ्या मनुष्याच्या अंगात खेळत असते. समान इतिहास, समान वाङ्मय, समान कला, एकच निर्बंध-विधान, एकच धर्मव्यवहारशास्त्र, समायिक यात्रा महोत्सव, समायिक धार्मिक आचार विधी, समायिक सण आणि समायिक संस्कार, एवंगुण विशिष्ट अशी जी त्या महान् हिंदु जातीची संस्कृति त्या संस्कृतीचा वारसा त्याला परंपरेनें मिळालेला असतो. आणि या सर्वांपेक्षा ज्यामध्यें त्याचे तत्त्वद्रष्टे ऋषी मुनी, संतमहंत, गुरु, आणि अवतारी पुरुष जन्माला आले आणि ज्यामध्यें त्याचीं पुण्यकारक अशीं यात्रास्थळें आहेत त्या सिंधुस्थानालाच तो आपली पवित्र पुण्यभू मानतो. हींच ती हिंदुत्वाचीं आवश्यक लक्षणें:समान राष्ट्र, समान जाति नि समान संस्कृति. हीं सर्व लक्षणें थोडक्यांत अशी सांगता येतील कीं, हिंदु तो कीं जो या भूमीला नुसती पितृभूच नव्हे तर पुण्यभूहि मानतो. कारण हिंदुत्वाचीं पहिलीं जी दोन प्रमुख लक्षणें, राष्ट्र आणि जाति ही स्पष्टपणें पितृभू या शब्दानें दाखविली जातात. तर हिंदुत्वाचें तिसरें लक्षण जी संस्कृति ती प्रामुख्यानें पुण्यभू या शब्दांत प्रतीत होते. कारण संस्कृतीमध्येंच धार्मिक आचार-विधी नि संस्कार यांचा अंतर्भाव होतो आणि त्यामुळेंच ही भूमि आपणाला पुण्यभू होऊन राहाते. हीच हिंदुत्वाची व्याख्या अधिक सुटसुटीत करण्याकरिता, ती पुढील अनुष्टुपांत ग्रथित करण्याचा आम्ही प्रयत्न केला तर तो वावगा ठरणार नाहीं अशी आम्हाला आशा आहे.

आसिंधुसिंधुपर्यंता यस्य भारतभूमिका ।
पितृभूः पुण्यभूश्चैव स वै हिंदुरितिस्मृतः ॥

## कांहीं प्रत्यक्ष उदाहरणें

मागील छेदकांमधून हिंदुत्वाच्या कल्पनेचे जे आपण स्थूलमानानें विवेचन केलें त्यावरून हिंदुत्वाच्या महत्त्वाच्या लक्षणांचा जींत नामनिर्देश होतो अशी हिंदुत्वाची एक चालचलाऊ व्याख्या आपणाला आतां बनवितां आली आहे. आता ही सर्वसाधारण व्याख्या कसाला कितपत टिकते हें पाहण्यासाठीं, ज्यांच्यामुळें ह्या व्याख्येची तीव्र आवश्यकता भासली होतीं अशापैकीं काहीं निरनिराळया प्रकारचीं व दुसरीहि काहीं विवक्षित अशीं उदाहरणें घेऊन तीं त्या व्याख्येला लावून पाहणें अवश्य आहे. आतां वरीलसारखे सर्वव्यापी आणि थोडे-फार दिशाभूल करणारे वर्गीकरण करताना जी व्याख्या आम्ही बनविली तीमध्यें शक्यतोंवर अतिव्याप्तीचा म्हणजे ढिलेपणाचा दोष राहू नये म्हणून आम्ही वेळोवेळीं अवश्य ती काळजी घेतलेली आहेच. आतां कांहीं नमुनेदार उदाहरणें घेऊन या व्याख्येच्या कसोटीवर त्याना पारखून घेतांना जर आपणाला असें आढळून आलें कीं, तीं या व्याख्येंमध्ये च्पखल बसतात तर त्या व्याख्येमध्यें अव्याप्तीचा म्हणजे कडेकोट काटेकोरपणाचाहि दोष राहात नसल्याची निश्चिति बाळगण्यास आपणाला प्रत्यवाय नाहीं. तिच्यामध्यें अतिव्याप्ति नाहीं हें आपण पूर्वीच पाहिलें. आतां केवळ त्यात अव्याप्तीचा दोष आहे कीं काय एवढे आपणाला पाहावयाचें आहे.

हिंदूंमध्यें भौगोलिकदृष्ट्या जे विभाग आपणाला पहावयास मिळतात ते आपल्या व्याख्येच्या एकंदर अर्थाशीं सुसंगतच आहेत हें पहिल्याच दृष्टीक्षेपांत आपल्या ध्यानात येईल. या व्याख्येची मूळ बैठक आसिंधुसिंधु पर्यंता अशी ही आपली भूमीच आहे. आणि जरी आमचे अनेक बाधव, विशेषत: जे प्राचीन सिंधूचे निरपवाद वंशज आहेत आणि अगदीं आजच्या घटकेपर्यंत ज्यानीं आपल्या भूमीचें वा जातीचें नांव बदलेले नाहीं, आणि पांच हजार वर्षांपूर्वीप्रमाणें आजहि ज्याना 'सिंधु' किंवा सिंधुदेशाची संतति म्हणतात ते सिंधूच्या एका तीरावर वस्ती करून आहेत हें जरी

खरें असले तरी, नदीचा उल्लेख जेव्हां करतात त्यावेळीं तिच्या दोन्हीहि तीरांचा त्यांत समावेश केला जात असल्यानें, सिंधप्रांताचा जो भाग सिंधूच्या पश्चिम तीरावर वसला आहे तोहि सिंधुस्थानाचाच नैसर्गिक असा एक विभाग म्हणून आमच्या व्याख्येप्रमाणें गणला जातो. दुसरें असें कीं, मुख्य देशाला जोडून जी भूमि असते तिलाहि त्या मुख्य देशाचेंच नांव प्राप्त होत असतें. आणि तिसरे म्हणजे, सिंधूच्या त्या तीरावर राहणारे आपले हिंदु लोक पार इतिहासकाळापासून या भारतवर्षालाच आपली खरीखुरी पितृभू आणि पुण्यभू म्हणून मानीत आले आहेत. ज्या एका छोटया भूभागावर ते राहात आले आहेत त्यालाच केवळ आपली पितृभू किंवा पुण्यभू मानून मातृघातकीपणाच्या दोषाचे ते आतांपर्यंत कधीहि वाटेकरी झाले नाहीत. उलट आमचीं जीं बनारस, कैलास, गंगोत्री आहेत, तींच त्यांचीहि बनारस, कैलास, गंगोत्री आहेत. पार वैदिक कालापासून ते भारतवर्षाचाच एक अविभाज्य असा प्रमुख भाग म्हणून गणले गेले आहेत. रामायण महाभारतामध्येंहि 'सिंधु शिबि सौवीर' हे महान् हिंदु साम्राज्याचे आणि राष्ट्रमंडळाचे अधिकृत असे घटक असल्याचा उल्लेख येतो. ते आमच्याच राष्ट्राचे, आमच्याच जातीचे आणि आमच्याच संस्कृतीचे आहेत, आणि म्हणून ते हिंदूच आहेत. आणि त्याच्या संबंधानें आमची व्याख्या सर्वस्वीं यथार्थ अशीच आहे.

## हिंदुत्वाच्या भौगोलिक मर्यादा

परंतु जर कोणी अशी शंका काढली कीं, नुसती एखादी नदी आपली असणें म्हणजे कांहीं त्या नदीचे दोन्ही तीरहि तसा स्पष्ट निर्देश असल्यावांचून आपल्यामध्यें मोडतातच असें नाहीं, तर त्यामुळेंसुद्धां आमच्या व्याख्येला मुळींच बाध येत नाहीं. कारण दुसऱ्या अनेक संबंधांत आमच्या सिंधी बांधवांना ती व्याख्या परिपूर्णतेनें लागू पडते. कारण, सिंधूच्या दुसऱ्या तीरावर वसति करून राहिलेल्या आपल्या हिंदी बांधवांचें उदाहरण जरी क्षणभर बाजूला ठेवलें तरी जगाच्या सर्व भागांत आमचे सहस्रावधि हिंदु पसरलेले आहेतच. अशी एक वेळ येईल कीं, हे इतरत्र वसाहत

करून राहिलेले आपले हिंदुबांधव, जे आजलासुद्धां व्यापारांत, बुद्धींत, कार्यक्षमतेंत आणि संख्येंतहि आपापल्या वसति-प्रदेशात वरचढ आहेत ते त्या त्या प्रदेशात आपलें अधिराज्य स्थापून स्वतंत्र राष्ट्र निर्माण करतील. परंतु हिंदस्थानव्यतिरिक्त दुसऱ्या भूमीत ते राहतात एवढ्या मुळेंच त्याना अहिंदु म्हणून समजावयाचें काय? निश्चितपणें नाहीं. कारण हिंदुस्थानच्या बाहेरच्या प्रदेशांत कोणी राहतां कामा नयें असा कांहीं हिंदुत्वाच्या पहिल्या लक्षणाचा अर्थ नाहीं. कोणीहि मनुष्य पृथ्वीच्या पाठीवर कुठेंहि का राहीना परंतु त्यानें व त्याच्या वंशजानीं सिंधस्थान हीच आपल्या वाडवडिलांची भूमि म्हणून मानली पाहिजे हाच हिंदुत्वाच्या पहिल्या लक्षणाचा अर्थ आहे. इतकेंच काय पण, हा प्रश्न नुसता मानण्याचाहि नाहीं. जर त्याचे वाडवडिल हिंदु म्हणून हिंदुस्थानातून आलेले असतील तर हिंदुस्थान हीच त्याची पितृभू ठरते; त्या वाचून त्याला अन्य गतीच नाहीं. म्हणून हिंदुत्वाची ही व्याख्या हिंदु लोकाचा कितीहि सुदूरवर प्रसार आणि संचार झाला तरी त्यांच्या संबधातहि पूर्णपणें लागू पडणारी अशीच आहे. आमच्या वसाहतवाल्या परद्वीपस्थ हिंदूंनीं महाभारत किंवा बृहत्तर भारत स्थापन करण्याचे प्रयत्न, पूर्वीप्रमाणेंच न थांबता आपलें सारें शक्ति सर्वस्व वेंचून करावेत; आणि आपल्या संस्कृतींतील 'जें जें उत्तम उदात्त उन्नत महन्मधुर तें तें' सर्व मानव जातीच्या उद्धाराकरिता कारणीं लावावें. आध्रुवध्रुवपर्यंत विस्तारलेल्या या भूमींत वसति करून राहाणाऱ्या अखिल मानव जातीची त्यानीं आपल्या अंगच्या सद्गुणानीं उन्नति करावी. आणि त्याच बरोबर जगात जें जें सत्य, शिव आणि सुंदर दिसेल तें तें आत्मसात करून आपल्या जातीला आणि मायभूमीला सकल श्रीसंयुत व सकलैश्वर्य मंडित करावी. हिमालयाच्या गिरीशिखरांवर भराऱ्या मारणाऱ्या पक्षिराज गरूडाचे पख छाटून टाकण्याचें काम हिंदुत्वाला करावयाचें नाहीं. त्याच्या भराऱ्या आणखी वेगवान कशा होतील याची चिंता हिंदुत्व करतें. जोंपर्यंत हे हिंदुबांधव हो! हिंदुस्थानलाच आपल्या पितृ पूर्वजाची आणि संत महात्म्यांची पवित्र पितृभू आणि पुण्यभू तुम्ही मानता, आणि त्यांच्या संस्कृतीचा आणि रक्ताचा अमोल वारसा आपल्याला मिळालेला आहे असें जोंपर्यंत तुम्ही अभिमानपूर्वक समजता तोंपर्यंत तुमची

वाढ खुंटविणारी जगांत एकहि शक्ति नाहीं हें पक्कें समजा. हिंदुत्वाच्य खऱ्या भौगोलिक मर्यादा म्हणजे या भू-गोलाच्याच मर्यादा !

## हिंदु रक्त आणि हिंदु संस्कृति यांचा समान वारसा

आतां, आमच्या व्याख्येतील जातिविषयक विचाराच्या सत्यासत्यते संबंध गभीर आक्षेप घेणारा चुकूनहि कोणी निघेल असें आम्हास वाट नाहीं. इग्लंडमध्ये, इबेरियन, केल्ट, अँगल्स, सॅक्सन्स् डेन्स, नॉर्मन् याच्यामध्ये जातिभेद असूनसुद्धां आंतरजातीय विवाहामुळें ते ज्याप्रमा आज एका राष्ट्रजातींत एकजीव होऊन गेले आहेत त्याचप्रमाणें आर्यन कोलिरियन, द्रवीडियन आणि इतर, यांच्याध्यें जुने वंशविषयक नि जाति विषयक भेदाभेद जरी कितीहि तीव्र स्वरूपांत असले तरी ते यापुढें मुळींच मानले जाणार नाहींत. या संबंधीं अवश्य ती सागोपांग चर्चा आम्ह पूर्वीच्या छेदकांत करून दाखवून दिलें होतें कीं, आच्या धर्मशास्त्रानं संमतिलेल्या अनुलोम आणि प्रतिलोम विवाह पद्धतीवरून हें निर्विवादपा सिद्ध होतें कीं, त्यावेळींहि आपल्या राष्ट्रशरीरांतून समान रक्ताचा प्रवा सतेजपणें आणि जोमानें वाहात राहण्याइतक्या त्यावेळच्या जाति परस्पर एक जीव नि एकरूप, झालेल्या होत्या. बदलत्या कालमानाप्रमाणें बदलण्याचें जें जेथें रूढीनें नाकारले तेथें तेथें प्रचलित रूढींनीं उभारलेल्या भेदाभेदाच्य भिंती प्रबल निसर्गाच्या रेट्यापुढें केव्हाच कोसळून पडल्या. एखाद्य हिडिंबेवर प्रेम करणारा भीमसेन हा कांहीं पहिलाच किंवा शेवटलाच आ नव्हता; तर आम्हीं पूर्वी उल्लेखिलेली व्याधकर्म्याची आई,-ब्राह्मण कन्या, हीहि काहीं तरुण व्याधावर प्रेम करणारी एकटीच आर्यकन्या नव्हती. टहा वीस भिल्ल, किंवा कोळी किंवा अगदीं संताळसुद्धा, यांच्यामधून एखाद मुलगा किंवा एखादी मुलगी उचलून शहरी शाळेंत नेऊन बसविली त अंगलटीवरून किंवा चालचलणुकीवरून तो किंवा ती अमक्याच जातीच असल्याचा निर्वाळा देता येणें कठिण जाईल. ज्यांचे रक्त म्हणजे प्रत्ये स्वतंत्र अशीं एक एक जातीच होती, अशा आर्यांच्या, कोलिरियनांच्या द्रविडांच्या आणि आपल्या साऱ्या पूर्वजांच्या रक्ताच्या मिश्रणानें-जें मिश्र क्रमाक्रमानें होत गेल्यामुळें अंतीं हितकर ठरलें-जी नवी जाति जन्माल

आली, तिला आर्यन, कोलिरियन किंवा द्रविडियन यापैकीं कोणतेंच नांव न देतां हिंदु जाति असेंच नांव देण्यांत आलें; आणि आसिंधु सिंधु-पर्यंत अशा भूमीला जे आपली पुण्यभू मानतात आणि जे त्या समान मातृभूमीचीं लेकरें म्हणून तेथें राहतात त्या लोकांच्या वाचक हें नांव रूढ झालें. म्हणून संताळ, कोळी, भिल्ल, पंचम, नामशूद्र, आणि इतर सर्व जाति आणि जमाती ह्या हिंदूच आहेत. हें सिंधुस्थान, त्या तथाकथित आर्यांचें जितकें ( आहे त्याच्यापेक्षां जास्ती जरी नसले तरी ) तितकें तरी या संताळ आदि जातींच्या पूर्वजाचें निश्चित आहेच आहे. त्यांच्यामध्यें हिंदु रक्तच आहे, आणि हिंदूची संस्कृतीच त्यांच्या ठिकाणीं रुजलेली आहे. आणि कोणत्याहि पुराणमतवादी हिंदु जातींचे संस्कार त्यांच्यापैकीं ज्याच्यावर अद्याप झालेले नाहींत, ते अजूनहि आपल्या पूर्वीच्या देवता नि साधुसंत यांचीच पूजा करितात आणि आपला पहिलाच साधासुधा धर्म पाळीत असतात. तरीहिसुद्धां याच भूमीवर त्यांचें मनोमन प्रेम आहे. आणि म्हणूनच ती त्याना केवळ पितृभू न होता पुण्यभूहि होऊन राहिलेली असते.

हिंदुत्व आणि हिंदुधर्म या दोन शब्दांमध्ये जो भ्रामक सारखेपणा आहे आणि त्यामुळें जो अपसमज दुर्दैवानें फैलावला आहे तो जर फैलावला नसता तर हिंदुत्वाच्या सांस्कृतिक अंगासंबंधींहि कोणताच विशेष असा आक्षेप उद्भवला नसता. हिंदुत्व आणि हिंदुधर्म या दोन कल्पनांमधील अंतर यापूर्वीच आम्ही स्पष्टपणें दाखवून दिलेलें आहे; आणि 'सनातनधर्म' एवढाच अर्थ व्यक्त-विण्यासाठीं हिंदुधर्म शब्दाचा जो दुरुपयोग करण्यात येतो त्यासंबंधींहि आम्ही आपली तीव्र नापसंति दर्शविली होती. हिंदुत्व आणि हिंदुधर्म या दोन कल्पना एक नाहींत. त्याचप्रमाणें हिंदुधर्म आणि हिंदुइझम ( वैदिक धर्म या अर्थी ) हेहि दोन शब्द एक नाहींत. हिंदुत्व आणि हिंदुधर्म ह्या दोन कल्पनांना एकच समजावयाचे आणि त्या दोहोंची सांगड सनातनी धर्ममतांशीं घाला-वयाची, या दुहेरी चुकीमुळें आपल्या सनातनी जातींव्यतिरिक्त जे लोक आहेत किंवा जे आपले धर्मपंथ आहेत त्याना साहजिकच राग येतो. आणि याच्या पुढें जाऊन त्यांच्यातील कांहीं गट,—ही चुकीची कल्पना उखडून टाकणें राहिलेंच परंतु दुर्दैवानें बरोबर विरुद्ध दिशेनें जाऊन,—आपण हिंदूच नव्हेत अशा तऱ्हेची दुसरीच आत्मघातकी नि घोर चूक करीत असलेले

दिसतात. आम्हाला अशी आशा आहे कीं, परस्पर मनोवैमनस्य माजण्यास आमच्या व्याख्येंत मुळींच वाव नाहीं; आणि हिंदु समाजातील सर्व सरळ व विचारी लोकाना ती मान्य होईल अशाच सत्याच्या पायावर तिची उभारणी केलेली आहे.

## आमच्या शीख बांधवांचें उदाहरण

परंतु या एकदंर विषयाची सर्वसाधारण चर्चा करीत असताना ज्या विशिष्ट गोष्टींचा यथासांग परामर्ष आम्हाला त्यावेळीं घेतां येणें शक्य नव्हते त्यांचा तसा परामर्ष आता आम्हीं घेणार आहों. प्रथम आपण आपल्या शीख बांधवांचेंच उदाहरण घेऊ. सिंधुस्थान, किंवा आसिंधुसिंधुपर्यंता भारत भूमिका हीच त्यांची पितृभू असें निश्चित विधान आतां जर केलें तर तें नाकारण्याइतका महामूर्ख कोणी असेलसें आम्हाला वाटत नाहीं. कारण पार वैदिक कालापर्यंतच्या, आज उपलब्ध असलेल्या पहिल्या लिखित ऐतिहासिक पुराव्यावरून हेंच दिसून येते कीं, याच भूमींत त्याचे पूर्वज वाढले; याच भूमीवर त्यांनीं प्रेम केलें; इथेंच त्यानीं आपल्या पूजाअर्चा नि उपासना प्रार्थना केल्या. दुसरें म्हणजे, मद्रासेंतील किंवा बंगाल्यांतील कोणत्याहि हिंदूप्रमाणेंच, त्याच्याहि नसानसातून तेंच हिंदूंचेच रक्त खेळत आहे. एवढेंच काय, आपणा महाराष्ट्रवासियाच्यांत किंवा बंगालियांच्यात आर्यांचे रक्त आहेच पण त्याचबरोबर या भूमींत राहिलेल्या दुसऱ्याहि प्राचीन लोकांचे रक्त आपल्यात आहे. परंतु त्यादृष्टीनें पाहता, शीख हे खरोखर सिंधूचे खरेखुरे आणि प्रत्यक्ष वंशज आहेत. आणि म्हणून हिंदुजातीची ही जीवनगंगा सपाट प्रदेशांतून वाहूं लागण्यापूर्वी अगदीं तिच्या उगमांतच तिचें जीवनदुग्ध आपण प्राशन केलें आहे, असे शीखानाच तेवढे काय तें अभिमानानें सागता येण्यासारखे आहे. तिसरे म्हणजे त्यांनींहि हिंदुसंस्कृतींत आपली म्हणून कांहीं भर घातली असल्यामुळें हिंदुसंस्कृतीचे तेहि न्याय्य वारसदार नि भागीदार आहेत. कारण पहिल्यानें सरस्वती हें पंजाबमध्यें वाहाणाऱ्या एका नदीचे नांव होतें; पुढें तिला विद्या आणि कला यांची अधिष्ठात्री देवता समजण्यांत येऊं लागलें. जिच्या तीरांवर आपल्या संस्कृतीची आणि सभ्यतेची (Civilization) बीजें प्रथम

पैलतीं गेली त्या नदीला, हे शीख बांधव हो! तुमच्याच पूर्वजांनीं म्हणजे सिंधूंनीं कृतज्ञतेनें जीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं आणि तिचा महिमा वर्णन केला, त्यांत अगदीं आजच्या घटकेलासुद्धां हिंदुस्थानातील लक्षावधि हिंदु आपला सूर मिळवतात आणि आपल्या ऋग्वेदातील शास्त्रशुद्ध मंत्रोच्चाराप्रमाणें "अंबितमे नदीतमे। देवितमे सरस्वति" चें गायन करितात. वेद हे जसे आमचे आहेत तसे शीखांचेहि आहेत; आतां वेद हे जरी (आपल्या द्रष्ट्या ऋषींप्रमाणें) त्यांच्या पूर्वजांना स्फुरलेले नसले, तरीहि आदरणीय ग्रंथ म्हणून वेद त्यांनाहि मान्य आहेतच. कारण वेद हें असें वाङ्मय आहे कीं, पंचमहाभूतात्मक सृष्टीचें ज्ञान करून घेण्यासाठीं आद्य मानवानें निसर्ग शक्तींशीं ज्या प्रचंड झुंजी दिल्या त्याचें वर्णन त्यात आलेले आहे. त्याचप्रमाणें ज्या घोर अज्ञान तिमिरानें अमृतकुंभ हरण करून तोहि अप्राप्य करून ठेविला होता आणि मनुष्याच्या सुप्त आत्म्याला जागृति आणणारे ज्ञानसूर्याचे किरणहि ज्यानें आतापर्यंत मानवापर्यंत पोंचूं दिले नव्हते, त्या निबिड अज्ञान अंधःकाराशीं प्रकाशाची जी पहिली भीषण चकमक झडली, तिचाहि इतिहास वेदामध्येंच ग्रथित करून ठेवण्यात आला आहे. आपणा सर्वांप्रमाणें शीखांच्या इतिहासाचा प्रारंभहि वेदां-पासून झालेला असणें सयुक्तिक आहे; अयोध्याच्या राजवाड्यांतूनहि त्यांचा संचार झालेला आहे. लंकेची रणभूमीहि त्यांच्या दृष्टीपथांत आलेली आहे; लाहोरची प्राणप्रतिष्ठा करण्यांत लहूला त्यानें साहाय्य दिलेलें आहे आणि कपिल वस्तूंतन बाहेर पडून मनुष्याचा दुःखभार हलका करण्याचा एखादा मार्ग शोधून काढण्यासाठीं सिद्धार्थानें जेव्हा गुहेमध्यें प्रवेश केला, तेव्हाचा तो प्रसंगहि त्यानें निरखून पाहिला आहे. पृथ्वीराजाचा जो दुःखदायक शेवट झाला त्याविषयीं आमच्याप्रमाणेंच शीखांनाहि मनस्वी वाईट वाटतें. जित राष्ट्राच्या वाट्याला येणारें सर्व दुःख, सर्व अपमान ते सहन करतात तर हिंदु म्हणूनच इतरांबरोबर कोणताहि त्याग करण्यांत ते मागें नसतात. उदासी, निर्मल, गहनगंभीर, आणि सिंधी या पंथातले लक्षावधि शीख संस्कृत भाषेला, आपल्या पूर्वजांची भाषा म्हणूनच नव्हे तर या भूमीची अत्यंत पवित्र भाषा म्हणून पूज्य मानतात. आणि त्यांच्या व्यतिरिक्त राहिलेले इतर शीख आपल्याच पूर्वजांचीं, आणि ज्या गुरुमुखी आणि पंजाबी भाषा

अद्यापीहि त्यांच्या बाल्यावस्थेंत ज्या संस्कृतचेंच स्तनदुग्ध पिऊन वाढत आहेत त्यांची, जननी म्हणून संस्कृतला आपुलकीनें गौरवितात. आणि सर्वांत शेवटीं म्हणजे ही आसिंधुसिंधुपर्यंता भूमि त्याना केवळ पितृभूच नव्हे तर पुण्यभूहि आहे. गुरु नानक आणि गुरु गोविंद, श्रीचंदा आणि रामसिंग हे याच हिंदुस्थानात जन्मले आणि याच भूमीनें त्याचें संगोपन करून त्याना वाढविलें. हिंदुस्थानांतील सरोवरें त्यांना खरोखर अमृताचीं आणि मुक्तीचीं सरोवरें ( अमृतसर नि मुक्तसर ) झालेली आहेत !

हिंदुस्थानची ही भूमि त्याच्या गुरूंची आणि गुरुभक्तीची भूमि आहे म्हणजेच त्यांचीं गुरुद्वारें नि गुरूघरें येथेंच आहेत. खरोखर ज्याच्या संबधानें शंकाकुशंकाना एवढाहि अवसर राहणार नाहीं असें हिंदुस्थानात जर कोणी खरे हिंदु असतील तर ते आमचे पंजाबातले शीखबंधूच. कारण सप्तसिंधूचे ते सर्वांत जुने म्हणजे जवळ जवळ तेथेंच आद्य वसाहत करणारे असे लोक असून सिंधु किंवा हिंदु लोकांचे ते प्रत्यक्ष वंशजच आहेत. आजचा शीख हा कालचा हिंदु आहे आणि आजचा हिंदु हा कदाचित् उद्याचा शीखही असेल ! रोजची राहणी, चालीरीती आणि वस्त्रपद्धति यामध्यें थोडाफार फरक असला तरी त्यामुळें रक्त किंवा बीज बदलत नाहीं; किंवा इतिहासहि पार पुसून टाकून नष्ट केला जात नाहीं.

आमच्या लक्षावधि शीख बंधूंना त्याचें हिंदुत्व हें स्वतःसिद्ध असेंच आहे. सहजधारी, उदासी, निर्मळ, गहनगंभीर आणि सिंधी शीख हे जातीनें आणि राष्ट्रीयत्वानें आपण हिंदूच आहोत असा अभिमान बाळगतात. त्याचे गुरूच हे मुळीं हिंदूचींच मुलेंलेकरें असल्यामुळें, त्याना जरी राग आला नाहीं तरी जर कोणी त्यांना अहिंदु म्हणूं लागला तर ते मात्र त्यांना कसेसेंच वाटेल. गुरुग्रंथाचें पवित्र ग्रंथ म्हणून वाचन, शीखांप्रमाणें सनातनींहि करतात. दोघाचे उत्सव, सण नि यात्रा एकच आहेत. 'तत्खालसा' पंथी शीखसुद्धां त्याचें लोकसंख्येचें प्रमाण लक्षांत घेतां 'हिंदु' या त्यांच्या जातिनामावर प्रेम करतात व हिंदूंमध्यें हिंदु म्हणूनच मिसळतात; वागतात. तुम्हांला यापुढें हिंदु समजले जाणार नाहीं असे जर त्यांना सांगण्यात आले तर या आकस्मिक निर्णयामुळें त्याना मोठाच धक्का बसेल. आमचे जातिय ऐक्य इतके संशयातीत आणि

इतके परिपूर्ण आहे कीं, आंतर्जातीय विवाह हे शीखांमध्यें आणि सनातन्यांमध्यें सर्रास रूढ आहेत.

## शीख हे खरेखुरे हिंदूच आहेत

आमच्या शीख बंधुवर्गातील काहीं पुढाऱ्यांना हिंदु म्हणून संबोधिल्यामुळें कित्येक वेळा ते फार रुष्ट होऊन उठतात, ही वस्तुस्थिति आहे. परंतु हिंदुधर्म हा शब्द आपण सनातन धर्म या अर्थी वापरण्याची चूक या पूर्वी जर केली नसती तर त्याना राग येण्याला कारणच उरलें नसतें. ते दोन शब्द तसे एका अर्थानें वापरल्यामुळेंच पुष्कळसा समजुतीचा घोटाळा आणि अर्धवटपणा निर्माण झाला आहे. आणि हिंदूंमधील पोटजातींत असलेले सलोख्याचे संबंध बिघडविण्यास जी घातुक प्रवृत्ति कारणीभूत झाली आहे तिच्या बुडाशीं वरील गोष्ट प्रामुख्यानें असल्याचें दिसून येईल. हिंदुत्व हें कोणत्याहि प्रकारच्या धार्मिक कसोट्या लावून ठरविलें जाऊं नये या संबंधींचें स्पष्ट विवेचन आम्हीं यापूर्वी केलेलेंच आहे. तरीसुद्धां या ठिकाणीं आम्हाला पुनः एकदा सांगावेसें वाटतें कीं, सनातन धर्मांतील ज्या कोणत्या किंवा ज्या साऱ्या गोष्टी भाबडटपणाच्या आणि देवभोळेपणाच्या अशा शीखाना वाटतील त्या त्यानीं सुखेनैव त्याज्य म्हणून समजाव्यात; इतकेंच नव्हे तर अपौरुषेय ग्रंथ म्हणून वेदाचे प्रामाण्यसुद्धां त्यांनीं बंधनकारक मानू नये. त्यामुळें कदाचित् ते सनातनी समजले जाणार नाहींत, परंतु हिंदु तरी निश्चित् राहतील. कोणत्याहि धार्मिक अर्थानें नसले तरी आमच्या व्याख्येप्रमाणें शीख हे हिंदूच आहेत. धार्मिक दृष्टीनें जैन ज्या प्रमाणें जैन आहेत, लिंगायत ज्या प्रमाणें लिंगायत आहेत, वैष्णव ज्याप्रमाणें वैष्णव आहेत त्याचप्रमाणे शीखहि शीख आहेत; परतु सांस्कृतिक, जातीय आणि राष्ट्रीय अर्थानें पाहतां आपण सर्व एक आणि अभिन्न असेच आहोंत, आणि इतिहासाच्या अतिप्राचीन काळापासून, अगदी यथार्थनें हिंदु म्हणून ओळखिले जात आहोंत. आमच्यामधील जातीय ऐक्याची यथायोग्य कल्पना यावाचून दुसऱ्या कोणत्याहि शब्दानें येण्यासारखी नाहीं. पाठीमागें दाखवून दिल्याप्रमाणें भारतीय हा शब्दहि येथें तोकडाच पडेल. याचाहि अर्थ हिंदीच होतो

आणि अधिक व्यापकपणा या शब्दांत आहेहि. तरी परंतु हिंदूंचे जातीय ऐक्य कांहीं या शब्दानें दाखविलें जात नाहीं. आम्ही शीख आहोंत, हिंदु आहोंत नि भारतीयहि आहोंत. या दोहींचा समन्वय आमच्या ठिकाणीं जरी साधलेला आहे, तरी त्यापैकीं वेगवेगळे स्वतंत्र असें अस्तित्व मात्र आम्हांला मुळींसुद्धा नाहीं.

## स्वतत्र प्रतिनिधित्व आणि शीख समाज

आपणांला सनातन पंथाचेच अनुयायी म्हणून समजण्यात येईल या भीतीबरोबर दुसरें जें आणखी एक कारण आमच्या काहीं शीख बंधूंच्या उत्साहात भर घालण्यास उपयोगी पडलें आणि ज्यामुळेंच हिंदूंच्यापेक्षा स्वतंत्र वेगळे अस्तित्व आपणाला प्राप्त व्हावें असा त्यानीं आग्रह धरला, तें म्हणजे निव्वळ राजकीयच होतें. स्वतंत्र प्रतिनिधित्व असणें चांगलें कीं वाईट यासंबधींचा ऊहापोह करण्याचें हें स्थळ नव्हे. शीखानांहि साहजिकच आपल्या जातीचें कांहीं स्वतत्र कल्याण साधण्याची आवश्यकता वाटली. आणि मुसलमानाना जर त्याचे असें वेगळें जातीय प्रतिनिधित्व दिलें जातें तर मग हिंदुस्थानातील दुसऱ्या कोणत्याहि महत्त्वाच्या अल्प-संख्य जातींना तशाच प्रकारच्या सवलती मागण्याचा अधिकार का असू नये हें आम्हाला कळत नाहीं. परंतु आम्हाला वाटतें कीं, स्वतत्र प्रतिनिधि-त्वाची ही मागणी आमच्या शीख बांधवानीं आपण हिंदूपेक्षां सर्वस्वीं निराळे आहोंत या आत्मघातकी आणि फार काळ न टिकणाऱ्या भूमिकेवरून कधींच करावयाला नको होती. आपल्या जातीचे हित साधण्यासाठीं स्वतंत्र जातीय प्रतिनिधित्वाची मागणी अल्पसंख्य अशी महत्त्वाची जमात म्हणून, आमच्या ब्राह्मणेतर आणि इतर जातींप्रमाणेंच शीखाना आपल्या जन्मसिद्ध हिंदुत्वाचा त्याग न करता करता आली असती, आणि त्यांत त्यांना निश्चित यशहि मिळालें असते. आपल्या शीख बंधूची जमात ही मुसल-मानापेक्षां निश्चित कमी महत्त्वाची नाहीं. वास्तविक आम्हां हिंदूंना ती हिंदुस्थानांतील कोणत्याहि इतर अहिंदु जातींपेक्षा अधिक महत्त्वाची आहे. स्वतंत्र आणि जातीय प्रतिनिधित्वानें जी हानि होते ती जातीय फुटीर पणाच्या वृत्तीनें होणाऱ्या हानीपेक्षा केव्हांहि अधिक नसते. शीख, जैन,

लिंगायत, ब्राह्मणेतर आणि इवेतर ब्राह्मणहि या सर्वांनीं आपापल्या स्वतंत्र आणि जातिविशिष्ट प्रतिनिधित्वाची मागणी करून त्यासाठीं झगडावें. मात्र त्यांच्या विशिष्ट जातीच्या उन्नतीला त्याची अगदीं फारच आवश्यकता आहे असें त्यांना अत्यंत प्रामाणिकपणानें वाटत असले पाहिजे. कारण त्यांच्या जातींचा उत्कर्ष तोच हिंदुसमाजाचा उत्कर्ष होय हें सूत्र त्यांनीं विसरतां कामा नये. अगदीं प्राचीन कालींसुद्धां आपल्यांतील चार मुख्य जातींना राजसभेमध्यें आणि ग्रामसंस्थांमध्यें जातीय तत्वावर स्वतंत्र प्रतिनिधित्व मिळत होते. तरीसुद्धां एकंदर समाजांत विलीन न होतां फुटीरपणें राहण्याचें किंवा हिंदुत्वाच्या अधिक विस्तृत अशा वर्गीकरणांतूनच आपणास वगळले जावे अशा प्रकारचें धोरण त्यांनीं कधींहि आचरलें नाहीं. शीखाना धार्मिक अर्थानें शीख म्हणूनच स्वतंत्रपणें ओळखावें परंतु सांस्कृतिक, जातीय आणि राष्ट्रीय या दृष्टीनें पाहतां त्यांना हिंदूच समजण्यात येणें अवश्य आहे.

## शीखांनीं आपणांला हिंदूंवेगळे समजण्यांत भयंकर धोका

ज्या शूर वीरांनीं आपल्या गुरुंचें शिष्यत्व नाकारण्यास मान न लववितां वध करणाऱ्या मागाच्या कुऱ्हाडींपुढें शेंकडोंनीं आपलीं शिरें वांकविली—धर्म हेत शाका जिन किया। शिर दिया पर शिरह न दिया।—ते काय चार तुकड्याकरितां आपलें बीज नाकारतील? आपल्या पूर्वजांविषयीं खोट्या आणाशपथा वाहतील? किंवा आपला जन्मसिद्ध अधिकारहि विकून टाकतील! शिव शिव! आमच्या अल्पसंख्य जातींनीं हें पक्कें ध्यानांत धरावें कीं, सामर्थ्यांत जर एकीचें बीज असेल तर हिंदुत्वामध्येंहि परस्परांना एकत्र आणणारी प्रेमाच्या जिव्हाळ्याची अशी एक प्रबल शक्ति आहे कीं, त्या शक्तींतूनच खरेंखुरें आणि चिरंतन टिकणारे असें बलशाली ऐक्य आपल्यामध्यें निर्माण होणार आहे. बाजूला राहून कांहीं काळपर्यंत तुम्हांला आपलें अधिक हित साधतें आहे असें वाटेल परंतु त्यामुळें आमच्या प्राचीनतम जातीला आणि संस्कृतीला, आणि विशेषतः तुम्हालाच फार अगणित हानि सोसावी लागणार आहे. कारण, तुमचे हितसंबंध

तुमच्या दुसऱ्या हिंदुबांधवाच्या हितसंबंधांशीं अत्यंत निकटपणें निगडित झालेले आहेत. गत इतिहासांत घडल्याप्रमाणें पुढेंहि जर एखाद्या परकीय आक्रमकानें हिंदु संस्कृतीविरुद्ध नि समाजाविरुद्ध आपली तरवार उचलली तर लक्षांत ठेवा कीं, इतर हिंदु जातींप्रमाणें तुमच्यावरहि तिचा प्राणघातक प्रहार झाल्यावांचून राहाणार नाहीं. पाठीमागल्याप्रमाणेंच जेव्हा केव्हां पुढच्या भविष्यकालांत ही हिंदुजाति पुनः एकदा आपलें स्वत्व प्रस्थापित करील आणि एखाद्या शिवाजीच्या किंवा रणजिताच्या, एखाद्या रामचंद्राच्या किंवा धर्माच्या, एखाद्या अशोकाच्या किंवा अमोघवर्षाच्या आधिपत्याखालीं नवचैतन्याचें आणि शौर्यपराक्राचें वारें पिऊन उठून वैभवाच्या आणि उन्नतीच्या शिखरावर आरूढ होईल तेव्हा त्या दिवसाच्या अपूर्व यशाची प्रभा जशी हिंदुराष्ट्राच्या दुसऱ्या प्रत्येकाच्या मुखावर विलसत असलेली दिसेल तशीच तीं तुमच्याहि मुखावर झळकेल. म्हणून बंधूंनो! एवढ्या तेवढ्या कमी जास्त लाभानें हुरळून जाऊं नका आणि इतिहासावरून नसतेच काहीं निष्कर्ष काढून किंवा अपसिद्धान्त बाधून त्यांच्या आहारीं जाऊं नका. आम्हाला एक 'ग्रंथी' म्हणवून घेणारा शीख भेटला होता. या शीखानें आपल्या धनको ब्राह्मण सावकाराच्या घरावर दरोडा घालून त्याचा खून केला होता व त्या करितां पुढें त्याला शिक्षाहि झाली होती. त्याचें म्हणणें असें होतें कीं, शीख हिंदु नसल्यामुळें आणि गुरुगोविंदसिंहाच्या मुलाना ब्राह्मण आचाऱ्यानेंच फसविलें असल्यामुळें, ब्राह्मणाचा खून केला असतां कोणताहि दोष आपणाला लागत नाहीं! सुदैवानें त्याचवेळीं तेथें एक खराखुरा आणि विद्वन्मान्य असा सुसभ्य 'ग्रथी' शीख उपस्थित होता. त्यानें तत्काळ त्या माणसास विरोध करून, ज्यानीं गुरूंना आश्रय देऊन व प्रसंगीं त्याच्याकरिता प्राण पणाला लावून हौतात्म्य पत्करून शीखांशीं प्रामाणिकपणा दाखविला त्या मतिदास आदि ब्राह्मणाचीं उदाहरणें देऊन त्याला चांगलेंच निरुत्तर केलें. शिवाजीशीं त्याचेच जातभाई नाहीं का विश्वासघातकीपणानें वागले? आणि त्याच्या नातवाशीं खोटेपणानें वागलेला पिसाळ हा तरी कोठें अहिंदु होता? परंतु त्यामुळें शिवाजीनें किंवा त्याच्या राष्ट्रानें आपल्या जातीला आणि हिंदुत्वाला काहीं सोडचिठ्ठी दिली नाहीं. वीर बंद्याला सोडून जातांना प्रथम

कितीतरी शीखच त्याच्याशीं विश्वासघातकीपणानें वागले. त्यानंतर पुन्हा दुसऱ्या खेपेस जेव्हां खालसा शीखांचे नि इंग्रजांचें शेवटचें युद्ध जुंपलें तेव्हांहि शीखानीं तोच प्रकार केला. गुरुगोविंदसिंहानाच अगदीं भर रणधुमाळींत कितीतरी शीख सोडून गेले; आणि शीखाच्या या विश्वासघातकी भ्याडपणामुळेंच आमच्या सिंहपराक्रमी गुरुला शत्रूचें कडें फोडून बाहेर पडण्याचा निकराचा प्रयत्न करावा लागला. आणि या प्रसंगानेंच त्या दुष्ट ब्राह्मणाला गुरुपुत्राच्या मुलाचा विश्वासघात साधण्याची कुसंधि प्राप्त करून दिली. तेव्हा ब्राह्मणाच्या नीचपणामुळें जर आपण हिंदु म्हणवून घेण्यास लाजत असू, तर मग शीखांच्या नीचपणामुळें आपण शीख आहोंत असें म्हणण्यास तरी का लाजू नये !

हिंदूंमधील अल्पसंख्य जाति किंवा त्याचबरोबर बहुसंख्य जाती दोन्हीहि कांहीं आकाशातून स्वतंत्रपणें खाली पडलेल्या नाहींत. एकाच संस्कृतींत आणि एकाच भूमींत ज्याचीं मुळें खोलवर जाऊन रुजली आहेत अशा एखाद्या महान वृक्षाप्रमाणे त्यांची वाढ झालेली आहे. एखाद्या शेळीच्या कोंकराला पकडून त्याला कच्छ आणि कृपाण बांधलें तर त्यामुळें त्याचा सिंह तुम्हांला थोडाच बनविता येणार आहे ? जर गुरुगोविंदांना वीरांचें आणि हुतात्म्यांचें एक पथकचें पथक बनविण्यात यश आलें असलें तर ज्या जातीनें गुरु गोविंदाना व त्याच्या अनुयायाना जन्म दिला ती जातीच तशी तेजस्वी नि पराक्रमी होती हें त्याच्या मागील खरें मुख्य कारण आहे. सिंहाच्या बीजापासूनच सिंहांची निर्मिति होत असते. फुलाला असें कधीहि म्हणतां येणार नाहीं, कीं "मी फुलतें, हसतें नि सुगंध दरवळवितें याचें कारण, म्हणजे माझा जन्म त्या डेखांतून झालेला असतो हें होय. मुळांशी माझा कांहींहि संबंध नाहीं !" त्या फुलाप्रमाणे आपणालाहि आपलें बीज किंवा रक्त नाकारता येणार नाहीं. जेव्हां तुम्ही एखाद्या गुरुशीं प्रामाणिक असलेल्या शीखाकडे बोट दाखवितां, तेव्हा आपल्या गुरुशीं सच्चा असलेल्या हिंदूकडेच तुम्ही बोट दाखवीत असतां. कारण शीख होण्यापूर्वी आणि आतासुद्धां तो हिंदूच असतो. जोपर्यंत आमचे शीख बंधु शीखपंथाचे खरे अनुयायी आहेत तोपर्यंत त्याना हिंदु असणेंच अवश्य आहे. तोपर्यंत ही आसिंधुसिंधुपर्यंता भारतभूमिका त्यांची पितृभू आणि

पुण्यभूच राहणार. आता कदाचित् ज्या दिवशीं ते शीख म्हणूनहि स्वतःला मानणार नाहींत त्याच दिवशीं केवळ ते हिंदु म्हणून गणले जाणार नाहींत.

आतापर्यंत आम्ही आमच्या शीख बंधूंचें उदाहरण विचारांत घेऊन त्याच्यावर खूपच दीर्घ असें विवेचन केलें. आतां हेच सर्व विचार आणि विवेचन शीखांप्रमाणेंच ज्या दुसऱ्या अवैदिक जाति किंवा धर्मपंथ आहेत त्यांच्याहि संबंधात आमच्या व्याख्येला धरूनच जसेच्या तसे लागू असल्याचें दिसून येईल. उदाहरणार्थ, देवसमाजी हे अज्ञेयवादी आहेत. परंतु हिंदुत्वाला अज्ञेयवाद किंवा निरीश्वरवाद याच्याशीं तादृश काहींच कर्तव्य नाहीं. देवसमाजी हे या भूमीला आपली पितृभू आणि पुण्यभू मानीत असल्यामुळें ते हिंदूच आहेत. अर्थात् इतक्या सर्व विवेचनानंतर आर्यसमाजी बंधुविषयीं विचार करणें म्हणजे खरोखर अनावश्यकच आहे. कारण त्याच्या ठिकाणीं हिंदुत्वाची सर्वच्या सर्व लक्षणें इतक्या प्रकर्षानें वसत आहेत कीं ते कट्टरातले कट्टर हिंदु आहेत असेंच अनुभवाला येईल. अशा रीतीनें, ज्यामुळें आमच्या व्याख्येला अव्याप्तीचा दोष चिकटेल अशा प्रकारचें एकहि उदाहरण आमच्यापुढें या घटकेला तरी दिसत नाहीं.

## एक नाजूक अपवाद

मात्र एका उदाहरणांत खरोखर समाधानकारक मार्ग निघत नाहीं खरा. आणि तें उदाहरण म्हणजे भगिनी निवेदिता[१] याचें. अपवादानें जर खरोखर नियम सिद्ध होत असेल तर या उदाहरणावरून तरी तसें म्हणावयास पाहिजे. आमच्या ह्या देशाभिमानी आणि थोर अंतःकरणाच्या भगिनीनें ही आसिंधुसिंधुपर्यंता भूमि आपली 'पितृभू' मानली होती. आणि खरोखरच ह्या भूमीवर ती त्या दृष्टीनें नितान्त प्रेमहि करीत होती. आणि जर खरोखर आमचा देश स्वतंत्र असता तर आम्हींहि अशा देवमाणसाना आमच्या राष्ट्राच्या नागरिकत्वाचे अधिकार आनंदानें अर्पण केले असते. तेव्हां हिंदुत्वाचें पहिलें प्रमुख लक्षण, याहि

---

१. हिंदुधर्म स्वीकारणारी स्वामी विवेकानंदाची शिष्या. मूळची मार्गारेट इ. नोबल नावाची इंग्लिश स्त्री.

संबंधांत कांहीं एका मर्यादेपर्यंत लागू पडतें. आतां हिंदु आईबापांचे एक रक्त असणें हें जें हिंदुत्वाचें दुसरें महत्त्वाचें लक्षण तें मात्र अशा उदाहरणांतून सांपडणें सर्वस्वीं अशक्य असेंच आहे. हिंदूबरोबर विवाह करूनच हें वैगुण्य काढून टाकता येईल. कारण वैवाहिक बंधनातच खरोखर स्त्रीपुरुष परस्परांत एकरूप होत असतात, आणि सर्व जगालाहि ही गोष्ट मान्य आहे. परंतु हें दुसरें लक्षण त्यांच्या ठिकाणीं या ना त्या कारणानें आढळणें अशक्य असलें तरी हिंदुत्वाच्या तिसऱ्या लक्षणाप्रमाणें ‘ हिंदु ’ या नांवाला त्या सर्वथैव पात्र ठरल्या होत्या. कारण त्यांनीं आमची संस्कृतीहि स्वीकारली होती आणि आमच्या भूमीवर त्या पुण्यभू म्हणून प्रेमहि करीत होत्या. आपण हिंदूच आहोंत असें त्यांस मनोमन वाटूं लागलें होतें. आणि हिंदुत्वाच्या दुसऱ्या कसल्याहि शास्त्रीय कसोट्या क्षणभर बाजूला ठेवल्या तरी ही एवढी एकच खरी आणि अत्यंत महत्त्वाची कसोटी आहे असें मानण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. परंतु प्रत्यक्षांत ‘ हिंदुत्व ’ हा शब्द बहुसंख्य लोक ज्या अर्थानें वापरतात तो अर्थ विचारांत घेऊनच आपणाला हिंदुत्वाचीं प्रमुख लक्षणें निश्चित करावयाचीं आहेत हें विसरून चालावयाचें नाहीं. आणि म्हणून, अहिंदु आईबापाच्या पोटीं जन्मलेल्या एखाद्या मनुष्यास हिंदुत्वांत समाविष्ट करून घेतले तरी त्याला हिंदु असे तेव्हांच म्हणता येइल कीं, जेव्हां तो आमच्या देशाला आपला देश मानील, हिंदूशीं विवाह करून या देशावर पितृभूप्रमाणें प्रेम करूं लागेल आणि नित्याच्या जीवनांत आमच्या संस्कृतीचा स्वीकार करून या देशाला पुण्यभू म्हणून पूज्य समजूं लागेल. या नवीन दांपत्यापासून निर्माण होणारी संततीहि इतर सर्व गोष्टी सारख्याच असल्यामुळें निःसंशय हिंदु म्हणूनच समजली जाईल. यापेक्षां अधिक सांगण्याचा अधिकार आम्हांला नाहीं.

### निर्दोष व्याख्या

परंतु, हिंदूंच्या कोणत्याहि धर्मपंथाच्या तत्त्वज्ञानावर श्रद्धा ठेवणारा परकीय नवागत मनुष्य, सनातनी किंवा शीख किंवा जैन असाच ओळखला जाईल. कारण हे सर्व धर्म आणि पंथ हिंदूंनींच संस्थापिलेले किंवा हिंदूंनाच स्फुरलेले असल्यानें व त्या सर्वांना हिंदुधर्म हेंच सर्व साधारण नामाभिधान प्राप्त

झालें असल्यांमुळें त्या नवीन परकीय अनुयायाला केवळ धार्मिक अर्थानेंच काय ते हिंदु म्हणतां येईल. परंतु हें येथें अवश्य लक्षात ठेवलें पाहिजे कीं, धार्मिक दृष्टीनें किंवा सांस्कृतिक दृष्टीनें हिंदु बनलेल्या या परकीय मनुष्यामध्यें हिंदुत्वाच्या तीन अत्यंत आवश्यक लक्षणापैकीं केवळ एकच लक्षण दृष्टीस पडतें. आणि याच वैगुण्यामुळें बहुधा, जो जो कोणी आमच्या जातीच्या धार्मिक पंथाचें किंवा मताचें अनुयायित्व मानतो व त्यासाठीं झटतो त्या त्या साऱ्यांना किंवा त्या त्या प्रत्येकाला हिंदु म्हणून मानण्यास लोक सिद्ध नसतात. आमच्या मातृभूमीची आणि संस्कृतीची बहुमोल सेवा ज्या एखाद्या भगिनी निवेदितेनें किंवा एखाद्या ॲनि बीझांट[1]नें केलेली आहे त्याकरितां त्या व्यक्तींविषयीं आमच्या मनांत नितान्त कृतज्ञभाव वसत आहे; आणि एक स्वतंत्र जाति म्हणून आम्ही हिंदु इतके हळुवार अंतःकरणाचे आणि प्रीतीच्या स्पर्शानें पुलकित होऊन उठण्याइतके सहसवेदनक्षम आहोंत कीं, भगिनी निवेदितेप्रमाणें जी कोणी व्यक्ति—मग ती स्त्री असो वा पुरुष असो—आमच्या राष्ट्रीय जीवनाशीं आपलें व्यक्तिविषयक जीवन समरस करून टाकतें तिला जवळ जवळ न कळतच आमच्या हिंदु जातींत समाविष्ट करून घेतलें जातें. परंतु हें सर्व नियमाला अपवाद या न्यायालाच धरून व्हावयास पाहिजे. आम्हांला विश्वास आहे कीं, ज्या निरनिराळ्या उदाहरणांना क्रमाक्रमानें घेऊन आम्ही आमची हिंदुत्वाची व्याख्या लावून पाहिली त्यावरून हेंच सिद्ध झालें आहे कीं, ती व्याख्या या दोन्हीहि दृष्टींनीं समाधानकारक अशीच आहे; आणि म्हणून 'अव्याप्ति' किंवा 'अतिव्याप्ति' या दोषांपासून ती मुक्त आहे.

---

१. हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळींत लोकमान्य टिळकांच्याबरोबर भाग घेणारी इंग्लिश स्त्री. कलकत्ता येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाचा मानहि या बाईंना १९१७ या वर्षी मिळाला होता. थिऑसॉफी हा त्यांचा आवडता विषय असून त्यासंबंधीं प्रचंड वाङ्मयहि त्यांनीं लिहिलें आहे. १९३३ मध्यें त्या अड्यार येथें मरण पावल्या.

# ८

## निसर्गाच्या दिव्य करांगुलीनें आंखलेले राष्ट्राचे संरक्षक सीमान्त

आतांपर्यंतच्या चर्चेमध्यें उपयुक्ततावादी दृष्टिकोन मध्यें आणून आम्ही आमच्या विवेचनाला कोठेंच आग्रही स्वरूप आणलेलें नव्हतें. परंतु हें आपले विवेचन आतां संपत आलें असल्यामुळें, हिंदुत्वाचीं आपण पाहिलेलीं अत्यंत आवश्यक लक्षणें आपल्या राष्ट्राचें सामर्थ्य, संघटन नि अभ्युदय साधण्यास कितपत उपयुक्त ठरतात हेंहि थोडेसें पाहणें कांहीं अगदींच अप्रासंगिक ठरणार नाहीं. ज्या भूमिकेवर उभे राहून हिंदुराष्ट्राला आपलें स्वतःचें भविष्य घडविता येईल आणि जे जे विरोधी वारें वाहतील नि जीं जीं आक्रमणें—अत्याचार होतील त्याना त्यांना तोंड देऊन परतवून लावण्याचें सामर्थ्य त्याच्यांत उत्पन्न होईल, अशा तऱ्हेची बळकट, पायाशुद्ध आणि विस्तृत भूमिका निर्माण करण्याचें सामर्थ्य हिंदुत्वाच्या या मूलतत्त्वांमध्यें खरोखर आहे कां ? कां हिंदुजाती ही केवळ मातीच्या ठिसूळ पायावरच उभें राहून नुसताच बडेजाव मारते आहे ?

कांहीं कांहीं प्राचीन राष्ट्रांनीं, आपला देश म्हणजे जणुं कांहीं एक बंदिस्त गढीच बनविण्याकरितां आपल्या देशाभोंवतालीं प्रचंड तटबंद्या उभारल्या होत्या असें दिसून येतें. आज त्या प्रचंड भिंती केव्हांच धुळीस मिळून गेल्या आहेत. इथे तिथें मातीचे जे कांहीं चार ढिगारे क्वचित् दृष्टीस पडतात त्यावरून त्याचें अस्तित्व काय तें समजून घ्यावें लागतें ! आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही कीं, ज्या लोकांच्या संरक्षणासाठीं त्या भिंती उभारल्या होत्या ते लोकहि आतां उरलेले नाहींत ! आमचे अतिप्राचीन शेजारी जे चिनी लोक त्यांनीं पिढ्यान् पिढ्या खपून, सर्व चिनी साम्राज्याला परिवेष्टित करील अशी एक इतकी लांबरुंद, उच्च नि बळकट भिंत बांधून ठेवली कीं मानवी जगाचें तें एक आश्चर्यच होऊन बसलें. परंतु तीसुद्धां सर्व मानवी आश्चर्यकृतींप्रमाणें, आपल्याच वजनाखालीं खचून गेली ! परंतु निसर्गानें बनविलेली ही तटबंदी पहा ! हिमालयाच्या या प्रचंड रांगा,

सर्वांशा तृप्त झालेल्या एखाद्या ऐश्वर्यवंताप्रमाणें आढ्यतेनें येथें उभ्या असलेल्या दिसत नाहींत कां? आमच्या वैदिक कालांतल्या निसर्गाचीं स्तोत्रें रचणाऱ्या ऋषींनाहि त्या तशाच भासल्या होत्या आणि आज आम्हाला सुद्धां त्या तशाच दिसत आहे. हिमालयाच्या या प्रचंड रांगा म्हणजेच आमच्या देशाच्या संरक्षक भिंती. यांच्यामुळेंच आमचा देश म्हणजे एक निर्धास्त असा दुर्गच होऊन बसला आहे.

घागरी पातेली घेऊन तुम्ही चरांत पाणी भरता आणि त्याला खंदक असें नांव देतां! परंतु पहा, इकडे प्रत्यक्ष वरूणच एका हातानें खंडेंची खंडें बाजूस रेटून ही दुभंगलेली जागा आपल्या दुसऱ्या हातानें समुद्रचे समुद्र ओतून भरून काढीत आहे. हा हिंदी महासागर त्याच्या मोठमोठ्या खाड्या नि उपसागर यांसह आमच्या देशाचा प्रचड असा खंदकच बनून राहिला आहे.

या आमच्या देशाच्या सीमा आहेत व त्यामुळें आम्हांला समुद्र किनारा आणि भूमि या दोंहोंचाहि लाभ झालेला आहे.

## आमची मातृभूमि, परमेश्वराची अत्यंत लाडकी कन्यका!

सकल सौभाग्यानें नटलेली आमची ही भूमाता, देवाची अत्यंत लाडकी अशी कन्यका आहे. तिच्या नद्याचें पाणी अथांग आणि संतत वाहणारे असें आहे. तिची भूमि शेतीकृषीला अत्यंत सुयोग्य असून तिच्या शेतांतून सोन्याच्या मोलाची भरगच्च पिकें प्रतिवर्षी निघतात. तिच्या स्वाभाविक गरजा फारच थोड्या आहेत; आणि नुसती इच्छा प्रकट करितांच त्या पुरविण्याला प्रेमळ निसर्ग हात जोडून सदैव सिद्ध आहे. नानाप्रकारचे पशुपक्षी नि श्वापदें, आणि विविध प्रकारच्या फळाफुलाचे वृक्ष आणि लता यांनीं ही भूमि गजबजलेली आहे. आणि या सर्वांचें कारण आपल्याला प्रकाश आणि उष्णता देणारा तो सूर्य नारायणच आहे, हेंहि तिला पक्कें माहीत आहे. हिमव्याप्त भूप्रदेशांचा तिला कधीच हेवा वाटत नाहीं. बर्फाखालीं महिने न् महिने गाडले जाणारे ते प्रदेश त्याचे त्यांनाच लखलाभ असोत! थंड वायुमानांत कष्टाची कामें करण्यास उत्साह प्राप्त होत असेल परंतु इकडच्या उष्ण वायुमानामुळें ते कष्ट करण्याचीच फारशी आवश्य-

कता उरत नाहीं. सदा शुष्क नि कोरड्या घशापेक्षां आपली तहान शीत मधुर जलपानानें शमविण्यांतच तिला अधिक आनंद वाटतो. ज्यांच्या जवळ जें काहीं मुळातच नाहीं तें प्राप्त करून घेण्याच्या कष्टात जो काहीं आनंद आहे तो सुखनैव त्यांना उपभोगूं द्या; परंतु ज्यांच्याजवळ जी गोष्ट विनासायासच सेवेला उभी आहे त्याना तिचें सुख उपभोगण्याचा अधिकार ती त्यांच्यापाशीं आहे या साध्या कारणानेंच प्राप्त होत नाहीं काय? बर्फानें गोठलेल्या फादर टेम्सच्या प्रवाहावरून भरधांव वेगानें वाहनें दौडण्यामध्यें कितीहि सुख असो. परंतु आमच्या भारतमातेला घाटांघाटांवर हिंडून, चांदण्यारात्रीं गंगेच्या रुपेरी जलप्रवाहावर कौमुदी–विहार करीत तरंगत असलेल्या नौका पहाण्याचीच अधिक आवड आहे. आपला नांगर, मोर, कमळ, हत्ती आणि गीता इतक्या गोष्टी जवळ असल्यावर शीतकटिबंधांतील जीं कांहीं सुखें आहेत तीं सारीं सोडून देण्यास आमची मातृभूमि सदैव सिद्ध आहे; कारण सर्वच गोष्टी आपल्याच सेवेला उभ्या राहूं शकत नाहीं हें तिला उमगतें. तिची वनें आणि उपवनें सदा हिरवीगार नि शीतल छायांनीं युक्त असतात. तिचीं धान्याचीं कोठारें सदोदित अन्नधान्यानीं ठेंचून भरलेलीं अशींच असतात. तिचें जल स्फटिकशुद्ध आहे. तिचीं फुलें सुवासमत्त आहेत. तिचीं फळें रसाळ आहेत आणि तिच्या वनस्पतीहि औषधी आहेत. उषेच्या दिव्य रंगातून ती आपली कुंचली बुडवून घेते आणि गोकुळच्या गायनाचे आलाप तिच्या बासरींतून उमटत असतात. निःसंशय आमची ही भूदेवी सकल श्रीसौभाग्यानें नटलेली परमेश्वराची अत्यंत लाडकी अशी कन्याच आहे.

### समान वसतिस्थान

इंग्लंड काय किंवा फ्रान्स काय पण जगांतील दुसऱ्या कोणत्याहि देशाला–चीनचा किंवा क्वचित् अमेरिकेचा तेवढा अपवाद वगळून–सिंधुस्थानच्या भूमीप्रमाणें निसर्गतःच सुसंरक्षित आणि सुसंपन्न अशी भूमि लाभलेली नाहीं. समर्थ अशा राष्ट्रीयत्वाचें पहिले अत्यंत महत्त्वाचें लक्षण म्हणजे सर्वांना समानतेनें आपली वाटणारी अशी एक स्वदेशभूमि–एक सामान्य वसतिस्थान–असणें हें होय. व त्या दृष्टीनें पृथ्वीच्या पाठीवरील साऱ्या

राष्ट्रांचा विचार करतां, एका महान् जातीच्या वाढीला अत्यंत सुयोग्य अशी भूमि अर्पिण्यांत आमच्या राष्ट्रानें जें औदार्य प्रकट केलें आहे त्यांत त्याला मागें टाकण्यास दुसरा एक तरी देश सांपडेल कीं नाहीं याची शंकाच आहे. समान पितृभूविषयीं नितान्त प्रेम हें ज्या आम्हां हिंदूंचें आमच्या राष्ट्रनिष्ठेचें पहिलें अत्यंत आवश्यक असें लक्षण आहे, त्या प्रेमांत अशी कांहीं प्रबल मोहिनी आहे कीं तीमुळें आमचें राष्ट्र अधिक एकजीव नि अधिक बलशाली होण्यास साहाय्यच होतें; आणि न भूतो न भविष्यति असा पराक्रम करण्यास आम्हांस स्फूर्ति आणि शक्ति यांचा लाभ होतो.

## आमचें संख्याबल

हिंदुत्वाच्या दुसऱ्या लक्षणामुळें तर आमच्यामध्यें न कळतच वास करीत असलेल्या ऐक्याच्या आणि राष्ट्रीय महत्तमतेच्या ज्या उपजत प्रवृत्ति आहेत त्यांचें मूल्य अधिकच वाढतें. जगांतील दुसऱ्या कोणत्याहि देशात—एक चीनचाच अपवाद पुन्हां वगळून—इतकी एकविध, इतकी प्राचीन आणि तरीहि संख्येनें आणि जिवंतपणानें इतकी सार्थ्यवान अशी जाति आतांपर्यंत वसत आली नसेल. राष्ट्रीयत्वाला मूलाधार असलेली सर्वोत्तम अशी भौगोलिक भूमि अमेरिकेलाहि आपल्याप्रमाणेंच लाभलेली असली तरीहि अमेरिकेचा क्रमांक आपल्या भूमीच्या मानानें निःसंशय खालींच लागतो . मुसलमान काय किंवा ख्रिश्चन काय हे एकजाति नाहींतच. केवळ धार्मिकदृष्ट्या ते एक आहेत. जातीय किंवा राष्ट्रीय दृष्टीनें ते एक नाहींत. परंतु आम्हीं हिंदु या तीनहि दृष्टीनीं विचार करतां आमच्या सर्वांच्या अशा एकाच आणि अत्यंत प्राचीन अशा छत्राखालीं अखंडपणें राहात आलों आहोंत. आमच्या जातीचें संख्याबल हें आमचें एक अत्यंत मोठें असें वैशिष्ट्यच आहे.

## समान संस्कृति

आणि आतां संस्कृति! इंग्लिशांना आणि अमेरिकाना शेक्सपियर हा दोघाचाहि असल्यामुळें आपण भाऊ भाऊ आहोंत असें वाटतें. परंतु केवळ कालिदास किंवा भासच नव्हे, तर हे हिंदु बांधव हो! रामायण

आणि महाभारत--इतकेंच काय पण वेदसुद्धां तुमच्या साऱ्यांचे आहेत. अमेरिकेंतल्या मुलांना जें एक राष्ट्रगीत शिकविलें जातें त्यांत, अमेरिकन राष्ट्राच्या मागें पुऱ्या दोन शतकाचा इतिहास उभा असल्यामुळें तें यापुढें यावत्चंद्रदिवाकरौ अशाच महत्त्ववैभवानें तळपत राहणार अशा प्रकारचें भावनोद्दीपक वर्णन असतें. परंतु हिंदु हा आपला इतिहास शतकांनीं नव्हे तर युगांनीं आणि कल्पांनीं मोजतो, आणि त्याच्या तोंडून साश्चर्य उद्गार निघतात "रघुपतेः क गतोत्तर कोशला। यदुपतेः क गता मथुरा पुरी॥" हिंदु स्वतःच्या वडेलावीला कधींच महत्त्व देण्याचा प्रयत्न करीत नाहीं. तारतम्य किंवा सापेक्षता हेंच जें खरें अंतिम सत्य आहे तेवढेंच तो मानतो. आणि त्यामुळेंच कदाचित् तो रॅमसेस किंवा नेबुचाडनेझार याच्यापेक्षा अधिक चिरंजीव होऊ शकला. ज्या राष्ट्रास भूतकाळ नाहीं त्यास भविष्य काळहि नाहीं या म्हणण्यांत जर कांहीं तथ्य असेल, तर ज्या राष्ट्रानें पराक्रमी नि अवतारी पुरुषांची आणि त्यांच्या भक्तपूजकांची एक अखंड परंपरा निर्माण केली, आणि ज्या राष्ट्राला अशा शत्रूशीं लढून त्याची रग जिरविल्याची विजयी जाणीव अद्याप आहे कीं, ज्या शत्रूनें आपल्या शक्तीनें ग्रीस आणि रोम, परोहा आणि इनकस या लोकांना नि राष्ट्रांना पार नाम शेष करून टाकलें होतें, त्या राष्ट्राच्या इतिहासातच पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राच्या इतिहासापेक्षा, त्याच्या उज्ज्वल भविष्याची हमी अधिक निश्चितपणें देऊन ठेवलेली आपणाला सापडते.

## मातृभूमीपेक्षां समान पुण्यभूमीचें प्रेमच श्रेष्ठ !

परंतु, संस्कृतीबरोबरच समान पुण्यभूचें प्रेमहि मातृभूमीच्या प्रेमापेक्षां कित्येकदां अधिक बलवत्तर ठरलेले असल्याचें दिसून येते. मुसलमानाचींच गोष्ट घ्याना. दिल्ली किंवा आग्रा यापेक्षा त्यांना मक्केविषयींच खरेखुरे प्रेम वाटतें. त्यांच्यापैकीं कांहीं तर उघड उघड सांगतात कीं, 'इस्लामच्या उत्कर्षाकरितां किंवा आपल्या धर्मसंस्थापकाच्या पुण्यनगरीचें रक्षण करण्यांकरिता वेळ पडली तर साऱ्या हिंदी गोष्टीचा होम करण्यास आपण सिद्ध आहों !' ज्यू लोकांचीहि अशीच गोष्ट आहे. ज्या देशानीं ज्यू लोकांना आपल्या भूमींत आश्रय दिला व जेथें राहून ज्यूंनीं अनेक शतकांचा भर-

मराठीचा काळ उपभोगला त्या देशांविषयीं निदान कृतज्ञता बुद्धीनें तरी —अधिक प्रेम तर राहोंच !—पण योग्य ते समान प्रेमहि त्यांनीं कधींहि दाखविलेलें नाहीं. त्यांचें प्रेम हें त्यांना जन्म देणाऱ्या त्यांच्या मातृभूमींत आणि त्यांच्या धर्मसंस्थापकांच्या पुण्यभूमींत नेहमींच अवश्यमेव विभागलेलेच राहाणार. पॅलेस्टाईन हें ज्यूंचें राष्ट्र पुन्हां होऊन झिऑनिस्ट लोकांची स्वप्नें जर सत्यसृष्टींत खरीं ठरलीं ( तसें खरोखरच झाले तर आमच्या ज्यू मित्रांच्या इतकाच आम्हालाहि आनंद होईल ) तर मुसलमानांप्रमाणेंच साहजिकच ज्यू लोकाचा ओढा आपल्या युरोप अमेरिकेंतील जन्मस्थान होऊन राहि- मातृभूमीकडे न राहातां त्याच्या पुण्यभूमीकडेच विशेष अधिक राहील. आणि ज्यू राष्ट्राचें आणि त्यांनीं आपला मानलेल्या देशाचें युद्ध चालू झालें तर स्वाभाविकपणेंच त्याची सहानुभूति, जरि ते शरीरानें दूर असले तरी ज्यू राष्ट्राविषयींच सदैव राहील. अशा तऱ्हेचीं विरोधी पक्षात जाऊन मिसळल्याचीं इतकीं उदाहरणें इतिहासांत आहेत कीं, त्याची क्रमवार गणति देण्याचेंच कारण नाहीं. निरनिराळ्या काळांत जीं क्रुझेड्स[1] घडून आलीं त्यावरून ह्याच गोष्टीला पुष्टि मिळतें कीं राष्ट्रीयत्वानें, भाषेनें, अगदीं विभिन्न नि परक्या असलेल्या जातीच्या लोकांनाहि एकत्र आणून उभे करण्यास समान पुण्यभूविषयींचे प्रेम ही एक फार मोठी विलक्षण शक्ति आहे.

म्हणून राष्ट्रामध्यें संपूर्ण स्थैर्य आणि ऐक्यभाव निर्माण होण्यास जर कोणती आदर्श परिस्थिति उपकारक ठरत असेल तर ती हीच कीं, तेथें राहणाऱ्या लोकांना त्या भूमीविषयीं भक्तिभाव वाटला पाहिजे; त्यांच्या पितृपूर्वजांची जी भूमि तीच त्यांच्या देवाची, देवतांची, धर्मद्रष्ट्या ऋषींची आणि धर्मसंस्थापक साधुसत्पुरुषांचीं भूमि असली पाहिजे; आणि ज्या भूमींत त्यांचा इतिहास घडला त्याच भूमींत त्यांचीं पुराणेंहि निर्माण झाली असली पाहिजेत.

---

१. ख्रिस्ताची जन्मभूमि जेरुसलेम ही मुसलमानांकडून परत घेण्याकरितां आकाराव्या शतकाचे शेवटीं साऱ्या युरोपांतील ख्रिस्त्यांची संघटना करून जी धर्मयुद्धें लढलीं गेलीं त्यास क्रुसेडस् म्हणतात.

हिंदु हे असे जवळ जवळ एकटे एकच लोक आहेत कीं, ज्यांना ही वरील आदर्श परिस्थिति संपूर्णतया लाभलेली आहे आणि तिच्यामुळें राष्ट्रीय स्थैर्य, ऐक्यभावना आणि कीर्ति संपादण्यास सदाचें असें स्फूर्तिस्थान त्यांना प्राप्त झालें आहे. चिनी लोकांच्यासुद्धां हें भाग्य वांट्याला आलेलें नाहीं. केवळ अरेबिया आणि पॅलेस्टाईन यांनाच—जर कधींकाळीं आपलें राष्ट्र स्थापन करण्यांत ज्यू लोक तेथें यशस्वी झाले तर—या क्वचित् दिसून येणाऱ्या युतीचा लाभ होण्याची शक्यता आहे. परंतु महान् राष्ट्र प्रस्थापित होण्यास ज्या नैसर्गिक, सांस्कृतिक, ऐतिहासिक आणि संख्याबल विषयक गोष्टी अत्यंत आवश्यक असतात, त्याचा विचार करतां अरेबिया अगदींच दरिद्री असल्याचें दिसून येतें. आणि जरी यदाकदाचित् झियॉनिस्ट ज्यूंचें स्वप्न, पॅलेस्टाईन राष्ट्राचें रूपानें सत्यसृष्टींत अवतरलें तरीहि त्याच्यामध्यें वरील गोष्टींची उणीव ही सदाचीच भासत राहणार.

भाग्यशाली भारतभूमि

इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली, तुर्कस्थान, इराण, जपान, अफगाणिस्थान, आजचा इजिप्त, (कारण 'पंटो'चे प्राचीन वंशज आणि त्याचा इजिप्त हे फार पूर्वींच नष्ट झालेले आहेत.) आणि आफ्रिकेंतील इतर संस्थानें, मेक्सिको, पेरु, चिली, (याच्यापेक्षा लहान देशांचा वास्तविक उल्लेखहि करण्याची आवश्यकता नाहीं.) हे सारे देश कमी जास्त प्रमाणांत एकात्म आणि एकजीव दिसत असले तरी भौगोलिक, सांस्कृतिक, ऐतिहासिक आणि संख्याबलविषयक आवश्यक गोष्टींमध्यें ते आमच्याइतके भाग्यशाली निश्चित नाहींत. इतकेंच काय पण पुण्यपावन मातृभूमि असण्याचें दुर्मिळ भाग्यहि त्याच्या वांट्याला आलेलें नाहीं. आतां राहिलेल्या देशामध्यें युरोपातील रशिया काय किंवा अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें काय, यांना जरी भौगोलिक दृष्ट्या विस्तृत भूप्रदेश वाट्याला आलेला आहे तरीहि राष्ट्रीयत्वाची जीं दुसरी अत्यंत आवश्यक अशीं लक्षणें आहेत त्याचा संपूर्ण अभावच यांच्या ठिकाणीं दृष्टीस पडतो. सध्यां जगावर नांदत असलेल्या राष्ट्रांमध्यें भौगोलिक, जातीय, सांस्कृतिक आणि संख्याबलविषयक जीं जीं आवश्यक लक्षणें तीं तीं हिंदूंच्या प्रमाणेंच परिपूर्णत्वानें जर कोणत्या दुसऱ्या राष्ट्राच्या

वांटयाला आली असतील तर एकटया चीनच्याच. परंतु, पूर्णत्वाला पोंचलेल्या पवित्र संस्कृत भाषेचा, आणि पुण्यपावन मातृभूमीचा जन्मसिद्ध समान वारसा आम्हाला मिळाला असल्यामुळें राष्ट्रीय ऐक्यभाव निर्माण करण्याच्या दृष्टीनें आवश्यक असलेल्या या लक्षणांचा किंवा प्रमुख अंगांचा विचार करता आम्ही निःसंशय अधिक भाग्यवान आहोंत.

## हिंदु बंधूंनो ! संघटित व्हाल तरच तगाल

अशा रीतीनें हिंदुत्वाची जीं प्रत्यक्ष अशी आवश्यक लक्षणें आपण निश्चित केली तींच खऱ्याखुऱ्या राष्ट्रीयत्वाचीहि अत्यत आदर्श अशीं प्रमुख लक्षणें असल्याचें आमच्या आतापर्यंतच्या चांवल्या आढाव्यावरून वाचकाच्या लक्षांत आलें असेल. जर आपण खरोखर मनात आणलें तर हिंदुत्वाच्या या मूलभूत पायावर, पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राच्या स्वप्नसृष्टींतहि कधीं दिसला नसेल असा, किंवा आपण पूर्वी उपभोगला होता त्याहिपेक्षां उज्ज्वलतर भविष्यकाल आपण घडवूं शकूं. अट मात्र एवढीच कीं, चालून आलेल्या संधींचा सदुपयोग करून घेण्यास आपण सदैव सिद्ध असले पाहिजे. कारण आमच्या बांधवानीं हें लक्षांत ठेवावें कीं, समायिक नि बलाढ्य असे राष्ट्रसंघ स्थापन करण्याचा हा सध्याचा काल आहे. मित्रराष्ट्र-संघ, जूट राष्ट्रं, अखिल जागतिक इस्लाम संघटना, अखिल स्लाव्ह चळवळ, अखिल एथिओपियन वंशाचें आंदोलन,–या साऱ्या गोष्टी कशाच्या द्योतक आहेत ? या सर्वांचा अर्थ एकच कीं, सृष्टीच्या या जीवनकलहात आणि सत्ता संपादण्यासाठीं चाललेल्या अहमिहमिकेच्या स्पर्धेत, आपला निभाव लागून आपणालाहि काहीं महत्त्वाचें स्थान नि सत्ता प्राप्त व्हावी, म्हणून लहान लहान पुंज करून अलग अलग राहाणारे समाज आपोआपच मोठा-संघ स्थापून त्यांत स्वतःला समाविष्ट करून घेण्याच्या उद्योगात चूर आहेत. नैसर्गिकरीत्या किंवा ऐतिहासिक परंपरेनें, ज्याना संख्याबळ किंवा भौगोलिक देश परिमाण किंवा जातीय एकसंघपणा याचें वरदान लाभलेले नाहीं, तीं सारीं राष्ट्रं दुसऱ्यांमध्यें समाविष्ट होऊन त्याची भरपाई करून घेण्याचा प्रयत्न करीत असलेली दिसतात. परंतु ज्याना तीं सारीं वरदानें जन्मतःच प्राप्त झालीं आहेत आणि असें असूनसुद्धां ज्याचीं त्यांनाच तीं आपणांपाशीं

असल्याची जाणीवहि नाहीं त्याच्यासारखे दुर्दैवी तेच ! इतकेंच काय पण खरोखरी त्याची निर्भत्सना करावी तेवढी थोडीच आहे. जगतांतील सारीं राष्ट्रें, कुठें तरी झडप घालावयास मिळावी म्हणून या ना त्या संघात समाविष्ट होण्यासाठीं धडपडत असलेलीं दिसतात. अशावेळीं, हिंदु बंधूंनो ! तुमच्यापैकीं कुणालाहि,–मग तो जैन असो वा समाजी असो, सनातनी अथवा शीख असो किंवा आणखी कोणत्या पंथाचा असो–बाहेर फुटून किंवा संबंध तोडून विलग राहून, अतिप्राचीन कालापासून चालत आलेले हें आपलें अत्यंत नैसर्गिक आणि अत्यत जिवंत असें खरेखुरें जातीय ऐक्य धुळीस मिळवावेसें वाटतें काय ! कागदाच्या कपट्यातून किंवा कांहीं तात्पुरती निकडीची गरज भागविण्याच्या कल्पनेंतून हें ऐक्य निर्माण झालेलें नाहीं; तर संस्कृतीच्या जन्मजन्माच्या आणि रक्ताच्या बंधनातून तें ऐक्य अवतरलेलें आहे ! आता हें ऐक्य अधिक बळकट करता येत असेल तर करा. जातीभेदाच्या, रूढींच्या, मतमताच्या आणि पंथोपपंथाच्या आता सर्वस्वी निरुपयोगी होऊन गेलेल्या भिंती, पाडून फोडून टाका. सहभोजनाचें आतां काय लागतां ! नुसते आतर्जातीय नव्हे तर आतर्प्रांतीय विवाहसुद्धा रूढ नसतील तेथें तेथें घडवून आणले पाहिजेत. परंतु जेथें तशा प्रकारचे आंतर्जातीय विवाह शीख आणि सनातनि, जैन आणि वैष्णव किंवा लिंगायत आणि लिंगायतेतर याच्यामध्यें आधींच रूढ आहेत त्याचा उच्छेद करून टाकणें म्हणजे सर्वस्वीं आत्मघातकीपणाचेंच ठरणार आहे. आमच्या अल्पसंख्य बाधवांच्या हें नीट स्मरणांत असूं द्या कीं अशा प्रकारचें कांहीं करू करणें म्हणजे ज्या फांदीवर आपण उभे आहोंत ती झाडाची फांदीच आपल्या हातानें तोडण्यासारखे आहे. ज्या ज्या म्हणून बंधनानें तुम्ही या मूळ जाति शरिराशीं एकत्र निगडित झालेले आहात ते तें बंधन अधिक बळकट करण्याचाच प्रयत्न तुम्ही करणें अवश्य आहे. मग तें बंधन रक्ताचें, भाषेचें, समान सणवार उत्सवांचें, संस्कृतीचें किंवा समान मातृभूमीविषयीं वाटणाऱ्या प्रेमाचें,–कसलेहि असो. आपल्या हिंदुरक्ताचा हा अतिप्राचीन आणि महदोदात्त प्रवाह प्रत्येकाच्या धमनीधमनींतून आणि अटकपासून कटकपर्यंत अखंडपणें वाहात राहो ! म्हणजे यांतूनच मग हें हिंदुराष्ट्र, परस्परात एकरस आणि एकजीव होऊन

अभेद्य अशा जातिसंघटनेंत परिणत पावेल; आणि ही हिंदु जाति अधिक कणखर नि भक्कम बनून तरवारीसारखी तेजस्वी आणि धारदार होईल.

## हिंदुस्थानचे खरे आणि एकमेव भाग्यविधाते हिंदूच

एकदां भूतकाळाकडे दृष्टि टाका आणि नंतर वर्तमानकाळाकडे पहा. आशियांतील इस्लामची संघटना, युरोपांतील निरनिराळया राष्ट्रांचे राजकीय उद्देशांनीं भारलेले संघ, आफ्रिका अमेरिका येथील पॅन एथिओपिक आंदोलनें, या सर्व गोष्टी उघड्या डोळयांनीं न्याहाळून, मग तरी हे हिंदु बांधव हो! विचार करा कीं, तुमचें भवितव्य हें या हिंदुस्थानच्याच भवितव्याशीं सदाचे बांधलें गेलेलें नाहीं कां ? आणि हेंहि तितकेंच खरे आहे कीं, हिंदुस्थानचा भविष्यकाळ बरावाईट घडविणें केवळ शेवटीं हिंदूंच्याच शक्ति सामर्थ्यावर अवलंबून आहे. हिंदु, मुसलमान, पार्शी, खिश्चन आणि ज्यू यांच्यामध्यें आपण प्रथम हिंदी आणि नंतर जें काय असेल तें, अशी सर्वांना सामावणाऱ्या एका विस्तृत अशा राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेची जाणीव निर्माण करण्याचा, आणि त्या अधिक विस्तृत अशा राष्ट्रीयत्वावर त्याना प्रेम करावयास शिकवण्याचा, आम्हीहि अटोकाट प्रयत्न करीत आहोंत व तसा करणें अवश्यहि आहे. आता त्या ध्येयाच्या दिशेनें प्रगति करण्यांत हिंदुस्थानला किती यश आलें असेल ते असो, परंतु एक गोष्ट मात्र अगदीं सूर्यप्रकाशाप्रमाणें स्पष्ट आहे, आणि ती येथें हिंदुस्थानांतच तेवढी नव्हे तर साऱ्या जगातहि तशीच आहे कीं, राष्ट्र उभे राहण्याला कांहीं एका पायाची आवश्यकता असतेच असते. आणि राष्ट्राच्या जीवनाचे खरें अस्तित्व जर कुठें प्रकट होत असेल तर ते, त्या राष्ट्राच्या त्याच एका विशिष्ट लोकाच्याच नि जातीच्याच जीवनात प्रकट होत असते कीं, ज्या लोकाचे सारे हितसंबंध, भूतकाळचा सारा इतिहास आणि भविष्यकाळच्या साऱ्या आशाआकांक्षा त्या राष्ट्राशीं व त्या भूमीशींच अत्यंत एकरूपतेनें निगडित झालेल्या असतात; आणि जे खरोखर त्या राष्ट्रमंदिराचे पहिले आणि शेवटचे एकमेव आधारस्तंभ असतात. तुर्कस्थानचेंच उदाहरण पहा. राज्यक्रांतीनंतर तरुण तुर्कांना, आपल्या लोकसभेची ( Parliament ) आणि सैनिक संघटनाची द्वारें धर्माच्या कोणत्याहि वा कसल्याच अटी न ठेवतां केवळ

योग्यतेच्या दृष्टीनेंच जें काय पहावयाचें तें पाहून सर्व आर्मेनियन[1] आणि ख्रिश्चन लोकांना उघडी ठेवावी लागलीं. परंतु सर्व्हियाबरोबर जेव्हां तुर्कस्थानचें युद्ध चालू झालें तेव्हां ख्रिश्चनांनीं आणि आर्मेनियनांनीं पहिल्यांदा मोडा घातला; आणि त्यानंतर तर त्यांच्या म्हणून ज्या ज्या तुकड्या तुर्की सैन्यांत होत्या त्या त्या, त्यांच्याशीं राजकीय दृष्ट्या, जातीय दृष्ट्या नि धार्मिक दृष्ट्या जे अधिक जवळच्या बंधनांनीं निगडित झालेले होते त्या सर्व्हियन लोकांच्या बाजूला प्रत्यक्ष जाऊन मिळाल्या. अमेरिकेच्या उदाहरणावरूनहि काय दिसतें? जेव्हां जर्मनीबरोबरच्या युद्धाला तोंड लागलें तेव्हां जर्मन नागरिक तिला सोडून गेल्याचें भीषण दृश्य अमेरिकेला पाहावें लागलें. त्याचबरोबर तेथील निग्रो लोकहि आपल्या गोऱ्या देशबांधवांना सहानुभूति दाखविण्यापेक्षा आपल्या आफ्रिकेंतील नीग्रो लोकांविषयींच्या सहानुभूतीनें कळवळलें. आणि म्हणून शेवटीं, अमेरिकन राष्ट्राचें जें कांहीं बरें वाईट भवितव्य घडावयाचें तें सारें तेथील मूळ घटक जे अँग्लो सॅक्सन लोक, त्यांच्याच शक्तीवर आणि कर्तृत्वावर अवलंबून राहिलेले आहे. तीच गोष्ट हिंदूंची. ज्यांचे भूत, भविष्य नि वर्तमान हे त्यांना पितृभू आणि पुण्यभू असलेल्या हिंदुस्थानच्या भूमीशीं अगदीं निकटपणें बद्ध झालेले आहेत तेच हिंदु या भूमीचा खरा पाया, मूळ खडक आणि हिंदुराष्ट्राचे एकनिष्ठ आणि शेवटच्या क्षणाला पाठीशीं उभे राहणारे सैनिक असल्याचें स्पष्ट दिसून येतें.

## देशद्रोही कारवायांना कठोरपणानें उखडून काढा

म्हणून हिंदी राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनेंसुद्धां हिंदूंनो! तुम्ही तुमचे हिंदु राष्ट्रीयत्वच अधिक बळकट आणि सामर्थ्यसंपन्न बनवा. आपल्या अहिंदु देशबांधवांसच काय परंतु वास्तविकतः जगांतील कोणालाच, नसत्या खोड्या

१. रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट पंथाचे ख्रिस्ती लोक. याच आर्मेनियन ख्रिस्त्यांचा तुर्कांनीं अतिशय छळ केला. त्यामुळें युरोपांतील ख्रिश्चन राष्ट्रांशीं १९१४ मध्यें जेव्हां तुर्कस्थाननें युद्ध पुकारलें तेव्हा हे आर्मेनियन तुर्कांविरुद्ध ख्रिश्चन राष्ट्रांनाच जाऊन मिळाले.

काढून दुखविण्याचें आपणांला कांहींच कारण नाहीं. परंतु आपल्या जातीचे आणि भूमीचे न्याय्य आणि तांतडीचें संरक्षण करण्यासाठीं, व देशादेशामध्यें जे 'पॅन इझमस्' बोकाळलेले आहेत आणि जे उगाचच कुरापत काढून दुसऱ्या देशांवर देशव्यापी आक्रमणें करीत आहेत त्यांच्या आक्रमणांना नि आपल्या देशाचा बळी देण्याच्या स्वकीयाच्या नीच नि देशद्रोही कारवायांना मुळांतच उखडून टाकण्यासाटीं मात्र आपणांला कुणाच्याच रागालोभाचा विचार करण्याचें कारण नाहीं. जोंपर्यंत हिंदुस्थानात राहणाऱ्या जाति 'पहिल्यानें आपण हिंदुस्थान राष्ट्राचे नागरिक आणि नंतर इतर जें कांहीं' असें सागत नाहींत, किंवा सबंध जगातल्या निरनिराळ्या जाति 'पहिल्यानें आपण मानवता ओळखतों आणि नंतर जें काहीं' असें सांगण्यास सिद्ध झालेल्या नाहींत; परंतु उलट अत्यंत आकुंचित असे जातीय किंवा धार्मिक किंवा राष्ट्रीय असे हेतु डोळ्यापुढें ठेवून, संरक्षक आणि आक्रमक असे संघ आणि फळया उभारीत आहेत, तोंपर्यंत हे हिंदु बंधूंनो! ज्याच्यामुळें तुमच्या जातीचा एकविध नि एकात्म असा समाजदेह बनलेला आहे त्या ज्ञानतंतूच्या जाळ्याप्रमाणें आपल्या समाज देहात पसरलेल्या सूक्ष्म बंधनांना शक्यतों अधिक बळकट करण्याचा प्रयत्न करा. तुमच्यापैकीं जे कोणी, आत्मघातकी अभिनिवेशाच्या भरात, अत्यंत महत्त्वाची अशी जिव्हाळ्याची बंधनें तोडून टाकण्याचा प्रयत्न करतील आणि हिंदु या नांवाचा त्याग करण्याइतकें पुढें जातील, त्याना त्याकरितां जबरदस्त दंड सोसावा लागून नंतर आढळून येइल कीं, तसें करण्यामध्यें ते आपल्या जातीय जीवनांतून निर्माण होणाऱ्या जिवंतपणाला आणि शक्तिसामर्थ्याला आपोआपच मुकलेले आहेत. हिंदुत्वांत अंतर्भूत असलेलीं राष्ट्रीयत्वाचीं जीं अत्यंत आवश्यक लक्षणें आतां आपण पाहिलीं त्यातील अगदीं थोडीं लक्षणें उपस्थित असताहि स्पेन पोर्तुगालसारखीं राष्ट्रें जगामध्यें सिंहपराक्रम गाजवूं शकलीं. परंतु तीं सर्व लक्षणें या ठिकाणीं विद्यमान असतांना मग जगतांत अशी कोणती गोष्ट आहे कीं, जी हिंदूंच्या शक्तीपलीकडील आहे!

## हिंदुत्वाचें आदर्श तत्त्वज्ञान

तीस कोटी लोक, हातीं असलेला हिंदुस्थानसारखा पराक्रमहाक-

चालींना अत्यंत उपयोगी असा विस्तृत नि प्रमुख तळ, पितृभू आणि पुण्यभूहि येथेंच, महान् इतिहासाचा वारसा, आणि समान संस्कृति व समानरक्त यांच्या बंधनानीं एकजीव झालेली प्रचंड जनशक्ति—इतक्या सामुग्रीवर सबंध जगाला आपलें म्हणणें ऐकावयास भाग पाडतां येईल अशी खरोखर गोष्ट आहे. खरोखरच असा एक दिवस निश्चितपणें आज ना उद्यां उगवणार आहे कीं ज्यावेळीं हें प्रचंड सामर्थ्य सर्व मानवजातींच्या प्रत्ययास येणार आहे.

त्याचबरोबर हेहि तितकेंच खरें आहे कीं, जेव्हां केव्हां हिंदूंना अशा प्रकारचें स्थान प्राप्त होईल नि सबंध जगताला ते आपलें म्हणणें ऐकून घेण्यास भाग पाडतील त्यावेळीं ते जें कांहीं सांगतील तें गीतेच्या शब्दापेक्षां किंवा बुद्धानें घालून दिलेल्या उपदेशापेक्षां निराळें असेल असें नाहीं. हिंदु हा जेव्हां हिंदु म्हणून उरत नाहीं तेव्हांच तो खऱ्या अर्थानें आत्यंतिक कोटीला पोंचलेला असा हिंदूच उरतो! आणि श्रीशंकराचार्यांच्या समवेत सबंध पृथ्वी हीच आपली काशी 'वाराणसी मेदिनी' असें म्हणूं लागतो; किंवा तुकारामाप्रमाणें 'आमुचा स्वदेश। भुवनत्रयांमध्यें वास। असें सांगतो. हा 'आमुचा स्वदेश' कोणता? बंधूंनो! या विश्वाच्या, या त्रिभुवनाच्या ज्या मर्यादा, तिथेंच माझ्या ह्या देशाचे सीमाक्षितिज संपतात!

— समाप्त —

विजयशाली हिन्दु राष्ट्राचा

# वैभवशाली अितिहास

स्वा. सावरकर लिखित

# हिन्दुपदपातशाही

या ग्रंथांत वाचा

प्राप्तिस्थळ

